THE DEPARTMENT OF PUBLIC INSTRUCTION, BOMBAY.

# THE NAVANÎT.

OR

## SELECTIONS FROM MARÂTHÎ POETS.

ORIGINALLY COMPILED BY

The late PARASHURAMPANT TÂTYÂ GÔDABÔLE.

Revised and Improved in 1882

BY

The late RAVJI SHATRI GODABOLE.

Further revised & improved at the time of each new edition by the Vice Principals of the

TRAINING COLLEGE FOR MEN POONA.

*Sixth (new) Edition 10,000—copies.*



1910



Price Thirteen Annas.

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# नवनीत

अथवा

# मराठी कवितांचे वेंचे.

हें पुस्तक,

**कैलासवासी परशुरामपंत तात्या गोडबोले**

ह्यांनीं प्रथमतः तयार केलें;

त्यानंतर त्यांत बराच फेरफार करून सन १८८२ सालीं

**कै० रावजी शास्त्री गोडबोले**

ह्यांनीं ( नवीन ) आवृत्ति काढिली,

त्यांत वेळोवेळीं असलेल्या पुणें एथील ट्रेनिंग कालेजांतील

व्हाइस प्रिन्सिपाल, यांनीं सुधारणा केल्या आहेत.

प्रकाशक,

रा. वासुदेव गणेश जोशी.

सहावी ( नवी ) आवृत्ति.

१०,००० प्रती.



इसवी सन १९१०.



किंमत तेरा आणे.

# अनुक्रमणिका.


## १ ज्ञानदेव. पृष्ठ.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... १

ज्ञानेश्वरी-वेंचे. अध्याय १२ वा. ... ... ... ... ... ... ... २

,, ,, ,, १३ वा. ... ... ... ... ... ... ... ४

## २ नामदेव.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... १४

स्फुट अभंग. ... ... ... ... ... ... ... ... ... १५

अभंग-बाळक्रीडा. ... ... ... ... ... ... ... ... ... २०

,, -कालियमर्दन. ... ... ... ... ... ... ... ... २३

,, -कंसवध. ... ... ... ... ... ... ... ... ... २५

स्फुट अभंग-जनाबाईचे. ... ... ... ... ... ... ... ... २९

,, -राजाईचे. ... ... ... ... ... ... ... ... ३२

,, -गोणाईचे. ... ... ... ... ... ... ... ... ,,

,, -गोंदोबाचे. ... ... ... ... ... ... ... ... ३३

## ३ एकनाथ.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ३३

ओंव्या-वेंचे, एकनाथी भागवत ( अध्याय ४. ) ( नरनारायणाख्यान ) ... ३४

,, -रामायणांतील ( अंगदशिष्टाई. ) ... ... ... ... ... ४२

## ४ तुकाराम.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ४६

स्फुट अभंग. ... ... ... ... ... ... ... ... ... ४७

,, ,, -तुकारामाची स्त्री तुकारामास रागानें बोलली त्या संबंधाचे अभंग. ८४

,, ,, -तुकारामाचें शिवाजीराजास पत्र. ... ... ... ... ... ८६

## ५ वामनपंडित.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ८८

वेंचे—वामनी श्लोक. ... ... ... ... ... ... ... ... ८९

,, —नामसुधेंतील. ... ... ... ... ... ... ... ... ,,

,, —वनसुधेंतील. ... ... ... ... ... ... ... ... ९२

,, —वेणुसुधेंतील. ... ... ... ... ... ... ... ... ९४

,, —रुक्मिणी-पत्रिका. ... ... ... ... ... ... ... ९६

वेंचे—भामाविलासांतील. ... ... ... ... ... ... ... ९८
,,—रुक्मिणीविलासांतील. ... ... ... ... ... ... ... १०१
,,—लोपामुद्रासंवादांतील. ... ... ... ... ... ... ... १०४
,,—वामनचरित्रांतील. ... ... ... ... ... ... ... १०८
,,—भरतभावांतील. ... ... ... ... ... ... ... ११२
,,—नृसिंहावतारांतील. ... ... ... ... ... ... ... १२२
,,—स्फुट श्लोक—भर्तृहरिकृत संस्कृत नीतिशतक व वैराग्यशतक यांच्या वामनानें केलेल्या मराठी पद्यरूप भाषांतरांतील. १२३

## ६ रामदास.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... १४३
स्फुट अभंग. ... ... ... ... ... ... ... ... ... ... १४४
,,—भक्तिपर अभंग. ... ... ... ... ... ... ... ... ... १५५
,,—कलियुगपंचक. ... ... ... ... ... ... ... ... ... १५७
,,—मूर्खपणपंचक. ... ... ... ... ... ... ... ... ... १५८
वेंचे, ओंव्या—दासबोधांतील ( कविवर्णन ). ... ... ... ... ... १५९
,,—मनाचे श्लोकांतील. ... ... ... ... ... ... ... ... १६२
,,—अभंग—सत्संगतिशतक. ... ... ... ... ... ... ... ... १६७
,, ,,—वैराग्यशतक. ... ... ... ... ... ... ... ... १६८
,, श्लोक—करुणाष्टकें. अष्टक पहिलें. ... ... ... ... ... ... १७०
,, ,, ,, दुसरें. ... ... ... ... ... ... १७१

## ७ मुक्तेश्वर.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... १७१
वेंचे, ओंव्या—सभापर्वांतील नारदनीति अध्याय ३. ... ... ... ... १७२
,, —वनपर्वांतील हरिश्चंद्राख्यान. ... ... ... ... ... ... १८१

## ८ श्रीधर.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... २११
वेंचे, ओंव्या—रामविजयांतील अध्याय १ ला. ... ... ... ... ,,
,, ,,—हरिविजयांतील अक्रूरागमन, अध्याय १८ वा. ... ... ... २२१
,, ,,—पांडवप्रतापांतील अभिमन्युवध, अध्याय ४५ वा. ... ... ... २२८
,, ,,—शिवलीलामृतांतील श्रियाळ-चरित्र, अध्याय १४ वा. ... ... २३२

## ९ अमृतराय.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... २३७
कटिबंध—जीवदशा. ... ... ... ... ... ... ... ... ... २३८
,,—दुर्वासयात्रा. ... ... ... ... ... ... ... ... ... २३९

## १० महीपति.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... २४१
ओंव्या—संतलीलामृतांतील गोपीचंदाख्यान, अध्याय ३ रा. ... ... ... २४२
,,—भक्तविजयांतील ( देवगुरूंना वंदन ), अध्याय १ ला. ... ... २४६
,,—एकनाथ-चरित्र, अध्याय ४५ वा. ... ... ... ... ... २४८

## ११ मोरोपंत.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... २५३
स्फुट आर्या. ... ... ... ... ... ... ... ... ... २५४
अभंग—सीतागीत. ... ... ... ... ... ... ... ... २५६
आर्या—दामरामायणांतील. ... ... ... ... ... ... ... २६२
,,—परशुरामायणांतील. ... ... ... ... ... ... ... २६३
,,—आदिपर्वांतील कचोपाख्यान. ... ... ... ... ... ... २६४
,,—आदिपर्वांतील सुभद्राहरणप्रकरणीं. ... ... ... ... ... २६९
,,—वनपर्वांतील नलोपाख्यान. ... ... ... ... ... ... २७३
,,—वनपर्वांतील जयद्रथकृत द्रौपदीहरण. ... ... ... ... ... २७९
,,—वनपर्वांतील सावित्रीचें आख्यान. ... ... ... ... ... २८६
,,—विराटपर्वांतील उत्तरगोग्रहण. ... ... ... ... ... ... २९६
,,—उद्योगपर्वांतील कृष्णशिष्टाई. ... ... ... ... ... ... ३०६
,,—भीष्मपर्वांतील युद्धप्रकरणीं. ... ... ... ... ... ... ३१३
,,—द्रोणपर्वांतील युद्धप्रकरणीं ... ... ... ... ... ... ३२०
,,—कर्णपर्वांतील कर्णार्जुनयुद्ध. ... ... ... ... ... ... ३३०
,,—सन्मणिमालेंतील.... ... ... ... ... ... ... ... ३४६
,,—धर्मोपदेशप्रकरणीं. ... ... ... ... ... ... ... ३४८
,,—संशयरत्नमालेंतील. ... ... ... ... ... ... ... ,,
श्लोक—केकावली. ... ... ... ... ... ... ... ... ३५३
,,—अंबरीषाख्यान. ... ... ... ... ... ... ... ३५९
साक्या—सुदामचरित्रांतील पृथुकोपाख्यान. ... ... ... ... ३६३

## १२ रघुनाथपंडित.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ३८०
पंचे—नलदमयंतीस्वयंवराख्यान. ... ... ... ... ... ... ३८१

## १३ चिंतामणि कवि.

दिंड्या—ध्रुवाख्यान. ... ... ... ... ... ... ... ... ४१०

## १४ प्रभाकर.

लावणी—लक्ष्मीपार्वतीसंवाद. ... ... ... ... ... ... ... ४१३

## १५ नरहरि.

वेंचे—गंगारत्नमाळेंतील. ... ... ... ... ... ... ... ... ४१६

## १६ अनंतफंदी.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ४३६
फटका—उपदेशपर. ... ... ... ... ... ... ... ... ४३७
लावणी—बोधपर. ... ... ... ... ... ... ... ... ४३८

## १७ रामजोशी.

चरित्र. ... ... ... ... ... ... ... ... ... ... ४३९
लावण्या—बोधपर. ... ... ... ... ... ... ... ... ४४०

## १८ कित्येक कवींचीं पदें वगैरे.

वेंचे, पदें—शिवरामस्वामी. ... ... ... ... ... ... ... ४४१
,,—केशवस्वामी. ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—अमृतराय. ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—श्रीधर. ... ... ... ... ... ... ... ... ... ४४२
,,—आनंदतनय. ... ... ... ... ... ... ... ... ४४३
,,—जीवनतनय. ... ... ... ... ... ... ... ... ४४४
,,—शिवदिनकेसरी. ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—रामजोशी. ... ... ... ... ... ... ... ... ४४५
वेंचे, पदें—मध्वमुनि. ... ... ... ... ... ... ... ... ४४६
,,—तुकाराम. ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—रामदास. ... ... ... ... ... ... ... ... ... ४४८
,,—एकनाथ. ... ... ... ... ... ... ... ... ... ४४९
,,—सोहिरोबा. ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—स्फुट. ... ... ... ... ... ... ... ... ... ,,
भूपाळ्या—गणपतीवरच्या ... ... ... ... ... ... ... ... ४५०
,,—रामावरची ... ... ... ... ... ... ... ... ४५२
,,—कृष्णावरची ... ... ... ... ... ... ... ... ,,
,,—घनश्यामावरची ... ... ... ... ... ... ... ... ,,
आरत्या—गणपतीवरची ... ... ... ... ... ... ... ४५३
,,—पांडुरंगावरची. ... ... ... ... ... ... ... ... ४५४
,,—देवीवरची. ... ... ... ... ... ... ... ... ,,
कठीण शब्दांचा कोश. ... ... ... ... ... ... ... ... ४५५
... ... ... ... ... ... ... ... १–४०

## सन १८७८ सालीं तयार झालेल्या आवृत्तीची
## सूचना.

ह्या ग्रंथाची प्रथमावृत्ति सन १८५४ त छापिली; नंतर सन १८५७ त दुसरी छापिली. त्यावर सन १८६० ह्या वर्षी तिसरी छापिली. नंतर सन १८६२ त चौथी, सन १८६४ त पांचवी, सन १८६८ त सहावी, सन १८७१ त सातवी आणि सन १८७३ त आठवी, ह्याप्रमाणें आवृत्ति छापल्या गेल्या.

पहिल्या आवृत्तींतील कठीण वेंचे सर्व काढून त्या ठिकाणीं सुलभ वेंचे घालावे आणि सर्वांस समजण्यास सुलभ पडेल अशी ह्या पुस्तकाची नवी आवृत्ति काढावी, असें मेहरबान चात्फील्ड साहेब, विद्याखात्याचे डैरेक्तर, ह्यानीं ठरवून तें काम मेहरबान मेजर कयांडी साहेब, मराठी ट्र्यान्स्लेतर, ह्यांच्या सूचनेवरून आम्हांकडे सोंपविलें. त्याप्रमाणें आम्हीं ही नवी आवृत्ति तयार केली आहे. ह्या आवृत्तींत सुधारणा केली आहे ती एणेंप्रमाणें:—

१ मागील आवृत्तींत जे फार दुर्बोध आणि अध्यात्मसंबंधी किंवा वेदांतसंबंधी वेंचे होते ते गाळून नवे सुलभ, मनोरंजक आणि तरुण पुरुषांनीं वाचण्यास योग्य असे वेंचे घातले आहेत.

२. सभ्य रीतीस सोडून जें वर्णन होतें तें काढलें आहे.

३. कवितेंतील सर्व शब्द निरनिराळे तोडून समासांतील शब्द (—) अशा खुणेनें निरनिराळे करून दाखविले आहेत.

४. कठीण स्थलाचा अर्थ समजण्याकरितां पुष्कळ टीपा दिल्या आहेत.

५. ज्या कवींचे उतारे घेतले आहेत त्यांचें स्वल्प चरित्र वेंच्यांचे आरंभीं माहिती मिळाली त्याप्रमाणें दिलें आहे.

६. आख्यानांच्या किंवा प्रकरणांच्या आरंभीं त्यांच्या मूळपीठिका म्हणजे अवतरणें दिलीं आहेत.

७. रां० सा० भास्कर दामोदर ह्यांनीं छंदांविषयीं लिहिलेला निबंध

नवनीताच्या मागील कित्येक आवृत्तींत आरंभीं छापला होता; परंतु आतां त्या विषयावर परशुरामपंत तात्या ह्यांचा स्वतंत्र ग्रंथ झाल्यामुळें तो निबंध एथें गाळला आहे.

८. आख्यान ज्या वृत्तांत असेल तें वृत्त मागील आवृत्तींत उजव्या हातच्या पृष्ठांवर दिलें होतें; पण आतां तसें न करितां त्या ठिकाणीं आख्यानाचें नांव दिलें आहे.

९. वेंचे कर्वींच्या कालानुक्रमाप्रमाणें साधतील तितके जुळले आहेत.

१०. मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर ह्यांच्या कवितांत सर्व वेदांतच असल्यामुळें त्यांचा अर्थ समजण्यास कठीण पडतो, म्हणून त्यांची कविता ह्या आवृत्तीतून अर्जीच काढून टाकिली आहे.

११. जे कवि ह्या आवृत्तींत गाळले आहेत त्यांच्या बदला दुसरे कवि घातले आहेत.

१२. जुन्या कोशांत नवे पुष्कळ शब्द घालून तो कोश बराच वाढविला आहे.

ही आवृत्ति तयार करितांना हैस्कूलचे हेड मास्तर मे० जेकब साहेब, रा० रा० वामन आबाजी मोडक आणि रा० रा० विठ्ठल नारायण पाठक ह्यांजकडून आलेल्या सूचनी व उतारे पुष्कळ उपयोगीं पडले; ह्याकरितां आम्ही त्यांचे आभार मानितों.

दिजंबर, इसवी
सन १८७८.

श्रीकृष्ण शास्त्री तळेकर.
रावजी शास्त्री गोडबोले.

## सन १८८२ साली तयार झालेल्या पहिल्या (नवीन) आवृत्तीची सूचना.

सन १८७८ ह्या वर्षी तयार झालेल्या नवनीताच्या आवृत्तीमध्यें बराच फेरफार करून ही नवीन आवृत्ति तयार केली आहे. त्या फेरफाराचें क्रमवार टिप्पण एणेंप्रमाणें:—

( १ ) **नामदेव**—ह्याच्या स्फुट अभंगांपैकीं १० वा आणि ११ वा हे अभंग विशेषकथानकपर असल्यामुळें ते काढून त्यांच्या ठिकाणीं दुसरे दोन स्फुट अभंग घातले आहेत; आणि बालक्रीडा व कालियमर्दन ह्या प्रकरणांच्या पुढें पुनः दोन स्फुट अभंग मध्येंच चुकून पडले होते, ते तेथून काढून आरंभींच्या स्फुट अभंगांमध्यें सामील केले आहेत.

( २ ) **एकनाथ**—ह्या कवीचा एकनाथीभागवत ह्या नांवाचा अतिमहत्त्वाचा ग्रंथ असून त्यांतील वेंचे पूर्वींच्या आवृत्तींत मुळींच घेतले नव्हते; म्हणून त्यांतलें सुरस व उपदेशपर असें नरनारायणाख्यान ह्या नवीन आवृत्तींत घेतलें आहे.

( ३ ) **तुकाराम**—ह्या कवीच्या मागील आवृत्तींतल्या अभंगांपैकीं सुमारें ५० अभंग पुनरुक्ति, दुर्बोधता, गहनवेदांत इत्यादिकांनीं युक्त असल्यामुळें ते काढून त्यांच्या जागीं सामान्य उपदेशपर, रसभरित, सुलभ आणि व्यावहारिक दृष्टांतांनीं युक्त असे सुमारें ८० अभंग ह्या आवृत्तींत घातले आहेत.

( ४ ) **वामन**—हा कवि फार चांगला व ह्याचे ग्रंथही पुष्कळ, असें असून त्या मानानें मागील आवृत्तींत घेतलेले ह्याच्या ग्रंथांतले वेंचे कमी आहेत, असें दिसलें; म्हणून ह्याची रुक्मिणीपत्रिका व नृसिंहावतारचरित्र आणि भर्तृहरिकृत नीतिशतक आणि वैराग्यशतक ह्यांच्या ह्या कवीनें केलेल्या पद्यात्मक भाषांतरांतील सुरस, मार्मिक व उपदेशपर अशीं ९३ पद्यें ह्या आवृत्तींत घेतलीं आहेत. ह्याखेरीज नामसुधा, वनसुधा व भामाविलास ह्या तीन प्रकरणांत स्थलविशेषीं संबंध जुळविणारीं असून मनोरम अशीं सुमारें ११ पद्यें सर्वसंग्रहांतून नवीन निवडून घेतलीं आहेत.

( ५ ) **रामदास**—ह्याच्या कवितेंतील जे वेंचे मागील आवृत्तींत घेतलेले आहेत त्यांतही फारसे मनोरम नाहींत असे सुमारें २५ अभंग दिसले ते काढून त्यांच्या जागीं कांहीं सुरस स्फुट अभंग घातले आहेत; व ह्याच्या ज्ञानशतकांतील ( सत्संगतिशतकांतील ) वेंच्यांपैकीं बरेच गाळून वैराग्यशतकांतील सुमारें ५१ अभंग नवीन घेतले आहेत.

( ६ ) **मोरोपंत**—ह्याचें उत्तरगोग्रहण, सावित्रीचें आख्यान, भीष्मपर्व आणि द्रोणपर्व ह्यांमध्यें कथाभागाचें सूत्र जुळविण्याकरितां सुमारें २० आर्या ह्या आवृत्तींत जास्त घातल्या आहेत; आणि केकावलि व संशयरत्नमाला ह्यांतही पांच सहा पद्यें जास्त घातलीं आहेत. ह्याचीं प्रकरणें भारतांतील पर्वांच्या अनुक्रमानें मागच्या आवृत्तींत घातलीं नव्हतीं; तीं ह्या आवृत्तीमध्यें तो अनुक्रम साधून घातलीं आहेत.

( ७ ) **अमृतराय**—ह्याच्या प्रकरणांपैकीं रामचंद्रावरचा कटाव विशेष चांगलासा न वाटल्यावरून तो काढून टाकिला आहे.

( ८ ) **महीपति**—ह्याच्या एकनाथचरित्रापैकीं ४४ पासून ५५ पर्यंत ओंव्या विकट आणि वेदांत विषयक असल्यामुळें त्या काढून टाकिल्या आहेत.

( ९ ) **रघुनाथपंडित**—ह्याच्या नलोपाख्यानांतील १०१ व १४४ ह्या पद्यांना अर्थ सरस लागला नाहीं व तीं गाळिलीं असतां कथेचा संबंध तुटतो असेंही दिसलें नाहीं, म्हणून तीं पद्यें गाळिलीं आहेत.

( १० ) **अनंतफंदी**—ह्याच्या प्रकरणांपैकीं माधवग्रंथांतील अध्याय १ ला हें प्रकरण पुष्कळांस नीरस वाटल्यावरून काढून टाकिलें आहे.

( ११ ) पदें वगैरे—मागच्या आवृत्तींतील पदांपैकीं कांहीं शुद्ध वेदांतपर होतीं तीं व दुसरीं कांहीं तादृश चित्तवेधक नव्हतीं म्हणून तीं काढून दुसरीं चमत्कारिक व प्रायः भक्तिवैराग्यपर अशीं सुमारें २० पदें ह्या आवृत्तींत घातलीं आहेत.

( १२ ) कवींचीं चरित्रें व त्यांनीं केलेल्या ग्रंथांचीं नावें ह्यांमध्यें कांहीं चुका आढळल्या त्या हल्लींच्या आवृत्तींत दुरुस्त केल्या आहेत.

( १३ ) मागील आवृत्तींत ज्या ज्या कठीण स्थलीं टीपा द्यावयाच्या राहिल्या होत्या त्या त्या स्थलीं व नवीन घेतलेल्या प्रकरणांवर पुष्कळ नव्या टीपा दिल्या आहेत; त्याचप्रमाणें मागच्या आवृत्तींतल्या बऱ्याच टीपा चुकलेल्या आढळल्या त्याही एथेंच दुरुस्त केल्या आहेत. नमेच टीपा दुरुस्त करितांना व नव्या देतांना पुष्कळ ठिकाणीं संबंधनिदर्शनाकरितां कथानकें लिहिणें अवश्य दिसलें. म्हणून भारत, भागवत, रामायण, स्कंदपुराण इत्यादिकांतलीं तीं तीं कथानकें संक्षिप्तरीत्या टीपांमध्यें लिहिलीं आहेत.

( १४ ) कोश--मागच्या आवृत्तींमध्यें कोशांतल्या कित्येक शब्दांचे अर्थ अस्पष्ट व स्थलविशेषीं लागू न पडणारे असे नजरेस आले ते हल्लीं दुरुस्त केले आहेत. आणि सुमारें ३०० शब्द कठीण असून त्यांचे अर्थ कोशांत घातले नव्हते ते हल्लीं घातले आहेत.

( १५ ) लेखक, टाईप जुळणारे व प्रुफें तपासणारे ह्यांच्या प्रमादानें मागच्या आवृत्तींत ऱ्हस्वदीर्घांच्या, विरामचिन्हांच्या व समासाचे अवयव निराळे दाखविण्याविषयींच्या बऱ्याच चुका झाल्या होत्या, त्या दुरुस्त करण्याकरितां पुष्कळ यत्न केला; तथापि ह्या आवृत्तींतही तशाप्रकारच्या कित्येक चुका राहिल्या आहेत असें दिसून आलें; त्या बहुतेक चुका शुद्धिपत्रांत दाखल केल्या आहेत.

( १६ ) धांवणें, माजीं, लागीं, बाहेरीं, जाणों, त्वरें, कैंचा, पैं, पां, पुढारां, पुढतीं, सांवरणें, हांसणें, ढेंकर, हांक, ओंवी, कृपें, पांटी, जेवीं, फांसा, वायां, हळूं, सांवळा, जवळीं, संचय, वांकुल्या, तुम्हांस इत्यादि शब्दांचे उच्चार कोणी सानुनासिक करितात व कोणी तसे करित नाहींत, आणि त्या योगानें त्यांचीं हांक ओंवी इत्यादि सानुनासिक, हाक, ओवी इत्यादि निरनुनासिक अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें लिहिण्याची वहिवाट पडून गेली आहे. ती वहिवाट मोडणें अप्रशस्त आहे असें कित्येक विद्वानांचें मत पडल्यावरून अशा शब्दांचीं दोन्ही प्रकारचीं रूपें राखिलीं आहेत. अशाच समजुतीनें करूनियां, देऊनियां, इत्यादि शब्दांचीं हीं दोन्ही प्रकारचीं रूपें एथें राखिलीं आहेत, त्यांत विशेषेंकरून करूनिया इत्यादि निरनुनासिक रूपें फार राखिलीं

गेलीं आहेत; परंतु त्यांचीं निरनुनासिक रूपें जुन्या हस्तलिखित ग्रंथांत मात्र आढळतात; हल्लींच्या ग्रंथांत सानुनासिक रूपें योजिलेलीं आढळतात.

( १७ ) मागची म्हणजे सन १८७८ सालची आवृत्ति तयार करितेसमयीं पूर्वींच्या आवृत्तींतले ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांचे सर्व वेंचे आणि मोरोपंत, वामन इत्यादिकांचे कांहीं वेंचे गाळून टाकिले; ही गोष्ट पुष्कळ लोकांस रुचली नाहीं, असें ऐकण्यांत येतें. परंतु असें करण्याचें मुख्य कारण हें कीं, जीमध्यें बहुतेक वेंचे सामान्यतः प्रौढदशेस येऊं लागणाऱ्या विद्यार्थ्यांस स्वतः समजण्याजोगे किंवा निदान शिक्षकांनीं समजून दिले असतां समजण्याजोगे व त्यांच्या स्थितीस योग्य असतील अशी नवनीताची आवृत्ति तयार करण्याविषयीं शाळाखात्याचे मुख्य अधिकारी ह्यांचा हुकूम झाला होता. त्या हुकुमावरून अर्थात् प्रौढ विद्यार्थ्यांसही दुर्बोध असे जे ज्ञानेश्वरींतल्या सारिखे शुद्ध वेदांतपर व मोरोपंताच्या रासारंभींच्या आर्यांसारिखे अतिगहन रचनेचे वेंचे होते ते गाळून टाकणें प्राप्त झालें. पुढें ही आवृत्ति तयार करण्याविषयीं मे० केरेकर साहेब ह्यांचा सन १८८१ सालच्या जुलै महिन्यांत हुकूम आला, त्यांत देखील ही आवृत्ति सामान्य विद्यार्थ्यांस समजण्याजोगी असावी असें स्पष्ट लिहिलें आहे; त्यामुळें ह्या आवृत्तीमध्येंही ज्ञानेश्वरींतल्यासारिखे लोकप्रिय वेंचे गाळणें प्राप्त झालें. आतां असे दुर्बोध वेंचे समजण्याची योग्यता ज्या विद्यार्थ्यांचे अंगीं आली असेल त्यांच्या अवलोकनांत तेही यावे व इतर लोकांचेंही मनोरंजन व्हावें, म्हणून तसले वेंचे ज्यांत घातले आहेत असा नवनीताचा दुसरा भाग तयार करावा असा मुख्य अधिकारी ह्यांचा उद्देश आहे.

( १८ ) ही नवी आवृत्ति तयार होत असतां निबंधमालेच्या ७३ व्या अंकामध्यें एका मार्मिक विद्वान् गृहस्थानें नवनीताच्या सन १८७८ सालच्या आवृत्तींतले कित्येक दोष काढून प्रसिद्ध केले. ह्या कृत्याबद्दल त्याचे आम्ही आभार मानितों. त्या दोषांची व्यवस्था आम्हीं काय केली, हें थोडक्यांत दर्शवितों. त्यानें दाखविलेल्या दोषांपैकीं कांहीं दोष तो अंक प्रसिद्ध होण्यापूर्वींच आमच्या ध्यानांत येऊन ह्या आवृत्तींत आम्हीं ते दुरुस्त केले होते; व बाकीच्यांपैकीं जे वास्तविक दोष

आहेत असें दिसलें तेही कित्येक त्यांच्या सूचनाप्रमाणें व कित्येक आम्हांस योग्य दिसलें त्याप्रमाणें दुरुस्त केले आहेत. आतां त्यांनीं दाखविलेल्या स्थलांपैकीं ज्यांत खरे दोष आहेत अशीं स्थलें फारच थोडीं आहेत. ही गोष्ट सविस्तर सिद्ध करित बसणें हें एथें अप्रासंगिक होय; तथापि सुज्ञ वाचकांची खात्री होण्यासाठीं तीबद्दल एथें थोडेंसें सुचविणें अवश्य दिसतें; तें असें:—

सन १८७८ सालची आवृत्ति तयार करणारांनीं जागजागीं मागच्या आवृत्तींतले पाठ फिरविले असें दाखविणें व ते सारे पाठभेद अगदीं अयोग्य झाले असें ठरविणें ह्यांविषयीं त्या पत्रकाराचा मुख्यत्वेंकरून यत्न आहे. आतां त्यानें दाखविलेल्या कांहीं स्थलीं मागील आवृत्तींतल्या पाठांपासून भिन्न पाठ आहेत खरे; परंतु त्यांपैकीं भामाविलासाच्या ९ व्या श्लोकांतील 'प्रगटति' रुक्मिणीविलासाच्या १० व्या श्लोकांतील 'अहंकृति' व ययातीच्या आख्यानाच्या २३ व्या आर्येतील 'दक्षकरें' हे पाठ, तीं तीं प्रकरणें नवीन आवृत्ति तयार करितेवेळीं सर्वसंग्रहांतीं ताडून पहात असतां, त्यांत सांपडले तसेच घेतले आहेत. सर्वसंग्रह हा ग्रंथ परशुरामपंत तात्यांनींच तपासलेला असून त्यांत कवींचे मूळचे पाठ कायम राखण्याविषयीं जितका प्रयत्न करवला तितका त्यांनीं केला, असा आमचा समज आहे. आतां त्यांनीं काढिलेल्या नवनीताच्या आवृत्तींमध्यें सर्वसंग्रहाच्या संबंधानें पाठभेद कां झाले असतील ते असोत, परंतु नवीन आवृत्तींत बहुतेक प्रसंगीं वर सांगितल्याप्रमाणें सर्वसंग्रहांतले पाठ घेतलेले असल्यामुळें अर्थातच ते तात्यांच्या आवृत्तींच्या संबंधानें पाठभेद दिसतात.

'दक्षकरें' ह्या पाठाविषयीं आणखी असें सुचवावयाचें आहे कीं, तात्यांच्या सन १८६४ व १८७३ ह्या सालींच्या आवृत्ति आमच्या पाहण्यांत आल्या, त्यांमध्यें जरी 'रक्षकरें' असा पाठ आहे, तरी त्या दोन्ही आवृत्तींच्या कोशांमध्यें 'दक्षकरें' हाच शब्द लिहिलेला असून तेथें त्याचा अर्थ 'उजव्या हातानें' असा दिला आहे; व तो शब्द त्या आवृत्तींत इतर कोणत्याही प्रकरणांत आलेला आढळत नाहीं. ह्यावरून तात्यांचाही उद्देश 'दक्षकरें' हाच पाठ कायम ठेवण्याचा अ-

सून ' द ' आणि ' र ' ह्या अक्षरांच्या रूपांमध्यें फार सादृश्य असल्यामुळें कदाचित् छापणारांच्या हातून हा पाठभेद झाला असेल, असें म्हणण्यास चिंता नाहीं. ह्याखेरीज ' दक्षकरें ' हाच मूळचा पाठ असावा, हें अनुमान भारताच्या आदिपर्वांतील ७८ व्या अध्यायाच्या ( एष मे दक्षिणो राजन पाणिस्ताम्रनखांगुलिः । समुद्धर गृहीत्वा मां कुलीनस्त्वं हि मे मतः ॥ ) ह्या २० व्या श्लोकावरूनही होतें.

भीष्मपर्वाच्या २३ व्या आर्येंतील ' हा ' ह्या पाठभेदाविषयीं सदहू पत्रकारानें जें लिहिलें आहे तें निराधार आहे. कारण सर्वसंग्रह आणि वर सांगितलेल्या तात्यांच्या आवृत्ति ह्या सर्वांमध्यें ' हा ' असाच पाठ आहे.

लोपामुद्रासंवादाच्या १२ व्या श्लोकामध्यें ' मृदुसुपथिहुनी ' आणि ययातीचे आख्यानांतील ३० व्या आर्येमध्यें ' विश्वसृष्टिपति ' ह्या दोन स्थळीं मात्र इतर ग्रंथांच्या आधारावांचून पाठभेद केलेला आहे खरा. ह्यांपैकीं पहिल्याच्या ठिकाणीं ' सुमृदुपतिहुनी ' असा तात्यांच्या आवृत्तींत पाठ होता, व सर्वसंग्रहांत ' मृदुसुपतिहुनी ' असा पाठ आहे, परंतु त्याचा अर्थ सरस लागत नाहीं, म्हणून ' ति ' च्या ठिकाणीं ' थि ' घालून ' मृदुसुपथिहुनी ' असें पाठांतर केलें आहे. दुसरें पाठांतर ' विश्वसृष्टिपति ' ह्याचे ठिकाणीं तात्यांच्या आवृत्तींत ' विश्वदृष्टिपति ' असा पाठ होता. परंतु पंतांनीं आपल्या आर्येंत हा शब्द भारतांतल्या ज्या श्लोकाच्या आधारानें घातला असावा असें दिसतें तो ( आदिपर्व-अध्याय ७८ वा श्लोक ३९ ' यच्च किञ्चित्सर्वगतं भूमौ वा यदि वा दिवि । तस्याहमीश्वरो नित्यं तुष्टेनोक्तः स्वयंभुवा ' ॥ ) हा आहे. ह्या श्लोकामध्यें विश्वदृष्टिपतित्वाचा कांहींच संबंध दिसत नाहीं. ह्याखेरीज ' सृ ' ह्या अक्षराचें पूर्वार्ध शाई उडणें इत्यादि कारणांनीं नाहींसें झालें तर त्याची आकृति बहुतेक ' दृ ' ह्या अक्षराच्या आकृतीसारखीच होते, ह्यामुळें लेखकादिकांच्याच प्रमादानें कदाचित् ' सृष्टि ' ह्याचे ठिकाणीं ' दृष्टि ' लिहिलें गेलें असावें. अशा समजुतीनें हा पाठभेद केलेला आहे.

सारांश, सन १८७८ सालच्या आवृत्तींतले बहुतेक पाठभेद, तीं तीं प्रकरणें सर्वसंग्रहाशीं व इतर ग्रंथांशीं ताडून पहात असतां कवीचे

मूळचे पाठ कोणते असावे हें ठरवून ते कायम राखण्याच्या उद्देशानेंच केले आहेत. व थोडेसे पाठभेद नजरचुकीनेंही झाले आहेत. योग्य कारणावांचून व आधारावांचून पाठभेद करणें हें अगदीं अप्रशस्त होय असें आमचेंही पूर्ण मत आहे; परंतु अनेक पाठांपैकीं कवीचा मूळचा पाठ अमुकच आहे हें ठरविणें किती कठीण आहे व त्यामुळें त्या कामांत चुका होण्याचा संभव किती आहे, हें तें काम करणारांसच समजतें. असो, हल्लींच्या आवृत्तीमध्यें जे नवीन वेंचे घेतले आहेत त्यांमध्यें व स्थलविशेषीं जुन्या वेंच्यांतही जेथें जेथें शंका आल्या तेथें तेथें जुन्या हस्तलिखित पुस्तकावरून मूळचे पाठ ठरविण्याविषयीं व निरनिराळ्या प्रतींमध्यें निरनिराळे पाठ दृष्टीस पडून त्यांपैकीं मूळचा कोणता हें समजत नसल्यास संदर्भावरून त्यांतला योग्य कोणता दिसतो हें ठरविण्याविषयीं, करवला तितका यत्न केला आहे.

( १९ ) आतां शेवटीं इतकेंच सुचवितों कीं, ही आवृत्ति तयार करण्यामध्यें जरी वर सांगितल्या प्रकारचा पुष्कळ यत्न केला आहे, तरी तीमध्यें कदाचित् अनेक प्रकारचे अनेक दोष राहिले असतील; ह्याकरितां निबंधमालेंतील पत्रकारांसारिख्या पंडित, मार्मिक व लोकहितेच्छु गृहस्थांनीं व त्यांत विशेषेंकरून मोठमोठ्या शाळांतील मराठीभाषेच्या अध्यापकांनीं ह्या आवृत्तींतले जे दोष त्यांस दिसतील ते कृपा करून अगत्य कळवावे; म्हणजे त्यांचा योग्यायोग्य विचार होऊन पुढच्या आवृत्तींत ते दुरुस्त होतील, व त्यांनीं तसें केल्यास शाळाखात्यांत नवनीताचें अध्ययन व अध्यापन करणाऱ्यांवरच केवळ नव्हत तर इतर सर्व मराठीभाषा जाणणाऱ्या लोकांवर त्यांचे मोठे उपकार होतील.

ही आवृत्ति तयार करण्याचे कामीं पूना ट्रेनिंग कालेजांतील संस्कृत व मराठी ह्या भाषांचे अध्यापक रा० रा० नारायण शास्त्री साठे ह्यांनीं पुष्कळ योग्य सूचना केल्या त्यांबद्दल त्यांचे आम्ही मोठे आभार मानितों.

मु० पुणें,
ता० १६, माहे जानेवारी,
सन १८८२.

रावजी शास्त्री गोडबोले.

## दुसऱ्या ( नवीन ) आवृत्तीची सूचना.



१. ही आवृत्ति तयार होऊन छापण्यास सुरवात झाली असतां मे० दैरेक्तर साहेब यांजकडून पत्र आलें, त्यांत त्यांनीं असा सक्त हुकूम दिला कीं, नवनीतामध्यें जीं ग्राम्यधर्मसूचक पद्यें असतील तीं सर्व काढून टाकावीं. त्या हुकुमाअन्वयें मुक्तेश्वराचें दुष्यंतशकुंतलाख्यान, व मोरोपंताच्या काव्यांपैकीं ययातीचें आख्यान व दुष्यंतशकुंतलाख्यान हीं तर ह्या आवृत्तींतून मुळींच गाळून टाकावीं लागलीं. त्याचप्रमाणें प्रायशः प्रत्येक कवीच्या वेंच्यांतून कांहीं कांहीं पद्यें गाळावीं लागलीं; व तीं पद्यें गाळल्यामुळें जेथें जेथें पूर्वापर संबंध सुटतो असें वाटलें तेथें तेथें तो दर्शविण्यासाठीं गद्यरूपानें संक्षेपतः कथाभाग घातला आहे. त्याचप्रमाणें कांहीं कांहीं वेंचे विशेष सुरस वाटले नाहींत तेही गाळून टाकिले आहेत.

२. ह्या आवृत्तींत मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान, मोरोपंताचें अंबरीषाख्यान व कर्णपर्वांतील कर्णार्जुनयुद्ध आणि कांहीं कवींचीं पदें असे सुरस व उपदेशपर वेंचे नवीन घातले आहेत.

३. सन १८७८ व सन १८८२ ह्या सालीं तयार झालेल्या नवनीताच्या आवृत्तीमध्यें पूर्वींच्या आवृत्तींतली ज्ञानेश्वराची कविता सारीच गाळून टाकिली होती ती गाळण्याचें कारण त्या त्या सालीं छापलेल्या आवृत्तींच्या प्रस्तावनेंत दर्शविलें आहे. आतां कित्येक एज्युकेशनल इन्स्पेक्तर ह्यांचें मत असें पडलें कीं, ती गाळून टाकिली हें चांगलें झालें नाहीं. त्यावरून ती कविता ह्या आवृत्तींत घालण्याविषयीं मे० दैरेक्तर साहेब ह्यांचा हुकूम आला; परंतु त्या वेळीं ही आवृत्ति सुमारें अर्धी अधिक छापून तयार झाली होती म्हणून ज्ञानेश्वरींतील वेंचे ( अध्याय १२ व १३ ) ह्या आवृत्तीमध्यें शेवटीं घालावे लागले.

४. पूर्वींच्या आवृत्तींतल्या चुका हल्लीं दुरुस्त केल्या आहेत. नवीन घातलेलीं प्रकरणें व त्यांत विशेषेंकरून ज्ञानेश्वरीचे अध्याय ह्यांतील

दुर्बोध स्थलें ह्यांवर पुष्कळ टीपा दिल्या आहेत. त्यांच्या साहाय्यानें वाचणाराला तीं प्रकरणें समजण्यास बहुधा अडचण पडणार नाहीं, असें वाटतें. ज्ञानेश्वरींच्या वेंच्यांतील शब्दांचीं जीं रूपें अगदीं जुन्या पुस्तकांत आढळलीं तींच एथें घातलीं आहेत; तेराव्या अध्यायांतील वेंच्यांपैकीं कांहीं फार गहन किंवा अश्लील वाटल्यावरून ते काढून टाकून संदर्भ जुळण्यासाठीं नवीन सुमारें २५ ओंव्या जास्त घातल्या आहेत.

पुणें,
ता० ६ माहे सप्तेंबर,
सन १८८६.
} रावजी शास्त्री गोडबोले.

---

## तिसऱ्या ( नवीन ) आवृत्तीची सूचना.

ही आवृत्ति तयार करित असतां, पूर्वींच्या आवृत्तींतल्या ज्या ज्या पद्यांमध्यें अश्लील किंवा असभ्य शब्द चुकून राहिलेले आढळले, तीं सारीं पद्यें काढून टाकिलीं आहेत. तसेंच ज्यांपासून वाचकांस विशेष सदुपदेश किंवा ज्ञान प्राप्त होण्यासारखें नाहीं, जीं विशेष मनोरंजक नाहींत, किंवा जीं विशेष पंथास अनुलक्षून आहेत, अशीं प्रकरणें, अभंग, श्लोक, कटाव इत्यादिक काढून टाकून त्यांचेऐवजीं बोधपर, ज्ञानप्रद, रसभरित आणि विशेष पंथास अनुलक्षून नसणारीं अशीं प्रकरणें वगैरे घातलीं आहेत. ह्या आवृत्तिमध्यें केलेले मुख्य फेरफार एणेंप्रमाणें:—

१. मागील आवृत्तीच्या सूचनेमध्यें लिहिलेल्या अडचणीमुळें ज्ञानेश्वर हा कवि मागच्या आवृत्तींत शेवटीं घातला होता, तो ह्या आवृत्तीमध्यें कालानुक्रमाप्रमाणें प्रथम घातला आहे.

२. रामदासाच्या कवितेंत शेवटीं आणखी दहा अभंग व दोन करुणाष्टकें घातलीं आहेत.

३. आनंदतनयाचें मार्कंडेयाख्यान फारसें सरस नसून विशेष पंथास अनुसरून असल्यामुळें तें काढून टाकिलें; आणि त्याच्याऐवजीं ( काव्ये-

तिहाससंग्रहामध्यें थोड्या दिवसांपूर्वीं प्रसिद्ध झालेल्या ) नरहरिकृत 'गंगारत्नमाला' नामक काव्यांतील वेंचे घातले आहेत. हें काव्य सुरस व प्रसादगुणप्रधान आहे; त्यांत गंगेच्या उगमापासून मुखापर्यंत जीं पुण्यक्षेत्रें व प्रख्यात ठिकाणें आहेत, त्यांचें वर्णन सुरस रितीनें केलेलें आहे. तें वर्णन जरी पौराणिक रितीचें आहे, तरी त्यापासून वाचकांचें मनोरंजन होऊन त्यांला नवीन माहितीही पुष्कळ होण्याजोगी आहे. ह्या काव्यांतले जे वेंचे एथें घेतले आहेत, ते सुरस असून इतिहासदृष्ट्या संगतवार असे घेतले आहेत.

४. 'उमारमासंवाद' ह्या एकाच विषयावर आनंदतनयाचें एक व प्रभाकराचें एक अशीं दोन काव्यें मागच्या आवृत्तींत होतीं, म्हणून त्यांपैकीं प्रभाकराचें ( कांहीं बरें असल्यामुळें तें ) कायम ठेवून आनंदतनयाचें काढून टाकिलें आहे.

५. 'सुदामचरित्र व द्रौपदीवस्त्रहरण' ह्यांवर मोरोपंत व अमृतराय ह्या दोन कवींचीं काव्यें मागच्या आवृत्तीमध्यें होतीं; त्यांपैकीं पंतांचीं काव्यें विशेष ग्राह्य, म्हणून तीं ठेवून अमृतरायाचे कटाव काढून टाकिले आहेत.

६. पुष्कळ आख्यानें नवनीतांतून वेळोवेळीं काढिलीं; परंतु त्यांतील शब्द कोशामध्यें तसेच राहून गेले होते, त्यांपैकीं आढळले ते हल्लीं काढून टाकिले आहेत; जे शब्द नवीन घालणें आवश्यक वाटलें, ते कोशांत घातले आहेत; आणि कित्येक शब्दांचे अर्थ अपुरे वाटल्यावरून ते पुरे केले आहेत.

७. एकंदर ग्रंथांतील टीपांमध्यें जेथें फेरफार करणें जरूर वाटलें तेथें तो करून, आवश्यक वाटलें तेथें नवीन टीपाही घातल्या आहेत.

हा सारा फेरफार करित असतां ग्रंथ उगीच मोठा न व्हावा ह्याविषयींही सावधगिरी ठेविली आहे.

पुणें,
ता० २१ माहे जुलै,
सन १८८९.

रावजी शास्त्री गोडबोले.

# चालू ( चौथ्या नवीन ) आवृत्तीची प्रस्तावना.

-:०*०:--

या आवृत्तींत ज्या आख्यानांस पूर्वीं अवतरणें दिलेलीं नव्हतीं त्यांस नवीन अवतरणें दिलीं आहेत. सर्व आख्यानें कोठून घेतलीं आहेत अशाबद्दल शोध करून ती माहिती दिली आहे. उदाहरणार्थ ' अंगदशिष्टाई ' एकनाथकृत ' भावार्थरामायण ' या ग्रंथांतून घेतलें आहे इतकेंच पूर्वीं ठाऊक होतें परंतु युद्धकांड अध्याय ६-८ मधून तें आख्यान घेतलें आहे ही माहिती नवीन आहे. तसेंच ' हरिश्चंद्राख्यान ' हें मुक्तेश्वरकृत वनपर्वांतलें काव्येतिहाससंग्रहांतून घेतलें आहे. परंतु महाभारतांत वनपर्वांत या आख्यानाचें नांवही कोठें सांपडलें नाहीं. सुभद्राहरण आर्या या आदिपर्वांतील म्हणून मोरोपंताच्या कवितांत लिहिलें होतें त्यावर टीपेंत आम्हीं या आर्या मोरोपंतकृत आहेत किंवा नाहींत अशाबद्दल संशय दाखविला आहे ( पृ० २२७ टीप ४ पहा ). परंतु शोधाअंतीं या आर्या मोरोपंतकृत तर खऱ्या परंतु त्या महाभारतांतील आदिपर्वांतील नसून श्रीमद्भागवत दशमस्कंधांतील आहेत असें मागाहून कळलें. दशमस्कंधाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. त्याला ब्रह्मदशम[1] असें नांव मोरोपंतांनीं दिलेलें आहे. त्याचेंच दुसरें नांव कृष्णविजय असेंही आहे. त्यांपैकीं उत्तरार्धांतील ८६ व्या अध्यायांतील या आर्या आहेत असें रा० रा० बा० दा० ओककृत काव्यसंग्रहावरून समजतें. अमुक एक केकेचा अर्थ कोणास पाहाण्याची इच्छा उत्पन्न झाली तर सटीक केकावलीच्या पुस्तकांत ती केका कोठें पाहावी हें कळावें याकरितां मोरोपंताच्या केकांपुढें कंसांत अंक दिले आहेत. या शिवाय टीपांत व मूळांत किरकोळ फेरफार पुष्कळ ठिकाणीं केलेले आहेत ते सूक्ष्मपणें वाचणाऱ्याच्या सहज ध्यानांत येतील. कोशांतही नवीन शब्द बरेच घातले आहेत. आज ही आवृत्ति सुमारें ६ वर्षांनीं निघत आहे तर त्यांत माझ्या अल्पमतीप्रमाणें जे शोध करावेसे वाटले तेवढे करून ही आवृत्ति छापिली आहे; तरी तींत

---

१ लघुदशम पंतांच्या मंत्रभागवतांत आहे असें रा० रा० ओक यांनीं काव्यसंग्रहांत छापलेल्या ' कृष्णविजय ' याजवरील टीपेंत म्हटलें आहे ( अंक १ ).

कोठें कमी जास्ती असेल तें कोणीं कळविल्यास पुढील आवृत्ति निघेल तेव्हां त्या त्या स्थळांचा विचार अवश्य केला जाईल.

पुणें ट्रेनिंग कॉलेज,
तारीख २० माहे दिसेंबर,
सन १८९४.

ना० वा० गोडबोले,
व्हाइस प्रिन्सिपाल.

---

## पांचव्या ( नवीन ) आवृत्तीची सूचना.

——:0*0:——

ह्या आवृत्तींत फारसे फेरफार केले नाहींत. कवींच्या चरित्रात्मक लेखांत कोठें कोठें थोडीशी अधिक माहिती दिली आहे. स्थलविशेषीं कठीण कवितांचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां कांहीं टीपा वगैरे दिल्या आहेत. तसेंच क्वचित् स्थळीं कित्येक गोष्टींचें विशेष स्पष्टीकरण करणें जरूर वाटलें तेथें तें केलें आहे. उदाहरणार्थ, साष्टांग नमस्कार, षड्गुणैश्वर्य इत्यादि गोष्टींचा विशेष खुलासा केला आहे. ह्याशिवाय कित्येक फेरफार केले आहेत, ते सूक्ष्मरीतीनें वाचणाऱ्यांच्या ध्यानीं येतीलच. १८७८ सालच्या आवृत्तीमध्यें " वेंचे कवींच्या कालानुक्रमाप्रमाणें साधतील तितके जुळले आहेत." असें म्हटलें आहे. परंतु मोरोपंताच्या वेंच्यांची तशी व्यवस्था झालेली नव्हती; ती ह्या आवृत्तींत केली आहे.

अलीकडे कांहीं मराठी लेखकांनीं नवनीतांतील कवींच्या जन्ममृत्युकालासंबंधानें टीका केली आहे. परंतु ह्यासंबंधानें जे लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांचा विचार करून पाहातां ह्या आवृत्तींत अद्यापि निश्चयात्मक मत ठरवितां येत नाहीं. म्हणून कवींच्या कालांत ह्या आवृत्तींत फेरफार केला नाहीं; व जेथें अशा प्रकारची माहिती पूर्वीं दिलेली नाहीं, तेथें नवीन देण्याचा प्रयत्न केला नाहीं.

पुणें ट्रेनिंग कॉलेज,
तारीख १९ माहे दिसेंबर,
सन १९०५.

ग० वि० डांगे,
व्हाइस प्रिन्सिपाल.

---

## सहाव्या ( नवीन ) आवृत्तीची सूचना.

—०:*:०—

ह्या आवृत्तींत पांचव्या आवृत्तींत नजरचुकीनें राहिलेल्या मुद्रण-व्यंगांच्या दुरुस्तीशिवाय दुसरे फेरफार केले नाहींत.

पुणें ट्रेनिंग कॉलेज, } शं० गो० साठे,
ता० ४ माहे डिसेंबर, सन १९०९इ. } ॲ० व्हाइस प्रिन्सिपाल.

# ज्ञानदेव.

ह्याचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स **आळंदी** एथें झाला. ह्याच्या आईचें नांव **रखमाबाई** व बापाचें नांव **विठ्ठलपंत.** विठ्ठलपंत हा **पैठण**ाजवळील **आपेगांव**च्या **गोविंदपंत** नांवाच्या कुळकर्ण्याचा मुलगा, व रखमाबाई ही आळंदी एथील **सिद्धोपंत** कुळकर्ण्याची मुलगी. विठ्ठलपंतानें **काशीं**तील **रामानंद** स्वामींकडून संन्यास घेतला होता; पण पुढें रखमाबाईच्या विनवणीवरून त्याच स्वामींनीं विठ्ठलपंताकडून पुनः गृहस्थाश्रम घेवविला. विठ्ठलपंत आळंदीस आपल्या सासुरवाडीसच रहात असे. तेथें त्यास **निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव** व **मुक्ताबाई** अशीं चार मुलें झालीं. तीं सर्व बाळपणापासूनच विरक्त, विठ्ठलभक्त व ज्ञानी अशीं होतीं. हीं संन्याशाचीं संतति म्हणून ब्राह्मणांनीं त्या तिघां मुलांच्या मुंजी न करितां त्या सर्वांस वाळींत टाकिलें होतें. पुढें ज्ञानेश्वरानें पैठणास कांहीं अद्भुत चमत्कार केल्यामुळें तेथील ब्राह्मणांनीं हीं मुलें सामान्य नव्हेत, देवांश आहेत, असें समजून त्यांस शुद्धिपत्र दिलें व त्यांची क्षमा मागितली.

ज्ञानेश्वरानें ***ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, स्वात्मानुभव, पंचीकरण** व **पांसष्टी** असे मुख्यत्वें ओंवीबद्ध ग्रंथ, व भक्तिपर, वैराग्यपर, व ज्ञानपर असे बहुत उत्कृष्ट अभंग केले आहेत. ह्याची वाणी सुरस असून उपमा, रूपकें, व दृष्टांत इत्यादिक अलंकारांनीं अशी परिपूर्ण आहे कीं, वर्ण्य

---

* या ग्रंथाचें नांव 'भावार्थदीपिका' असेंही आहे. ज्ञानेश्वरी हें नांव तिच्या कर्त्यावरून पडलें आहे. ज्ञानेश्वरी ही श्रीमद्भगवद्गीतेवर टीका आहे. अध्यात्म विषयाची ज्यांस गोडी आहे अशा लोकांत ह्या ग्रंथाची योग्यता फार आहे. वारकरी पंथाचे लोकांत ह्यास फार मान आहे. शिवाय मराठी भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनेंही हा ग्रंथ महत्त्वाचा आहे; कारण प्राकृतांतील मूळरूपें व कांहीं अपभ्रष्ट झालेलीं रूपें ह्यांत आहेत. एकनाथानें हा ग्रंथ शुद्ध केला; म्हणजे निरनिराळीं पाठांतरें पाहून ज्ञानेश्वराचें हृद्गत कोणतें तें ठरवून शुद्ध केला; ( श्री शके पंधराशें साहोत्तरीं । तारण नाम संवत्सरीं ॥ एकाजनार्दन अत्यादरीं । गीताज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध ॥ तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ). हा ग्रंथ शके १२१२ ह्या वर्षी लिहून पूर्ण झाला असा उल्लेख त्या ग्रंथाचे शेवटीं पुढील ओंवींत आहे—शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ॥ सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥

अर्थ जसा कांहीं वाचकांच्या प्रत्यक्ष डोळ्यांसमोर उभा राहतो, व त्याचें प्रतिपाद्य विषयाशीं तादात्म्य होतें. हा कवि आळंदी एथें शके १२१८ कार्तिक वद्य ८ स समाधिस्थ झाला.

निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांचें जन्मस्थान, जन्मशक व दिवस आणि हे समाधिस्थ झाल्याचीं स्थानें, मरणशक व दिवस खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

| कवीचें नांव. | जन्मशक व दिवस. | जन्मस्थान. |
|---|---|---|
| निवृत्तिनाथ—शके | ११९५ माघ वद्य १—— | आळंदी. |
| सोपानदेव —शके | ११९९ कार्तिक शुद्ध १५—— | ,, |
| मुक्ताबाई —शके | १२०१ आश्विन शुद्ध १—— | ,, |

| कवीचें नांव. | मरणशक व दिवस. | समाधिस्थान. |
|---|---|---|
| निवृत्तिनाथ—शके | १२२० पौष वद्य ११— | त्र्यंबकेश्वर. |
| सोपानदेव— शके | १२१९ वैशाख शुद्ध ११— | सासवड. |
| मुक्ताबाई— शके | १२२० वैशाख वद्य ११— | तापीनदीच्या कांठीं. |

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय १२ वा.

### ओंव्या.

जो सर्वां[1] भूतांचे ठायीं ॥ द्वेषातें नेणेचि कहीं ॥ आप-परु[2] नाहीं ॥ चैतन्या[3] जैसें ॥ १ ॥ उत्तमातें धरिजे ॥ अधमातें अव्हेरिजे ॥ हें कांहींचि नेणिजे ॥ वसुधा जेवीं ॥२॥ कां[4] रायाचे देह चाळूं[5] ॥ रंका परौतें[6] गाळूं[7] ॥ हें न म्हणेचि कृपाळू ॥ प्राण पैं गा ॥ ३ ॥ गाईची तृषा हरूं ॥ व्याघ्रा विष होऊनि मारूं ॥ ऐसें नेणेचि कां करूं ॥ तोय जैसें ॥ ४ ॥ तैसी अघवियाची[8] भूतमात्रीं ॥ एकपणें जया मैत्री ॥ कृपेसी धात्री[9] ॥ आपण जो ॥ ५ ॥ आणि मी हे भाष नेणे[10] ॥ माझें कांहींचि न म्हणे ॥ सुख दुःख जाणणें ॥ नाहीं जया ॥ ६ ॥ वार्षियेवीणें[11]

१ कर्धी. २ स्वकीय परकीय. ३ चलनवलनादिक व्यापार जिच्या योगानें चालतात ती जीवनकला ज्याप्रमाणें सर्व जीवांमध्यें सारख्या भावानें राहते त्याप्रमाणें; ( चैतन्या म्ह० चिच्छक्तीला ) ४ अथवा. ५ हालवूं, चालवूं. ६ एकीकडे, दूर. ७ टाकूं. ८ अवघ्या, सर्व. ९ पृथ्वी ( आधार ). १० आणखी ज्याला अहंता मुळींच नाहीं; ( भाष म्ह० बोलणें. ) ११ पर्जन्यवृष्टीवांचून.

सागरु ॥ जैसा जळें निर्भरु[1] ॥ तैसा निरुपचारु[2] ॥ संतोषी जो ॥ ७ ॥ हे[3] नों, तो आवडे ॥ मज जीवाचेनि पाडें[4] ॥ हेंही एथ थोकडें[5] ॥ रूपें करणें[6] ॥ ८ ॥ व्यापकु[7] आणि उदासु[8] ॥ जैसें कां आकाश ॥ तैसें जयाचें मानस ॥ सर्वत्र गा ॥ ९ ॥ संसार-व्यथे फिटला[9] ॥ जो नैराश्यें[10] विनटला[11] ॥ व्याधा हातोनि सुटला ॥ विहंगमु जैसा ॥ १० ॥ जो आत्मलाभासारिखें[12] ॥ गोमटें[13] कांहींचि न देखे ॥ म्हणोनि भोग-विशेखें[14] ॥ हरिखेना जो ॥ ११ ॥ पैं आपुलें जें साचें ॥ तें कल्पांतींही न वचे[15] ॥ हें जाणोनि गताचें[16] ॥ न शोची जो ॥ १२ ॥ वोखटें[17] का गोमटें[18] ॥ हें कांहींचि तया नुमटे[19] ॥ रात्रि-दिवस न घटे[20] ॥ सूर्यासि जेवीं ॥ १३ ॥ ऐसा बोधुचि केवळु[21] ॥ जो होऊनि असे निष्कळु ॥ त्याहीवरी भजनशीळु ॥ माझ्याठायीं ॥ १४ ॥ तरि तया ऐसें दुसरें ॥ आम्हां पढियंतें[22] सोयरें[23] ॥ नाहीं गा साचोकारें[24] ॥ तुझी आण पांडवा[25] ॥ १५ ॥ पार्था जयाचिया ठायीं ॥ वैषम्याची[26] वार्ता नाहीं ॥ रिपु-मित्रां दोहीं ॥ सरिसा[27] पाडु ॥ १६ ॥ कां घरींचिया उजियेड करावा ॥ पारखियां[28] आंधार पाडावा ॥ हें नेणेचि गा पांडवा ॥ दीप जैसा ॥ १७ ॥ जो खांडावया घाव घाली ॥ कां लावणी जयानें केली ॥ दोघां एकचि साउली ॥ वृक्षु जैसा ॥ १८ ॥ नातरी इक्षु-दंडु ॥ पाळितयां[29] गोडु ॥ गाळितयां[30] कडु ॥ नोहेचि जेवीं ॥ १९ ॥ अरि-मित्रीं तैसा ॥ अर्जुना जया भाव ऐसा ॥ मानापमानीं सरिसा ॥ होत जाय ॥ २० ॥ तिहीं ऋतूं[31] समान ॥ जैसें कां गगन ॥ तैसा एकचि मान ॥ शीतोष्णीं जया ॥ २१ ॥ दक्षिण उत्तर मारुता ॥ मेरु जैसा पांडु-सुता ॥ तैसा सुख-दुःख-प्राप्तां[32] ॥ मध्यस्थु जो ॥ २२ ॥ माधुर्यें[33] चंद्रिका ॥ सरिशी राया रंका ॥

१ पूर्ण भरलेला. २ साधनावांचून. ३ इतकेंच नाहीं. ४ सारखेपणानें, प्रमाणें. ५ उणें, थोडकें. ६ दृष्टांत देऊन सांगणें. ७ सर्व भरून राहणारें. ८ निरपेक्ष, अलिप्त. ९ मुकला, सुटला. १० आशारहित असल्यामुळें. ११ शोभला; ( पाठान्तर ) निवटला. १२ आत्मज्ञानाच्या प्राप्तीसारखें. १३ चांगलें. १४ विशेष प्रकारच्या विषयांच्या उपभोगानें. १५ जात नाहीं. १६ गेलेल्याविषयीं. १७ वाईट. १८ सुंदर, चांगलें. १९ उमटत नाहीं, भासत नाहीं. २० घडे. २१ एकरूप, कलंकरहित, शुद्ध. २२ आवडतें. २३ जिवलग. २४ खरोखर. २५ अर्जुना. २६ भेदबुद्धीची. २७ सारखी योग्यता. २८ परक्यांना. २९ राखणाराला. ३० चरकांत घालून रस काढणाराला. ३१ ऋतूंत. ३२ सुखदुःखें प्राप्त झालीं असतां. ३३ आल्हादकपणानें.

तैसा जो सकळिकां ॥ भूतां समु ॥ २३ ॥ अघविर्यी जगा एक ॥ सेव्य जैसें उदक ॥ तैसे जयातें तिन्हीं[1] लोक ॥ आकांक्षिती[2] ॥ २४ ॥ जो निंदेतें ने घे ॥ स्तुतीतें न श्लाघे ॥ आकाशा न लगे ॥ लेपु[3] जैसा ॥ २५ ॥ तैसें निंदे आणि स्तुति ॥ मान करूनि एके पंक्ती[4] ॥ विचरे प्राण-वृत्ति[5] ॥ जनीं वनीं ॥ २६ ॥ जो यथा-लाभें संतोखे ॥ अ-लाभें नें पोरुखे[6] ॥ पाऊसें-वीण न सुके ॥ समुद्र जैसा ॥ २७ ॥ आणि वायूसि एके ठायीं ॥ बिढार[7] जैसें नाहीं ॥ तैसा न धरीच कहीं[8] ॥ आश्रय जो ॥ २८ ॥ हें विश्वचि माझें घर ॥ ऐशी मती जयाची स्थिर ॥ किंबहुना चराचर ॥ आपण जाहला ॥ २९ ॥ मग यावरी ही पार्था ॥ माझ्या भजनीं आस्था ॥ तरी तयातें मी माथां ॥ मुकुट करीं ॥ ३० ॥

## अध्याय १३ वा.

### ओंव्या.

ह्या ओंव्या भगवद्गीतेंतील पुढील श्लोकावर आहेत—

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।

आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ अध्याय १३, ७.

**अ-मानित्व**-तरि कवणेही विषींचें[9] ॥ साम्य होणें न रुचे ॥ संभावितपणाचें ॥ वोझें जया ॥ १ ॥ औथिलेचि गुण वानितां ॥ मान्यपणें मानितां ॥ योग्य-तेचें येतां ॥ अंगा रूप ॥ २ ॥ तैं गजबजों लागे कैसा ॥ व्याधें रुंधलों मृगु जैसा ॥ कां बाहीं तरतां वळसों ॥ दाटलों जेवीं ॥ ३ ॥ पार्था तेणें पाडें ॥ सन्मानें जो सांकडे[16] ॥ गरिमेतें अंगाकडे ॥ येवोंच नेदी ॥ ४ ॥ पूज्यता डोळां न देखावी ॥ स्व-कीर्ति कानीं नायकावी ॥ हा अमुका ऐसी नोहावी[18] ॥ सेचि लोकां[19] ॥ ५ ॥ तेथ सत्काराची कें[20] गोठी ॥ कें[20] आदरीं देईल भेटी ॥ मरणेसीं[22] साटी[22] ॥ नमस्कारितां ॥ ६ ॥ वाचस्पतीचेनि पाडें ॥ सर्वज्ञता तरी

१ शत्रु, मित्र, उदासीन हे तीन किंवा स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ. २ इच्छितात. ३ (कशाचाही) लेप. ४ ओळीला. ५ प्राण राहतील अशा प्रकारानें. ६ रुसत नाहीं, दुःखी होत नाहीं. ७ राहणें, वस्ती. ८ कोठें. ९ आपल्या गुणांच्या स्तुतीविषयीं निरिच्छा. १० कोणत्याही गोष्टींत हा अमुकाच्या बरोबरीचा आहे असें म्हणणें ज्याला आवडत नाहीं. ११ आहेत तेव. १२ घाबरूं लागतो. १३ अडविला. १४ हातांनीं पोहून जात असतां. १५ भोंवऱ्यांत. १६ सांपडला. १७ संकटांत पडतो. १८ न व्हावी. १९ स्मरण. २० कोठची, कसली. २१ आदरानें. २२ मरणाची संगति झाली असें वाटतें म्हणजे मरणप्राय वाटतें.

जोडे ॥ परि वेडिवेमाजि दडे ॥ महिमे भेणें ॥ ७ ॥ चातुर्य लपवी ॥ महत्त्व हारवी ॥ पिसेपण मिरवी ॥ आवडोनी ॥ ८ ॥ लौकिकाचा उद्वेगु[1] ॥ शास्त्रांवरी उबगु[2] ॥ उगेपणीं चांगू ॥ आथी भरू[3] ॥ ९ ॥ जगें अवज्ञाचि करावी ॥ संबंधीं सोय[4] न धरावी[5] ॥ ऐसी ऐसी जीवीं ॥ चाड बहु ॥ १० ॥ माझें असतेपण लोपो ॥ नाम-रूप हारपो ॥ मज झणें वासिपो[5] ॥ भूत-जातें ॥ ११ ॥

**अ[6]-दंभित्व**-तरि अ-दंभित्व ऐसें ॥ लोभियाचें मन जैसें ॥ जिनु जावो परि नुमैसे ॥ ठेविला ठावो[7] ॥ १२ ॥ तयापरी किरीटी ॥ पडिलाही प्राण-संकटीं ॥ परि सु-कृत ना प्रकटी ॥ अंगें[8] बोलें[9] ॥ १३ ॥ नानों[10] कृषिवळु आपुलें ॥ पांघुरवी[11] पेरिलें ॥ तैसें झांकी निपजलें ॥ दान-पुण्य ॥ १४ ॥ वरिवरी देह न पूंजी[12] ॥ लोकांतें न[13] रंजी[13] ॥ स्वधर्म वाग्ध्वजीं[14] ॥ बांधों[14] नेणे ॥ १५ ॥ परोपकार न बोले ॥ न मिरवी अभ्यासिलें ॥ न शके विकूं[15] जोडिलें[15] ॥ स्फीतीसाठीं ॥ १६ ॥ शरीर-भोगाकडे ॥ पाहतां कृपण आवडे[16] ॥ येऱ्हवीं धर्म-विषयीं थोडें ॥ बहु न म्हणे ॥ १७ ॥ किंबहुना स्व-धर्मीं थोरु ॥ अवसरीं उदारु ॥ आत्म-चर्चे[17] चतुरु ॥ येऱ्हवीं वेडा ॥ १८ ॥ पैं गा अ-दंभपण ॥ म्हणितलें तें हें जाण ॥ आतां आईक खूण ॥ अहिंसेची ॥ १९ ॥ **अ-हिंसा**-तरि अ-हिंसा बहुतीं परी ॥ बोलिली असे अवधारीं[18] ॥ आपुलालिया मतांतरीं ॥ निरूपिली ॥ २० ॥ परि ते ऐसी देखा ॥ जैशा खांडूनियां शाखा ॥ मग तयाचिया बुडुखा ॥ कुंपु[19] कीजे ॥ २१ ॥ कां बाहु तोडोनि पचविजे ॥ मग भुकेची पीडा राखिजे ॥ नाना देऊळ मोडोनि कीजे ॥ पौळि[20] देवा ॥ २२ ॥ तैसी हिंसाचि करूनि अ-हिंसा ॥ निपजविजे हा ऐसा ॥ पैं पूर्व-मीमांसा[21] ॥ निर्णयो[22] केला ॥ २३ ॥

१ कंटाळा, भीति. २ उपेक्षा, कंटाळा. ३ कांहीं न करितां स्वस्थ बसण्यांत ज्याचा भर आहे. ४ संबंध्यांशीं मिळून राहत नाहीं. ५ प्राणिमात्र मला कदाचित् भितील ते न भिवोत. ६ आंत एक व बाहेर एक असें न वागणें—किंवा लोकांकरितांच क्रिया करण्याचा स्वभाव नसणें. ७ उघड करीत नाहीं. ८ ठेव. ९ आपण स्वतः बोलून दाखवून. १० अथवा. ११ आच्छादी, लपवून ठेवी. १२ बाहेरून थाटमाट करीत नाहीं. १३ रंजवीत नाहीं. १४ आपलें सदाचरण आपण बोलून दाखवीत नाहीं. १५ प्रतिष्ठेसाठीं आपण संपादिलेलें खर्चीं घालीत नाहीं. १६ दिसे, वाटे. १७ आत्मज्ञानाच्या वाटाघाटींविषयीं. १८ ऐक. १९ कुंपण. २० आवार. २१ कर्मकांडसंबंधीं शंकांचें ज्यांत निवारण केलें आहे असा जैमिनीनें केलेला ग्रंथ त्यांत. २२ निर्णय.

जे अ-वृष्टीचेनि उपद्रवें ॥ गादलें[1] विश्व आघवें ॥ म्हणोनि पर्जन्येष्टी[2] करावे॥ नाना याग ॥२४॥ तंव तिये इष्टीचिया बुडीं ॥ पशु-हिंसा तंव रोकडी ॥ मग अ-हिंसेची थडी ॥ कैंची दिसे ॥ २५ ॥ पेंगिजे नुसुधी[3] हिंसा ॥ तेथ उगवेल काय अ-हिंसा ॥ परि नवल बापा धिंवसा[4] ॥ यां याज्ञिकांचा ॥२६॥ आणि आयुर्वेद[5] आघवा ॥ तो याचि मोहरा[6] पांडवा ॥ जो जीवाकारणें करावा ॥ जीव-घात ॥ २७ ॥ नाना-रोगें आहाळलीं[7] ॥ लोळतीं भूतें[8] देखिलीं ॥ ते हिंसा निवारावया केली ॥ चिकित्सा[9] पैं ॥ २८ ॥ तंव ते चिकित्से पहिलें[10] ॥ एकाचे कंद खाणविले ॥ आणि एका उपडविलें ॥ स-मूळीं स-पत्रीं॥२९॥ एकें आडमोडविलीं[11] ॥ अ-जंगमाचीं[12] खालें[12] काढविलीं ॥ एकें गर्भिणीं[13] उकडविलीं ॥ पुटामाजीं[14] ॥३०॥ अहो वसतीं[15] धवळारें[15] ॥मोडूनि केलीं देव्हारें॥नागऊनि वेव्हारें[16] ॥गवादी[17] घातली॥३१॥ मस्तक पांघुरविलें॥ तंव तळवटीं उघडें पडिलें॥ घर मोडोनि केले ॥ मांडव पुढें॥ ३२ ॥ नाना पांघरुणें ॥ जाळूनि जैसें तापणें[18] ॥कां जालें आंग-धुणें॥ कुंजराचें॥३३॥नातरी बैल विकूनि गोठा॥ पुंस[19] लावोनि[20] बांधिजे गांठी[21]॥ इया करणीं[22] कीं चेष्टीं[22] ॥ काइ हंसों ॥३४॥ एकीं धर्माचिया वाहणी[23] ॥ गाळूं आदरिलें पाणी ॥ तंव गाळितयां आहाळणी[24] ॥ जीव मेले ॥३५॥ एक न पचवितीचि कण ॥इये हिंसेचें भेण[26] ॥तेथ कदर्थले[27] प्राण॥ तेंचि हिंसा ॥ ३६ ॥ ऐसी हे अवधारीं ॥ निरूपिती परी ॥ आतां ययावरी ॥ मुख्य जें गा ॥ ३७ ॥ तें स्व-मत बोलिजेल ॥ अ-हिंसे रूप कीजेल ॥ जियां उठलियां आंतुलें[28] ॥ ज्ञान दिसे ॥ ३८ ॥ परि ते अंगिष्ठिलेनि अंगें[30] ॥

१ पीडलेलें. २ पाऊस पडावा म्हणून केलेले यज्ञयागादि (पर्जन्य+इष्टि). ३ नुसती. ४ फार इच्छा, उत्साह. ५ वैद्यशास्त्र. ६ मार्गाचा, दिशेकडे. ७ पीडलीं, पोळलीं. ८ प्राणी. ९ औषधाची योजना. १० आरंभीं. ११ तोडून साफ केलीं. १२ वृक्षाची साल. १३ विंचू वगैरे प्राणी सगर्भ असतां तळून त्यांची औषधांत योजना करितात त्यास अनुलक्षून हें लिहिलें आहे. १४ खालींवर झांकण घालून; (पायाला वाकचवडा वगैरे झाला असतां त्यावर गाभण बेडकुळी बांधितात, त्याला अनुलक्षून ही ओंवी आहे. सटीप व सार्थ ज्ञानेश्वरी, पृ. ३७७ टीप पहा.) १५ राहण्याचीं घरें, मंदिरें. १६ व्यापारी. १७ अन्नसत्र. १८ शेकत बसणें. १९पोपट. २०हाकून लावून. २१ पिंजरा. २२ ह्या कर्तव्यगोष्टी किंवा थट्टा. २३ संप्रदायाप्रमाणें. २४ गाळण्याच्या वस्त्राच्या. २५ त्रासानें. २६ कणांमध्यें जीवनशक्ति आहे तिचा नाश होईल ह्या भीतीनें. २७ त्रासले. २८ जी अहिंसा उत्पन्न झाली असतां. २९ आंतलें. ३० ती अहिंसा अंगीं बाणली असतां.

जाणिजे आचरतेनि वागें ॥ जैसी कसवटीचि सांगे ॥ वानियांतें ॥ ३९ ॥ तैसें ज्ञान-मनाचिये भेटी ॥ सरिसेंचि अ-हिंसेचें बिंबें[3] उठी ॥ तेंचि ऐसें किरीटी ॥ परिस आतां ॥ ४० ॥ तरि तरंगु नोलांडितु ॥ लहरी पायें न फोडितु ॥ सांचलु न मोडतु ॥ पाणियाचा ॥४१॥ वेगें आणि लेसां ॥ दिठी घालूनि आंविसां ॥ जळीं बकु जैसा ॥ पाउल सुयें ॥४२॥ कां कमळावरी भ्रमर ॥ पाय ठेविती हलुवारें ॥ कुचंबेल केसर ॥ इया शंका ॥ ४३ ॥ तैसे परमाणु पांगुतले ॥ जाणूनि जीव सानुले[12] ॥ तेथ कारुण्यामाजिं पाउलें ॥ लपवूनि चाले[13] ॥४४॥ ते वाट कृपेची करितु ॥ ते दिशाची स्नेहभरितु ॥ जीवां तळीं आंथरितु ॥ आपुला जीवु ॥४५॥ ऐसिया जतना ॥ चालणें जया अर्जुना ॥ हें अनिर्वाच्यें पारिमाणों ॥ पुरिजेनां ॥ ४६ ॥ पैं मोहाचेनि सांगडें ॥ लासी[16] पिलीं धरी तोंडें ॥ तेथ दांतांचे आगरडे[17] ॥ लागती जैसे ॥ ४७ ॥ कां स्नेहाळू माये ॥ तान्हयाची वास पाहे ॥ तिये दिठी आहे ॥ हळूवारें जें ॥ ४८ ॥ तैसेनि मार्दवें पाय ॥ भूमिवरी न्यसीतु जाये ॥ लागती तेथ होय ॥ जीवां सुख ॥ ४९ ॥ ऐसिया लघिमा चालतां ॥ कृमि कीटक पांडुसुता ॥ देखे, तरि माघुता ॥ हळूचि निघे ॥ ५० ॥ मुंगिये मेरु नोलांडवे ॥ मशका सिंधु न तरवे ॥ तैसें भेटलिया न करवे ॥ अति-क्रम ॥५१॥ पुढां स्नेह पाझरे ॥ माघां चालती अक्षरें ॥ शब्द पाठीं अवतरे ॥ कृपा आधीं ॥ ५२ ॥ तंव बोलणेंचि नाहीं ॥ बोलों म्हणे जरी कांहीं ॥ तरि बोलें कोणाही ॥ खुपेल कां ॥ ५३ ॥ बोलतां अधिकाहि निघे ॥ तरि कोणाही वर्मीं न लगे ॥ आणि कवणासि न रिघे ॥ शंका मनीं ॥ ५४ ॥ तैसे साचें[23] आणि मवाळें[23] ॥ मितलें[24] आणि रसाळ ॥ शब्द जैसे कल्लोळ ॥ अमृताचे ॥५५॥ अवयव आणि शरीर ॥ हे वेगळाले काय कीर ॥ कीं रस आणि नीर ॥ सिनानीं आर्थी ॥५६॥ म्हणोनि हे जे सर्व ॥ सांगीतले बाह्यभावें ॥ तें

---

१ आचरणाच्या मार्गानें. २ कसाला. ३ स्वरूप दिसूं लागतें. ४ न ओलांडतां. ५ स्थिरता. ६ फार जपून. ७ आमिषाकडे. ८ ठेवितो. ९ फार हळू. १० चिरडेल. ११ परमाणूंनीं आच्छादिलेले. १२ अतिशय लहान. १३ फार जपून चालतो. १४ त्याचें ममताळूपणाचें वर्तन बोलून दाखवितां येत नाहीं व तें किती आहे हें मापतां येत नाहीं म्हणजे किती मोठें आहे हें कळत नाहीं. १५ लोभानें, प्रीतीनें. १६ मांजरी. १७ अणकुच्या, अग्रें, टोंकें. १८ वाट. १९ तिच्या दृष्टींमध्यें जसें कारुण्य दिसून येतें तसें हें कारुण्य. २० ठेवीत चालतो. २१ हळूहळू. २२ अनादर, उल्लंघन. २३ सत्य व मृदु. २४ मोजकें, परिमित. २५ निश्चयानें. २६ वेगळे वेगळे. २७ बाहेरील वागणुकीचे प्रकार.

मनचि गा सावयव ।। ऐसें जाण ॥५७॥ जें भुईं बीज खोविलें[1] ।। तेंचि वरी रुखें[2] जाहलें ॥ तैसें इंद्रिय-द्वारा फांकलें ।। अंतरचि कीं ॥ ५८ ॥ पैं मानसींचि जरी ।। अ-हिंसेची अवसरी[3] ।। तरि कैंची[4] बाहेरी[4] ॥ बोसंडेल ॥५९॥ वांचूनि[5] मनींचि नाहीं ।। तें वाचेसि उमटेल काई ।। बीजेंवीण भुईं ।। अंकुर असे ॥ ६० ॥ म्हणोनि मनपण जैं मोडे ॥ तैं इंद्रिया आधींचि उबडें[6] ॥ सूत्रधारेंवीण साइखडें[7] ॥ वावो[8] जैसें॥ ६१॥ उवमींचि वाळूनि जाये ॥ तें वोघीं कैचें वाहे ।। जीवो गेलिया आहे ॥ चेष्टा देहीं ॥ ६२ ॥ तैसें मन हेतु[9] पांडवा ॥ मूळ यया इंद्रिय-भावा ॥ हेंचि राहटे[10] आघवा ॥ द्वारीं इहीं ॥६३॥ परि जियें वेळीं जैसें ॥ जें होऊनि आंत असे ॥ बाहेरि ये तैसें ॥ व्यापाररूपें ॥ ६४ ॥ यालागीं साचोकारें ॥ मनीं अ-हिंसा थांवे[11] थोरें[11] ॥ जैसी पिकली[12] द्रुती[13] आदरें[14] ॥ बोभातें[15] निघे ॥६५॥ तैसें दयालुत्व आपुलें ॥ मनें हाता-पायां आणिलें[16] ॥ मग तेथ उपजविलें ॥ अ-हिंसेतें ॥ ६६ ॥ या कारणें किरीटी ॥ इंद्रियांचिया गोठीं ॥ मनाचि योग्ये राहाटी ॥ रूप केलें ॥६७॥ ऐसा मनें देहें वाचा ॥ सर्व संन्यासें[17] दंडाचा[17] ॥ जाहाला ठायीं जयाचा ॥ देखशील ॥६८॥ तो जाण, वेल्हाळें[18] ॥ ज्ञानाचें वेळाउळें[19] ॥ हें असो निखळें[20] ॥ ज्ञानचि तो ॥ ६९ ॥ **क्षांति**-म्हणे[21] उन्मेष-सु-लोचनां ॥ सावध होईं अर्जुना ॥ करूं तुज ज्ञाना ॥ वोळखी आतां ॥७०॥ तरि ज्ञान गा तें एथें ॥ वोळख तूं निरुतें[22] ॥ आक्रोशेंवीण[23] जेथें ॥ क्षमा असे ॥७१॥ अ-गाध सरोवरीं ॥ कमळिणी जियापरी ॥ कां सदैवांचियां[24] घरीं ॥ संपत्ति जैसी ॥ ७२ ॥ पार्था तेणें पाडें ॥ क्षमा जयातें वाढे॥तोही[25] लक्षे तें[25] फुडें ॥ लक्षणें सांगों ॥७३॥ तरि पढियंतें लेणें ॥ अंगीं भावें[26] जेणें[26] ॥ धरिजे, तेविं साहणें ॥ सर्वेचि जया ॥७४॥ त्रिविध[27] मुख्य आघवे ॥ उपद्रवांचे[28] मेळावे ॥ वरि पडलिया नव्हे ॥

---

१ पेरिलें. २ वृक्ष, झाड. ३ प्रतिबंध, हरकत ( पाठा० ) अनवसरी. ४ बाहेर कशी येईल ! ५ शिवाय. ६ रिकामें, व्यर्थ. ७ कळसूत्री बाहुलें. ८ व्यर्थ. ९ कारण. १० व्यापार करितें. ११ पूर्ण स्थिरावते. १२ पिकलेल्या फळांचा वगैरे. १३ सुवास. १४ आपण होऊन. १५ बोभाट करीत. १६ त्यास आकार दिला. १७ त्रिदंडी संन्यास. १८ विस्तृत, आवडतें. १९ घर. २० सर्व. २१ ह्याचा अध्याहृत कर्ता 'कृष्ण'. २२ ज्ञानदृष्टि आहे ज्याला अशा. २३ खरें. २४ दुःखावांचून. २५ भाग्यवानांच्या. २६ अनाक्रोश क्षमायुक्त पुरुष पूर्ण मनांत येईल तें लक्षण स्पष्ट सांगतों. २७ ज्या आवडीनें. २८ आधिदैविक (देवतेच्या क्षोभापासून होणारा ताप—जसा वीज पडणें, सांत येणें, इ०); आध्यात्मिक—(मनाच्या क्षोभापासून किंवा शारीररोगापासून होणारा ताप इ०); आणि आधिभौतिक—(पृथिव्यादि पंचमहाभूतांच्या क्षोभापासून होणारा ताप—धरणीकंप इ०); असे त्रिविध ताप.

थांकडा जो ॥ ७५ ॥ अपेक्षित पावे ॥ तें जगीं तोषें मानावें ॥ अनपेक्षिताहि करवे ॥ मान तोचि ॥ ७६ ॥ जो मानापमानातें साहे ॥ सुख-दुःख जेथ सामाये[1] ॥ निंदा-स्तुती नोहे ॥ दुखंडु[2] जो ॥ ७७ ॥ उन्हाळेनि जो न तापे ॥ हिमवंतीं[3] न कांपे ॥ कायसानेही[4] न वासिपे[5] ॥ पातलेयां[6] ॥ ७८ ॥ स्व-शिखरांचा भारु ॥ नेणे जैसा मेरु ॥ कां धरा यज्ञ-सूकरु[7] ॥ वोझें न म्हणे ॥ ७९ ॥ नाना चराचरीं भूतीं ॥ दाटणी नव्हे क्षिती ॥ तैसा नाना द्वंद्व-प्राप्ती[8] ॥ वासिजेना ॥ ८० ॥ घेऊनि जळाचे लोटु ॥ आलिया नदी-नदांचे संघाटु[9] ॥ करी वाडें[10] पोटु ॥ समुद्र जेवीं ॥ ८१ ॥ तैसें जयाचिया ठायीं ॥ न साहणें कांहींचि नाहीं ॥ आणि साहतु ऐसेंही ॥ स्मरण नुरे ॥ ८२ ॥ शरीरा जें पातलें ॥ तें करूनि घाली आपुलें ॥ तेथ साहतेनि[11] नवलें[12] ॥ घेपिजेना ॥ ८३ ॥ हे अनाक्रोशें क्षमा[13] ॥ जेथ आथी प्रियोत्तमा ॥ जाण तेणें महिमा ॥ ज्ञानासि गा ॥ ८४ ॥ तो पुरुष पांडवा ॥ ज्ञानाचा वोलावा ॥ आतां परिस आर्जवा ॥ रूप करूं ॥ ८५ ॥

आर्जव[14]–तरि आर्जव तें ऐसें ॥ प्राणाचें सौजन्य[15] जैसें ॥ आवडतयाहि दोषें[16] ॥ एकचि पैं गा ॥ ८६ ॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु ॥ न करी जेवीं चंडांशु ॥ जगा एक अवकाशु ॥ आकाश जैसें ॥ ८७ ॥ तैसें जयाचें मन ॥ माणुसाप्रति आन[17] आन ॥ नोहे, आणि वर्तन ॥ ऐसें पैं तें ॥ ८८ ॥ जें जगाचि सनोळख[18] ॥ जगेंसीं जुनाट सोयरिक ॥ आप पर हे भाखें[19] ॥ जाणणें नाहीं ॥ ८९ ॥ भलतेणेंसीं मेळु[20] ॥ पाणिया ऐसा ढाळु[21] ॥ कवणें विखीं आडळु[22] ॥ न घे चित्त ॥ ९० ॥ वारियाची[23] धांव ॥ तैसे सरळ भाव ॥ शंका आणि हांव[24] ॥ नाहीं जया ॥ ९१ ॥ मायेपुढें बाळका ॥ रिगतां नाहीं शंका ॥ तैसें मन देतां लोकां ॥ नालोची[25] जो ॥ ९२ ॥ फांकलिया[26] इंदीवरा ॥ परिवर[27] नाहीं धनुर्धरा ॥ तैसा कोन-कोंपरा ॥ नेणेचि जो ॥ ९३ ॥ चोखाळपणें[28] रत्नाचें ॥ रत्नावरी किरणाचें ॥ तैसें पुढां मन जयाचें ॥ करणें पाठीं ॥ ९४ ॥ दिठी नाहे मिणधी[29] ॥ बोलणें नाहीं संदिग्धी[30] ॥ कवणेंसीं

---

१ सामावलें जातें. २ दुभंगलेला. ३ हिंवाळ्यांत. ४ कशानेंही. ५ भीत नाहीं. ६ प्राप्त झालेल्यास. ७ वराह अवतार. ८ सुखदुःखादि द्वंद्वांच्या प्राप्तीनें. ९ समुदाय. १० मोठें. ११ सहन करितां. १२ सहन केल्याबद्दलच्या आश्चर्यानें गुंडाळला जात नाहीं; म्हणजे ज्याला सहन केल्याबद्दल आश्चर्य वाटत नाहीं. १३ दुःखावांचून शांति. १४ कापट्यराहित्य, सरळपणा. १५ प्रीति. १६ उद्देशानें. १७ निरनिराळें. १८ ओळखीचें. १९ बोलणें. २० संगति. २१ रीत. २२ अडथळा. २३ वाऱ्याची. २४ इच्छा. २५ विचार करीत नाहीं. २६ फुललेल्या. २७ गुप्त ठिकाण. २८ प्रकाशितपणा. २९ ओशाळलेली. ३० संशयात्मक.

हीन-बुद्धी[1] ॥ राहाटों नेणे ॥ ९५ ॥ दाहाही इंद्रियें प्रांजळें[2] ॥ निःप्रपंचें[3] निर्मळें ॥ पांचही[4] पाळव[5] मोकळे ॥ आठही पाहरें[6] ॥ ९६ ॥ अमृताचि धार ॥ तैसें उजू अंतर ॥ किंबहुना जो माहेर ॥ या चिन्हाचें ॥ ९७ ॥ तो पुरुष सुभटा ॥ आर्जवाचा आंगवटा ॥ जाण तेथेंचि घरटा ॥ ज्ञानें केला ॥ ९८ ॥ **आचार्योपासन (गुरु-भक्ति)**—आतां ययावरी ॥ गुरु-भक्तीची परी ॥ सांगों गा अवधारीं ॥ चतुर-नाथा ॥ ९९ ॥ तैसें सबाह्य आपुलें ॥ जेणें गुरु-कुळा वोपिलें ॥ आपण पैं केलें ॥ भक्तीचें घर ॥ १०० ॥ तिये कडोनि येतसे वारा ॥ देखोनि धांवे सामोरा ॥ आडवडे[9] म्हणे घरा ॥ बीजें[10] कीजो ॥ १०१ ॥ परि गुरु-आज्ञा धरिलें ॥ देह गांवीं असे एकलें ॥ वांसरुवां[11] लाविलें ॥ दावें जैसें ॥ १०२ ॥ म्हणे कै हें बिरडें[12] फिटेल[13] ॥ कै तो स्वामी भेटेल ॥ युगाहूनि वडिल[14] ॥ निमिष मानी ॥ १०३ ॥ ऐसें या गुरु-ग्रामीचें आलें ॥ का स्वयें गुरुंनींचि धाडिलें ॥ तरि गतायुष्या जोडलें ॥ आयुष्य जैसें ॥ १०४ ॥ का सुकतया अंकुरा ॥ वरि पडिलिया पीयूष-धारा ॥ नाना अल्पोदकींचा सागरा ॥ आला मासा ॥ १०५ ॥ नातरी रंकें निधान देखिलें ॥ का आंधळेया डोळे उघडले ॥ भणंगाचिया आंगा आलें ॥ इंद्र-पद ॥ १०६ ॥ तैसा गुरु-कुळाचेनि नांवें ॥ महा-सुखें अतां थोरावे ॥ जे कोडें[16] हूनि[17] पोटाळवे[18] ॥ आकाश का ॥ १०७ ॥ पैं गुरु कुळीं ऐसी ॥ आवडी जया देखसी ॥ जाण ज्ञान तयापाशीं ॥ पाइकी[19] करी ॥ १०८ ॥ **अर्चन**—का चैतन्याचिये[20] पोवळी ॥ माजि आनंदाचिया राउळीं ॥ श्री-गुरु-लिंगा[21] ढाळी[22] ॥ ध्यानामृतें[23] ॥ १०९ ॥ उदयेजतां बोधार्का ॥ बुद्धीची[24] डाळ सात्विका ॥ भरोनियां त्र्यंबका ॥ लाखोली वाहे ॥ ११० ॥ काळ-शुद्धी[25] त्रिकाळीं ॥ जीवदशा[26] धूप जाळी ॥ ज्ञान-दीपें वोवाळी ॥ निरंतर ॥ १११ ॥ सामरस्याची[27] रस-सोय[28] ॥ अखंड अर्पित जाय ॥ आपण भराडी[29] होय ॥ गुरु तो लिंग ॥ ११२ ॥ **सख्य**—एकाधिये वेळे ॥ गुरु माय करी भा-

---

१ हा नीच आहे अशा समजुतीनें २ सरळ. ३ विषयाविषयीं विमुक्त. ४ अंतःकरण-पंचक—अंतःकरण, मन, चित्त, बुद्धि, अहंकार. ५ प्रहर ६ स्वरूप किंवा मूर्ति. ७ ठिकाण. ८ अंतर्बाह्य ( शरीर व मन ). ९ नमस्कार घालितो. १० आगमन. ११ वासराला. १२ पेडें १३ सुटेल. १४ मोठें १५ निकामपणाच्या. १६ आवडीनें. १७ पादपूरणार्थक अव्यय. १८ आलिंगावें. १९ चाकरी. २० ज्ञानाच्या. २१ श्रीगुरुरूप लिंग (महादेवाचें) त्यास. २२ घाली. २३ ध्यानरूप अमृत ( उदक ). २४ शुद्धसत्वगुण जी बुद्धि हांच डाळ. २५ तिन्ही शुद्ध काळीं. २६ जीवत्वरूप. २७ ऐक्यानी. २८ पाक किंवा पक्वान्न. २९ गोसावी, पुजारी.

व-वळें ॥ मग स्तन्य-सुखें[1] लोळे ॥ अंकावरी ॥ ११३ ॥ नातरी गा किरीटी ॥ चैतन्य-तरु-तळवटी ॥ गुरु धेनु आपण पोटीं ॥ वत्स होय ॥ ११४ ॥ गुरु-कृपा-स्नेह सलिलीं[2] ॥ आपण होय मासोळी ॥ कोणे एके वेळीं ॥ हेंचि भावी ॥ ११५ ॥ गुरु कृपामृताचे वडपे[3] ॥ आपण सेवा-वृत्तीचें होय रोप ॥ ऐसेसे संकल्प ॥ विये मन ॥ ११६ ॥ चक्षु-पक्षेंवीण ॥ पिलूं होय आपण ॥ कैसें पैं अपारपण ॥ आवडीचें ॥ ११७ ॥ गुरूतें पक्षिणी करी ॥ चारा घे चांचूवरी ॥ गुरु तारू, धरी ॥ आपण कास ॥ ११८ ॥ ऐसे प्रेमाचेनि थावें[4] ॥ ध्यानचि ध्यानें[5] प्रसवे ॥ पूर्ण-सिंधू हेलावे[6] ॥ फुटती जैसे ॥ ११९ ॥ किंबहुना यापरी ॥ श्री गुरु-मूर्ती अंतरीं ॥ भोगी, आतां अवधारीं ॥ बाह्य सेवा ॥ १२० ॥ दास्य—तरि जीवीं ऐसें आवांके[7] ॥ म्हणे दास्य करीन निकें ॥ जेणेनि गुरु कौतुकें ॥ माग म्हणती ॥ १२१ ॥ तैसिया साच्या उपास्तीं[8] ॥ गोसावी[9] प्रसन्न होती ॥ तेथ मी विनंती ॥ ऐसी करीन ॥ १२२ ॥ म्हणेन तुमचा देवा ॥ परिवार जो आघवा[10] ॥ तेतुलीं रूपें होआवीं ॥ मीचि एक ॥ १२३ ॥ आणि उपकरणीं[11] आपुलीं ॥ उपकरणें आथी जेतुलीं ॥ माझीं रूपें तेतुलीं ॥ होआवीं स्वामी ॥ १२४ ॥ ऐसा मागेन वरु ॥ तेथ हो म्हणती श्री-गुरु ॥ मग तो परिवारु ॥ मीचि होईन ॥ १२५ ॥ उपकरण-जात सकळिक ॥ तें मीचि होईन एकेक ॥ तेव्हां उपास्तीचें कौतुक ॥ देखिजेल ॥ १२६ ॥ आपुलियां गुणांचीं लेणीं ॥ करिन गुरु-सेवे स्वामिणी ॥ हें असो, होईन गवसणी[12] ॥ गुरु-भक्तीसी ॥ १२७ ॥ गुरु-स्नेहाचिये वृष्टी ॥ मी पृथ्वी होईन तळवटीं ॥ ऐसिया मनोरथांचिया सृष्टी ॥ अनंता रची ॥ १२८ ॥ म्हणे श्री-गुरुचें भुवन ॥ आपण मी होईन ॥ आणि दास होऊनि करीन ॥ दास्य तेथिचें ॥ १२९ ॥ ताट मी काढीन ॥ शेज मी झाडीन ॥ चरण-संवाहनें[13] ॥ मीचि करीन ॥ १३० ॥ जंव देह हें असेल ॥ तंव वोळगी[14] ऐसी कीजेल ॥ मग देहांतीं[15] नवल ॥ बुद्धि[15] आहे ॥ १३ ॥ परि जीत मेला न संडीं ॥ निमेष

१ स्तनांतील दूध पिण्याच्या सुखानें. २ वृष्टि. ३ चोंचीनें. ४ पूर्णत्वानें, बळानें. ५ पुष्कळ ध्यानें. ६ लाटा. ७ हुरूप धरतो. ८ भक्तीनें. ९ गुरु. १० व्हावा. ११ उपयोगाचीं. १२ आच्छादन, पिशवी. १३ पाय रगडणें. १४ सेवा. १५ देहावसान झालें तरी गुरूची सेवा करण्याची त्याची बुद्धि तशीच राहते ह्यांत नवल काय?

लोकां न धाडीं ॥ ऐसेनि गणावयां कोडी ॥ कल्पांचियां[1] ॥ १३२ ॥ जो गुरु-दास्यें कृश ॥ जो गुरु-प्रेमें सपोषु[2] ॥ जो गुरु-आज्ञे निवासु ॥ आपणचि ॥ १३३ ॥ गुरु-संप्रदाय-धर्म ॥ तेचि जयाचे वर्णाश्रम ॥ गुरु-परिचर्या[3] नित्य-कर्म ॥ जयाचें गा ॥ १३४ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता ॥ गुरु माता गुरु पिता ॥ जो गुरु-सेवेपरता ॥ मार्ग नेणे ॥ १३५ ॥ जयाचें वक्त्र ॥ वाहे गुरु-नामाचे मंत्र ॥ गुरु-वाक्यावांचूनि शास्त्र ॥ हातीं न शिवे ॥ १३६ ॥ जया इये भक्तीची चाड ॥ जया इये विषयींचें कोड ॥ जो हे सेवेवांचूनि गोड ॥ न मनी कांहीं ॥ १३७ ॥ तो तत्त्व-ज्ञानाचा ठावो ॥ ज्ञाना तेणेंचि आवो ॥ हें असो, तो देवो ॥ ज्ञान भक्त ॥ १३८ ॥ **शौच(शुचित्व)**–म्हणे शुचित्व गा ऐसें ॥ जयापाशीं दिसे ॥ आंगमनें जैसें ॥ कापुराचें ॥ १३९ ॥ का रत्नाचें द-ळवाडें[4] ॥ जैसें सबाह्य चोखडें[5] ॥ आंत बाहेरि एके पाडें ॥ सूर्य जैसा ॥ १४० ॥ बाहेरि कर्में क्षाळला ॥ भीतरीं ज्ञानें उजळला ॥ इहीं दोहीं परी आला ॥ पाखाळों[6] एका ॥ १४१ ॥ किंबहुना यिया परी ॥ बाह्य चोख[7] अवधारीं ॥ आणि ज्ञान-दीप अंतरीं ॥ म्हणोनि शुद्ध ॥ १४२ ॥ येऱ्हवीं तरी पांडु-सुता ॥ अंतर शुद्ध नसतां ॥ बाहेरि[8] कर्म तें सर्वथा ॥ विटंबु गा ॥ १४३ ॥ मृत जैसा शृंगारिला ॥ गाढव तीर्थीं न्हाणिला ॥ कडु-दुधिया माखिला ॥ गुळें जैसा ॥ १४४ ॥ तैसें कर्मीं वरिचिलेकडां[8] ॥ न सरे थोरें मोलें कुडा[9] ॥ नव्हे मादिरेचा घडा ॥ पवित्र गंगे[10] ॥ १४५ ॥ म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें ॥ मग बाह्य लाभे स्वभावें ॥ वरि ज्ञान कर्में संभवे ॥ ऐसें कें[11] जोडे[11] ॥ १४६ ॥ यालागीं बाह्य भाग ॥ कर्में धूतला चांग ॥ ज्ञानें फिटला वंग[12] ॥ अंतरींचा ॥ १४७ ॥ तेथ अंतर-बाह्य गेलें ॥ निर्मळत्व एक जाहलें ॥ किंबहुना उरलें ॥ शुचित्वचि ॥ १४८ ॥ पाणियें हिरा न भिजे ॥ आधणीं हरळ[13] न शिजे ॥ तैसी विकल्प-जातीं न लिंपिजे ॥ मनोवृत्ति ॥ १४९ ॥ तया नांव शुचित्व-पण ॥ पार्था गा संपूर्ण ॥ हें देखसी तेथ जाण ॥ ज्ञान असे ॥ १५० ॥ **स्थैर्य**–आणि स्थिरता साचें ॥ घर रिघाली जयाचें ॥ तो पुरुष ज्ञानाचें ॥ आयुष्य गा ॥ १५१ ॥ देह तरी वरिचिलीकडे[8] ॥ आपुलिया परी हिंडे ॥ परी

---

१ कोट्यवधि कल्पपर्यंत जरी लोक त्याच्या गुरुसेवेचा काळ मोजूं लागले तरी तेवढ्या काळांत एक निमिषभरही तो व्यर्थ जाऊं देत नाहीं हें तात्पर्य. २ पुष्ट. ३ गुरूची सेवा. ४ तकवा, डौल. ५ प्राप्ति ( पा० ) आंग, मन. ६ घनदाटपणा, भरींवपणा. ७ निर्मळपणास, स्वच्छतेस. ८ बाह्यात्कारीं. ९ हीन पदार्थ ( कुडा ) मोठ्या मोलानें जात नाहीं. १० गंगेमध्यें. ११ कोठें मिळे ? १२ कलंक. १३ खडा, दगड.

बैसका[1] न मोडे ॥ गालगीची ॥ १५२ ॥ कां लोभियां[2] दूर जाये ॥ परी जीव ठेवां ठाये[3] ॥ तैसा देह चालतां न होय ॥ चळु चित्ता ॥ १५३ ॥ जातया अभ्रासवें ॥ जैसें आकाश न धांवे ॥ भ्रमण-चक्रीं[4] न भवे[5] ॥ ध्रुव जैसा ॥ १५४ ॥ पांथिकाचिया[6] येरझारा ॥ सवें पंथ न चले धनुर्धरा ॥ कां नाहीं जेवीं तरुवरा ॥ येणें जाणें ॥ १५५ ॥ तैसा चळण-वळणात्मकीं ॥ असोनि ये पांच-भौतिकीं[7] ॥ भूतोर्मी[8] एकी ॥ चळीजेना ॥ १५६ ॥ वाहुटोळीचेनि बळें ॥ पृथ्वी जैशी न ढळे ॥ तैसा उपद्रव-उमाळें[9] ॥ न लोटे जो ॥ १५७ ॥ दैन्य-दुःखीं न तपे ॥ भय-शोकीं न कंपे ॥ देह-मृत्यु न वासिपे ॥ पातलेनी ॥ १५८ ॥ आकाश हें बोसरो[10] ॥ पृथ्वी वरि[11] विरो ॥ परि नेणे मोहरों[12] ॥ चित्त-वृत्ति ॥ १५९ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळां ॥ कंप नाहीं मंदराचळीं ॥ आकाश न जळे जाळीं ॥ वणवियाच्या ॥ १६० ॥ तैसा आल्या गेल्या ऊर्मी ॥ नव्हे गजबज मनोधर्मीं ॥ किंबहुना धैर्य-क्षमी[13] ॥ कल्पांतीही ॥ १६१ ॥ हें स्थैर्य निधडें[14] ॥ जेथ अंगें जीवें जोडे ॥ तें ज्ञानाचें उघडें ॥ निधान साचें ॥ १६२ ॥ आत्म-विनिग्रह— आणि इसाळु[15] जैसा घरा ॥ कां दादुला[16] हातियेरा ॥ न विसंबे भांडारा ॥ लुब्धकु जैसा ॥ १६३ ॥ कां एकलौतियां[17] बाळका ॥ वरिपडोनि[18] ठाके अंबिका ॥ मधुविषीं मधु-मक्षिका ॥ लोभिणी जैशी ॥ १६४ ॥ अर्जुना जो यापरी ॥ अंतःकरण जतन करी ॥ नेदी उभें ठाकों द्वारीं ॥ इंद्रियांच्या ॥ १६५ ॥ अगा अंतःकरण-निग्रहो जो ॥ तो हा हें जाणिजो ॥ हा आथी तेथ विजयो ॥ ज्ञानाचा पैं ॥ १६६ ॥ **इंद्रियार्थ-वैराग्य (विषय-वैराग्य)**- आणि विषयांविखीं[19] ॥ वैराग्याची निकी ॥ पुरवणी[20] मानसीं कां ॥ जिती[21] आथी ॥ १६७ ॥ वमिलिया अन्ना ॥ लाळ न घोंटी जेवीं रसना ॥ अंग न[22] सूये[22] आलिंगना ॥ प्रेताचिया ॥ १६८ ॥ विष खाणें नागवे[23] ॥ जळत घरीं न रिघवे ॥ व्याघ्र-विवरा न वचवे[24] ॥ वस्ती[25] जेवीं ॥ ॥ १६९ ॥ धडाडीत[26] लोह-रसीं ॥ उडी न घालवे जैशी ॥ न करवे उशी ॥ अजगराची ॥ १७० ॥ अर्जुना तेणें पाडें ॥ जयाशीं विषय-वार्ता नावडे ॥

---

१ आत्मस्वरूपीं पडलेली बैठक. २ लोभी पुरुष. ३ ठेव्याजवळ गुंतून राहतो. ४ फिरणाऱ्या नक्षत्रमंडळात. ५ फिरे. ६ वाटसरांच्या. ७ या पंचमहाभूतात्मक सृष्टींत. ८ पंचमहाभूतांच्या एकाही विकाराने. ९ उपद्रवांच्या लोटानें. १० नाश पावो. ११ अथवा, शिवाय आणखी. १२ मागें फिरण्यास. १३ धैर्य आणि क्षमा यांनीं युक्त. १४ बळकट. १५ ब्रह्मराक्षस. १६ योद्धा. १७ एकुलत्या. १८ जवळ होऊन. १९ विषयांविषयीं. २० पुरवठा. २१ जिवंत. २२ घालीत नाहीं. २३ नरुचे (पाठ-)नागवे. २४ जावबे. २५ राहण्यास. २६ रसरशीत.

नेदी इंद्रियांचेनि तोंडें ॥ कांहींच जावों ॥ १७१ ॥ बहु योगाभ्यासीं हांव ॥ विजनाकडे धांव ॥ न साहे जो नांव ॥ संघाताचें ॥ १७२ ॥ नाराचांचीं[1] आंथरुणें ॥ पूय-पंकीं[2] लोळणें ॥ तैसें लेखी भोगणें ॥ ऐहिकींचें[3] ॥ १७३ ॥ आणि स्वर्गातें मानसें ॥ ऐकोनि मानी ऐसें ॥ कुहिलें[4] पिशित[5] जैसें ॥ श्वानाचें गा ॥ १७४ ॥ तें हें विषय-वैराग्य ॥ आत्म-लाभाचें भाग्य ॥ एणें ब्रह्मानंदा योग्य ॥ होती जीव ॥ १७५ ॥ ऐसा उभय भोगीं त्रासु ॥ देखसी जेथ बहुवसु ॥ जाण तेथें रहिवासु ॥ ज्ञानाचा तूं ॥ १७६ ॥ सम—चित्तत्व-महा-सिंधु जैसें ॥ ग्रीष्म-वर्षे[6] सरिसें ॥ इष्टानिष्ट तैसें ॥ जयाच्या ठायीं ॥ १७७ ॥ कां तिन्ही काळ होतां ॥ त्रिधा नव्हे सविता ॥ तैसा सुख दुःखीं चित्ता ॥ भेदु नाहीं ॥ १७८ ॥ जेथ नभाचेनि पाडें ॥ समत्वा न्यून न पडे ॥ तेथ ज्ञान रोकडें ॥ ओळख तूं ॥ १७९ ॥

---

# नामदेव.

**नामदेव** जातीचा शिंपी, **पंढरपूर**चा राहणारा होता. त्याच्या बापाचें नांव **दामाशेटी** आणि आईचें नांव **गोणाई**. असें सांगतात कीं, दामाशेटीस फार दिवस मूल नव्हतें. एका दिवशीं **भीमा**नदीच्या कांठीं त्याला एक बारा दिवसांचा मुलगा *सांपडला. तो त्यानें घरीं आणून वाढविला, आणि त्याचें नांव नामा असें ठेविलें. हा **उद्धवा**चा अवतार होता असें म्हणतात. ह्याच्या बायकोचें नांव **राजाई**. ह्यास चार मुलगे होते. ह्याच्या कुटुंबातील मनुष्यांची माहिती पुढील २२ व्या अभंगांत दिली आहे. ह्याची **जनी** म्हणून एक दासी होती, तिनेंही बरेच अभंग केले आहेत.

नामदेवानें पुष्कळ अभंग केले; परंतु त्यांपैकीं फार थोडे आतां प्रसिद्ध आहेत. अभंग रचण्यास त्याला प्रयास पडत नसत; सहज बोलावें त्याप्रमाणें तो ते म्हणत जाई. त्याचा संपूर्ण असा कोणताही ग्रंथ सांपडत नाहीं.

नामदेव कधीं जन्मला व वारला ह्याचा अझून †शोध लागला नाहीं; तथापि तो ज्ञानदेवाच्या पाठीमागून कांहीं वर्षांनीं वारला असावा ह्यांत संशय नाहीं.

---

१ बाणांचीं. २ पुवाच्या चिखलांत. ३ इहलोकींचें. ४ कुजलेलें. ५ मांस. ६ उन्हाळा व पावसाळा (पाठा०) ग्रीष्मवर्षा. * परंतु अलीकडे (इ० स० १८९२) रा० रा० माधवराव अप्पाजी मुळे यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'श्री नामदेव चरित्र' नांवाच्या ग्रंथांत नामदेव हा अयोनिसंभव नव्हता असें प्रतिपादन केलें आहे (पृ० २६-२७). † नामदेव हा शके ११९२ कार्तिक शुद्ध ११ स जन्मला व शके १२७२ आषाढ वद्य १३ स समाधिस्थ झाला असें सदर ग्रंथावरून समजतें (पृ० २७, २८२).

## स्फुट अभंग.

सर्व सावधान होउनी विचारा ॥ सोडवण करा संसाराची ॥ १ ॥
अवघें आयुष्य सरोनी जाईल ॥ कोण तें होईल साह्य आम्हां ॥ २ ॥
सकल संसार जाणोनि लटिका ॥ शरण जा एका विठोबासी ॥ ३ ॥
सर्व-काळ वाचे म्हणा नारायण ॥ वायां एक क्षण जावों नेदीं ॥ ४ ॥
**नामा** म्हणे सर्व सुखाची होईल ॥ मन हें ठेवाल हरी-पायीं ॥ ५ ॥

(२)

झणी दृष्टि लागे तुज केशव-राजा ॥ जेणें मना माझ्या बोध केला ॥ १ ॥
अनंत जन्मींचें विसरलों दुःख ॥ पाहतां श्री-मुख केशवाचें ॥ २ ॥
योगीयाचे ध्यानीं ध्यातां नातुडशी ॥ तो तूं आम्हांपाशीं मागें पुढें ॥३॥
**नामा** म्हणे करूं जिवें निंबलोण[1] ॥ विठ्ठल-चरण वोंवाळीन ॥ ४ ॥

(३)

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा ॥ केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणीक सोयरा ॥ न करीं आव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अ-नाथाचा नाथ होसी तूं दयाळ ॥ किती वेळोवेळ प्रार्थूं आतां ॥ ३ ॥
**नामा** म्हणे जीव होतो कासावीस ॥ केली तुझी आस आतां तरीं[2] ॥ ४ ॥

(४)

पाहें पर-दारा जननी समान ॥ द्रव्यही पाषाण-सम मानीं ॥ १ ॥
पराव्याकारणें प्राण वेंचीं आतां ॥ जाणें पर-व्यथा अंतरींची ॥ २ ॥
विहित संतोष धरीं बा मानसीं ॥ कीं पर-लोकासी जाणें आहे ॥ ३ ॥
सर्व काळ प्रीति संतांचीया संगें ॥ गावें अनूरागें हरी-नाम ॥ ४ ॥
सर्वां भूतीं सम ठेवूनीयां बुद्धी ॥ सांडावी ऊपाधी प्रपंचाची ॥ ५ ॥
सर्व परमात्मा सर्व काळीं देशीं ॥ भाव अहर्निशीं दृढ धरीं ॥ ६ ॥
संत-समुदाय मिळतील जेथें ॥ लोटांगणें तेथें जावें आधीं ॥ ७ ॥
चिंता नको **नाम्या** तरसी तूं जाण ॥ सांगीतली खूण मनें माझ्या ॥८॥

(५)

कळि-युगाचें मुळें ॥ झालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
पलंगीं बैसवूनी राणी ॥ माते हातीं आणवी पाणी ॥ २ ॥

---

१ दृष्टीचा अगर भूतबाधेचा विकार न व्हावा म्हणून मीठ, मोहऱ्या व कडूनिंबाचीं पानें हीं ओवाळून टाकणें, त्या कृत्याला " निंबलोण करणें " म्हणतात. २ तारीं असा मूळचा पाठ नसेलना ?

स्त्रिये पाटावाची चोळी ॥ माता अखंड चिंध्या गाळी ॥ ३ ॥
ऐसा कलि-युगींचा महिमा ॥ म्हणे विष्णू-दास नामा ॥ ४ ॥

( ६ )

क्षीर-सागरांत असशी बैसला ॥ धांवोनि मजला भेटी देई ॥ १ ॥
शेषावरी जरी असशी निजेला ॥ धांवोनि मजला भेटी देई ॥ २ ॥
कैलासीं शिव पूजितसे तुजला ॥ धांवोनि मजला भेटी देई ॥ ३ ॥
गहिंवरुनी नामा बाहतो विठ्ठला ॥ धांवोनि मजला भेटी देई ॥ ४ ॥

( ७ )

चक्रवाक-पक्षी वियोगें बाहती ॥ जालें मजप्रती तैसें आतां ॥ १ ॥
चुकलीया माय बाळकें रडती ॥ जालें मजप्रती तैसें आतां ॥ २ ॥
वत्स न देखतां गाई हंबरती ॥ जालें मजप्रती तैसें आतां ॥ ३ ॥
जीवनावेगळे मच्छ तळमळती ॥ जालें मजप्रती तैसें आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मज वाटे ऐसें चित्तीं ॥ करितसें खंती फार तुझी ॥ ५ ॥

( ८ )

काय माझा आतां पांहतोसी अंत ॥ येई बा धांवत देव-राया ॥ १ ॥
तुजविण होइल जीवासी आकांत ॥ येई बा धांवत देव-राया ॥ २ ॥
असे जरी काम भेटोनीयां जावें ॥ धांवोनीया यावें देव-राया ॥ ३ ॥
ये रे ये रे देवा नामा तुज बाहत ॥ येई बा धांवत देव-राया ॥ ४ ॥

(९)

युगा ऐसें पळ तुजवीण जाय ॥ पहातोसी काय अंत माझा ॥ १ ॥
कोमल हृदय तुझें पंढरीच्या राया ॥ कठीण सखया कैसें केलें ॥ २ ॥
विचारिलें चित्तीं दुर्लभ हरि-हरां ॥ कैसा जाऊं घरा रंकाचीया ॥ ३ ॥
अंगीकारावरी आव्हेराची मात ॥ नोहे हें उचित देव-राया ॥ ४ ॥
मागें जे जे आळी[१] केली वासुदेवा ॥ उदारा केशवा पुरवीली ॥ ५ ॥
नुपेक्षिसी चित्तीं ऐसा हा भरंवसा ॥ दिसोनि निराशा झाली आतां ॥ ६ ॥
वांचोनियां दुःख भोगावें रे किती ॥ प्राणासी मूकतां तेंचि भलें ॥ ७ ॥
वर्णितां तो नामा झाला समाधिस्थ[३] ॥ जाहालें विदित पांडुरंगा ॥ ८ ॥

( १० )

त्वरें धांवोनीयां आलासे गोविंद ॥ सावध सावध नामदेवा ॥ १ ॥

---

१ नहर्मी. २ हट्ट. ३ ज्याचें देहभान गेलें आहे असा.

रुसलासे नामा देवाशीं न बोले ॥ करें कुरवाळीलें वदन तेव्हां ॥ २ ॥
समजावोनि देवें धरिला पोटासीं ॥ बोलरे मजसीं नामदेवा ॥ ३ ॥
**नामा** म्हणे देवा उशीर कां केला ॥ किंवा माझा आला तुला राग ॥४॥

(११)

अभिमानें घाला घातला आम्हांसी ॥ म्हणोनि लपसी देव-राया ॥ १ ॥
तुजवांचुनीयां जाऊं पाहे प्राण ॥ दाखवीं वदन एक वेळा ॥ २ ॥
मुगुट कुंडलें श्रीमुख सांवळें ॥ केशरी लाविलें गंध भाळीं ॥ ३ ॥
पाहोनियां जीवा होय फार सुख ॥ हारेल ही भूक डोळियांची ॥ ४ ॥
तुजवांचोनियां आम्हां नाहीं कोणी ॥ तिहीं त्रिभुवनीं **नामा** म्हणे ॥ ५ ॥

(१२)

त्रिविध-तापें[1] प्राणी होतात संतप्त ॥ शीतळ करीत कथामृतें ॥ १ ॥
अमृतापरीस तुझि कथा अधिक ॥ सांगतसें ऐक देव-राया ॥ २ ॥
स्वर्गींचें अमृत प्राशन करीती ॥ पुण्य सरल्या येती मृत्यु-लोका ॥ ३ ॥
तुझी कथा देत अच्युतपदासी[2] ॥ न विचारी मानसीं याती[3] कांहीं ॥४॥
नाहीं चतुराई बोबडे हे बोल ॥ लिहित विठ्ठल **नामा** म्हणे ॥ ५ ॥

(१३)

अवघे निरंतर करा हा विचार ॥ भव-सिंधूचा पार तरिजे केवीं ॥ १ ॥
अवघें जन्म वाया गेलें विषया-संगें ॥ शिणलेती वाउगे माया-मोहें ॥२॥
अवघा वेळ करा संसाराचा धंदा ॥ परि वाचे वदा हरिचें नाम ॥ ३ ॥
अवघे भावें एके विठ्ठलातें भजा ॥ आर्तें[4] करा पूजा हरि-दासांची ॥ ४ ॥
**नामा** म्हणे अवघे अनुभवूनी पाहा ॥ सर्व काळ राहा साधु-संगें ॥ ५ ॥

(१४)

अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे ॥ अवघें कूळ त्यांचें पुण्यवंत ॥१॥
अवघेची संसारीं जाणावे ते धन्य ॥ ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥
अवघा विठ्ठल भोगिती दिन-राती[5] ॥ वोळगे[6] किंकर-वृत्ती **नामा** त्यांतें॥३॥

---

१ ज्ञानदेव–(पृ० ८) अ० १३ ओंवी ७५ 'त्रिविध उपद्रवांचे' यावरील टीप पहा. २ अविनाशिपदास=मोक्षास. ३ जाति; उच्च नीच असें. ४ उत्कंठेनें; प्रेमानें. ५ विठ्ठलाच्या स्वरूपाच्या चिंतनानें होणारें सुख अखंड भोगितात हें तात्पर्य. ६ अशांचा दास होऊन त्यांस विकरून राहतो म्ह० त्यांच्या सेवेंत तत्पर असतो.



3125

( १५ )

अवघी चित्त-वृत्ती एकवटुन जेणें ॥ अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सुख एक तयासी पावलें ॥ अवघें स-फळ झालें जन्म त्याचें ॥२॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें ॥ जयाचें विठ्ठलीं मन जडलें ॥ ३ ॥
नित्य विठ्ठल-नाम गर्जती स-प्रेम ॥ अवघे नित्य-नेम झाले त्याचे ॥ ४ ॥
अवघे इष्ट मित्र बंधु माता पिता ॥ केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय[1] ॥ मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

( १६ )

अवघाचि संसार सुखाचा करीन ॥ अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक ॥ १॥
अवघा शीणभाग हिरोनि घेईल ॥ अवघेचि तोडील माया-पाश ॥ २ ॥
अवघा जीवलग हाचि पैं होईल ॥ अवघा हा घेईल भार माथां ॥ ३ ॥
अवघा त्रिविध ताप क्षणें मालवील ॥ अवघा चालवील योग-क्षेम[2] ॥ ४ ॥
अवघ्या संसाराचें बसणें मोडील ॥ अवघेचि तोडील माया-जाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघी सोडा मिथ्या भ्रांति ॥ विठ्ठलेंविण विश्रांति नाहीं कोठें ॥६॥

( १७ )

ज्ञानदेव म्हणे नामदेवाप्रती ॥ ऐकावी विनंती एक माझी ॥ १ ॥
पृथिवीचीं तीर्थें करावीं समस्त ॥ पाहावे महंत साधु जन ॥ २ ॥
जीवन्मुक्ता तुज नाहीं कांहीं काज ॥ इच्छा असे मज त्वांही यावें ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्हीं पुसावें विठ्ठला ॥ देतां आज्ञा मला मीही येतों ॥ ४ ॥

( १८ )

सर्व सुख आहे भीवरेचे[3] तीरीं ॥ आमची पंढरी कामधेनु ॥ १ ॥
प्रेमामृत दुभे[4] सदा संत-जना ॥ वोसंडतें[5] पान्हा नित्य नवा ॥ २ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष चारी स्तन ॥ दोहोणार धन्य पुंडलीक[6] ॥ ३ ॥
भक्तीचें[7] मेळवण भावाचेनि[8] बळें ॥ देखोनियां वोळे[9] अधिकाधीक ॥ ४ ॥

---

१ व्रत दान, तप, योग, ध्यान इत्यादि निरनिराळ्या साधनांनीं ईश्वरप्राप्ति करून घेण्यास इच्छिणारे साधक. २ ह्या शब्दाचा मूळ अर्थ—**योग** म्हणजे आपल्याजवळ नाहीं तें मिळविणें आणि **क्षेम** म्हणजे मिळाल्याचें संरक्षण, असा आहे; परंतु एथें उपजीवन असा समजावा. ३ भीमेच्या. ४ दूध देते. ५ भरून वाहूं लागतो. ६ विठ्ठलाचा एक प्रसिद्ध भक्त. ७ देव, गुरु इत्यादिकांवर परम प्रेम व तदनुकूल कृति त्यांचें. ८ देव, गुरु इत्यादिकांवर जो विश्वास त्याच्या. ९ वळते.

जियेचें दुभतें नित्य नवें वाढे ॥ पंढरी पहुडे[1] पूर्ण पुण्यें ॥ ५॥
भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला ॥ प्रेमें वोसंडला गर्जे नामें ॥ ६ ॥

( १९ )

माझें मज कळे माझें मंज कळे ॥ माझें मज कळे प्रेम-सूख ॥ १ ॥
न करीं तुझें ध्यान न लगे ब्रह्म-ज्ञान ॥ माझी आहे खूण वेगळीच ॥ २ ॥
न करीं तुझी स्तुती न वाखाणीं कीर्ती ॥ धरिली ते युक्ती वेगळीच ॥ ३ ॥
न करीं काया-क्लेश इंद्रियां निरोधु[2] ॥ मज आहे बोधु वेगळाचि ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प[3] ॥ येसी आपेआप गीवसीत[4] ॥ ५ ॥

( २० )

चंद्रभागे तटीं ऐकियेली गोष्टी ॥ वाल्मीकें शत-कोटी ग्रंथ केला ॥ १ ॥
येऊनीयां नामा विठ्ठलासी म्हणे ॥ केलें रामायण वाल्मीकानें ॥ २ ॥
तेणें माझ्या चित्ता बहु झाले क्लेश ॥ व्यर्थ म्यां आयुष्य गमाविलें ॥ ३ ॥
जरी तुझा दास असेन मी देवा ॥ तरी सिद्धी न्यावा पण माझा ॥ ४ ॥
करीन मी तुझे शत कोटी अभंग ॥ बोले पांडुरंग ऐकें ज्ञाम्या ॥ ५ ॥
तये काळीं होती आयुष्याची वृद्धी ॥ आतांची अवधी थोडी आहे ॥ ६ ॥
नामा म्हणे जरी न होती संपूर्ण ॥ जिव्हा उतरून ठेवीन मी ॥ ७ ॥

( २१ )

भीमा-तीरीं सांगे सारजेसी[5] हरी ॥ बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ १ ॥
लडीवाळ माझा नामा बाळ तान्हें ॥ मजवीण आहे कोण त्यासी ॥ २ ॥
मजवरी त्याचें फार आहे रीण ॥ एवढ्यानें उत्तीर्ण[6] होईन मी ॥ ३ ॥
नामा म्हणे अंगें[7] बांधोनीयां वह्या ॥ बैसे ल्याहावया पांडुरंग ॥ ४ ॥

( २२ )

गोणाई राजाई दोघी सासू-सुना ॥ दामा नामा जाणा बाप-लेक ॥ १ ॥
नारा म्हादा गोंदा विठा चौघे पुत्र ॥ जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥ २ ॥
लाडाई गोडाई येसाई साकराई ॥ चौघी सुना पाहीं नामयाच्या ॥ ३ ॥
निंबाई ते लेकी नाउबाई बहिणी ॥ वेडी पिशी जनी दासी त्याची ॥ ४ ॥
इतुक्याही जणीं अभंग आरंभीले ॥ देवें पूर्ण केले नामा म्हणे ॥ ५ ॥

---

१ प्राप्त होते. २ नियमन. ३ निभ्रांत. ४ शोधीत. ५ सरस्वतीस. ६ उतराई. ७ स्वतः.

( २३ )

देह जावो अथवा राहो ॥ पांडुरंगीं माझा भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा ॥ आण तुझी पंढरि-नाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळ नाम ॥ हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा म्हणे केशव-राजा ॥ केला पण चालवीं माझा ॥ ४ ॥

( २४ )

माझी कोण गती सांगा पंढरि-नाथा ॥ तारीसी अ-नाथा केव्हां मज ॥ १ ॥
मनापासूनीयां सांगा मजप्रती ॥ पुसें काकुळती जीवाचिया ॥ २ ॥
न बोलसी कां रे धरीला अबोला ॥ कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥
कोणासी सांकडें घालावें हें सांग ॥ नको धरूं राग दीनावरी ॥ ४ ॥
बाळकासी जैशी एकची ते माय ॥ तैसे तुझे पाय मजलागीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अ-नाथाच्या नाथा ॥ कृपाळूवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

( २५ )

किती देवा तुम्हां येऊं काकुळती ॥ काय या संचितीं[1] लिहिलें माझ्या ॥ १ ॥
कांहो माझी सांड केली हृषीकेशी[2] ॥ आम्ही कोणापाशीं तोंड वासों ॥ २ ॥
ब्रीदाचा तोडर[3] गर्जे त्रि-भुवनीं ॥ तूंची एक धणी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥
स-मूळ घेतला पृथिवीचा भार ॥ माझाचि जौंजार[4] काय तुला ॥ ४ ॥
नको पाहूं अंत पांडुरंगे आई ॥ नामा हरी-पायीं घाली मिठी ॥ ५ ॥

( २६ )

माझा भाव तुझे चरणीं ॥ तुझें रूप माझे नयनीं ॥ १ ॥
सांपडलों एकामेका ॥ जन्मोजन्मीं नोहे सुटका ॥ २ ॥
त्वां तोडिली माझी माया ॥ मी तों जडलों तुझ्या पायां ॥ ३ ॥
त्वां मज मोकलिलें विदेहीं[5] ॥ म्यां तुज घातलें हृदयीं ॥ ४ ॥
नामा म्हणे बा सुजाणा ॥ सांग त्वां न ठकाविलें कोणा ॥ ५ ॥

---

## अभंग—बाल-क्रीडा.

कृष्ण गोकुळांत असतां त्यानें लहानपणीं केलेल्या क्रीडा या प्रकरणांत वर्णन केल्या आहेत, म्हणून या प्रकरणास **बालक्रीडा** असें नांव दिलें आहे.

( १ )

गोपिका म्हणती यशोदे सुंदरी ॥ करीती मुरारी खोडी बहू ॥ १ ॥
यशोदेप्रती त्या गौळणी बोलती ॥ संकष्ट-चतुर्थी-व्रत घेई ॥ २ ॥

---

१ पूर्व-कर्मीं. २ इंद्रियांच्या स्वामी, हे विष्णु. ३ डंका. ४ भार, ओझें. ५ देहाभिमानरहित स्थितींत.

गणेश देईल यासी उत्तम गुण ॥ वचन प्रमाण मानावें हें ॥ ३ ॥
गज-मुखा तेव्हां म्हणत यशोदा ॥ माझीया मुकुंदा गुण देई ॥ ४ ॥
ऐसें हें वचन ऐकोनि कृष्ण-नाथें ॥ सत्य गणेशातें केलें तेव्हां ॥ ५ ॥
एक मास खोडी देवें नाहीं केली ॥ प्रचीती ते आली यशोदेसी ॥ ६ ॥
धन्य धन्य देव गण-पती पाहें ॥ यशोदा ते राहे उपवासी ॥ ७ ॥
इंदिरा-बंधूचा[1] उदय होऊं पहात ॥ यशोदा करीत पूजनासी ॥ ८ ॥
शर्करा-मिश्रित लाडू एकवीस ॥ आणीक बहुवस[2] मोदक ते ॥ ९ ॥
ऐसा नैवेद्याचा हारा तो भरोनी ॥ देव्हारां[3] नेऊनी ठेवी माता ॥ १० ॥
मातेसी म्हणत तेव्हां हृषीकेशी ॥ लाडू केव्हां देसी मजलागीं ॥ ११ ॥
यशोदा म्हणत पूजिन गज-वदन ॥ नैवेद्य दाऊन देइन तूज ॥ १२ ॥
ऐसें म्हणोनीयां माता बाहेर गेली ॥ देव्हाराजवळी हरी होता ॥ १३ ॥
एकांत देखोनी हारा उचलीला ॥ सर्व स्वाहा केला एकदांची ॥ १४ ॥
घेऊनीयां ग्रास उगाची बैसला ॥ भक्तालागीं लीळा दावीतसे ॥ १५ ॥
धूप घेऊनीयां आली सदनांत ॥ रिता हारा तेथें देखीयेला ॥ १६ ॥
विस्मय बहुत मातेसी वाटला ॥ नैवेद्य हरीला[4] पूसतसे ॥ १७ ॥
कृष्ण म्हणे सत्य वचन मानीं माते ॥ एक सहस्र एथें उंदिर आले ॥ १८ ॥
त्यांत एक थोर होता तो मूषक ॥ त्यावरि विनायक बैसलासे ॥ १९ ॥
सकळीक लाडू सोंडेनें उचलीले ॥ सर्व आकर्षीले एकदांची ॥ २० ॥
सर्वांगासी त्यानें चर्चीला सेंदूर ॥ सोंड भयंकर हलवीतसे ॥ २१ ॥
उंदीर भ्यासूर भ्यालों मी देखूनी ॥ वळली वदनीं बोबडी ते ॥ २२ ॥
न बोलवे कांहीं माझेनी जननी ॥ क्षुधा मजलागोनी लागलीसे ॥ २३ ॥
लाडू मज देई म्हणे जनार्दन ॥ माता क्रोधेंकरून बोलतसे ॥ २४ ॥
माता म्हणे कृष्णा पाहूं तुझें वदन ॥ लाडू त्वांची पूर्ण भक्षीयेले ॥ २५ ॥
हरी म्हणे माते लाडू ते बहुत ॥ मातील मुखांत कैसे माझ्या ॥ २६ ॥
गण-पति लाडू गेलासे घेऊन ॥ आलें विहरण[5] मजवरी ॥ २७ ॥
हरी म्हणे मज मारूं नको माते ॥ तुज वदनातें दावीतों मी ॥ २८ ॥
कृष्णनाथें तेव्हां मुख पसरीलें ॥ ब्रह्मांड देखिलें मुखामाजी ॥ २९ ॥
असंख्य गण-पती दिसती वदनीं ॥ पहातसे नयनीं यशोदा ते ॥ ३० ॥
मुखांतुन गण-पति मातेसी बोलत ॥ पूजावें त्वरीत हरीलागीं ॥ ३१ ॥

---

१ लक्ष्मीचा भाऊ चंद्र त्याचा. २ बहुत. ३ देवघरांत. ४ गडू. ५ आळ.

ऐसें देखोनीयां समाधिस्थ[1] होत ॥ चहूंकडे पहात तटस्थ ते ॥ ३२ ॥
योग-मायाँ तेव्हां हरीनें घालून ॥ मातेपुढें जाण उभा असे ॥ ३३ ॥
यशोदा हरीसी कडेवरी घेत ॥ मुखातें चुंबीत आवडीनें ॥ ३४ ॥
हरी घेऊनियां घरांत ती गेली ॥ भोजना बैसली **नामा** म्हणे ॥ ३५ ॥

( २ )

शिवादिक ज्याचे वंदी पायिवणी ॥ पायांवरी न्हाणी यशोदा ते ॥ १ ॥
नंद-पुण्य-लेखा[4] नव्हे आम्हांप्रती ॥ शुक परीक्षिती सांगतसे ॥ २ ॥
सनकादिक[5] ज्याचे ध्यानीं झाले पिसे ॥ गाई चारीतसे गोकुळांत ॥ ३ ॥
गडीयासी काला[6] वांटीतो श्री-घर ॥ कौतुक सुर-वर पाहताती ॥ ४ ॥
**नामा** म्हणे सुख देईल भक्तांसी ॥ वधील दुष्टांसी स्वामी माझा ॥ ५ ॥

( ३ )

श्रवणें जळती पापाचे पर्वत ॥ ऐका ब्रह्म-गीतें शुक म्हणे ॥ १ ॥
भरी जो विश्वास करी जो पठण ॥ तरेल तो जाण भव-सिंधू ॥ २ ॥
आपण तरेल नव्हे हें नवल ॥ कुळें उद्धरील सकळही ॥ ३ ॥
एकैक अक्षर निर्दाळी महा-पाप ॥ करा याचा जप सात्विक[8] हो ॥ ४ ॥
नाम घेतां धांवे अनवाणिच पायें ॥ कोमळ हृदय कृष्णजींचें ॥ ५ ॥
न विचारी जाती कुळ अ-मंगळ ॥ न विचारी काळवेळ धांवतसे ॥ ६ ॥
शरणागता नेदी काळाचिये हातीं ॥ **नामा** म्हणे चित्तीं दृढ धरा ॥ ७ ॥

( ४ )

भव-सिंधू तराया एकाचि उपाय ॥ ध्यावे तुझे पाय वासुदेवा ॥ १ ॥
गोविंद गोपाळ वाचेसी निखळें[9] ॥ उद्धरे तात्काळ कलीमाजी ॥ २ ॥
नारायण नारायण करि जो पारायण[10] ॥ तो उद्धरे जाण इह लोकीं ॥ ३ ॥
तुटती यातना कर्माच्या भावनीं ॥ जड-जीवा उद्धरण नाम स्मरा ॥ ४ ॥
अहर्निशीं कीर्ति गाती भाविक भोळे ॥ त्यांणीं तुज जिंकीलें ब्रह्मा म्हणे ॥ ५ ॥
**नामा** म्हणे ऐसें दाविलें सुगम ॥ नलगे तुम्हां नेम नाना कोटी ॥ ६ ॥

१ निर्विषय चित्तवृत्ति आहे जिची अशी. २ विस्मित. ३ परमेश्वराची अचिंत्य मोहशक्ति. ४ गणना. ५ सनकसनंदनादि, हे ब्रह्मदेवाचे मानस पुत्र. ६ अनेक प्रकारचें एकत्र कालविलेलें अन्न. ७ ब्रह्मदेवानें केलेली कृष्णाची स्तुति. ८ भोळे, भाविक. ९ न खळतां, निरंतर. १० अखंड पठन. ११ वासना.

## अभंग—कालियमर्दन.

**कालिय** नांवाचा मोठा सर्प यमुनेच्या डोहांत राहत होता; एके दिवशीं गोपाळांचीं व कृष्णाचीं गुरेंवासरें कालियाच्या विषानें दूषित झालेल्या डोहांतलें पाणी पिऊन मरून पडलीं. हें पाहून कृष्णानें डोहांत उडी टाकिली व त्याच्या राहण्याच्या ठिकाणीं जाऊन त्यास शासन केलें, आणि त्यास तेथून समुद्रांत रहावयास लावून दिलें; अशी कथा ह्या प्रकरणांत आहे, म्हणून ह्यास **कालियमर्दन** ही संज्ञा दिली आहे.

(१)

कालिंदीचे डोहीं काळीयाची वस्ती ॥ एक परिक्षीती चरित्र हें ॥ १ ॥
पक्षि-श्वापदांनीं सोडिलें त्या स्थळा ॥ निघताती ज्वाळा तया डोहीं ॥ २ ॥
विषाचीया योगें झाडें जळताती ॥ जीवन न घेती कोणी त्याचें ॥ ३ ॥
वैकुंठ-नायक तया वनीं आला ॥ गोपाळांचा मेळा बरोबरी ॥ ४ ॥
हुतुतुहामामा[1] लपंडाई खेळती ॥ देवासी म्हणती लपें आतां ॥ ५ ॥
तृषाक्रांत झाले ते गाई-गोपाळ ॥ पिती तेव्हां जळ काळीयाचें[2] ॥ ६ ॥
लहानलीं मुलें नाहीं तयां ज्ञान ॥ झाले गत प्राण सकळांचे ॥ ७ ॥
**नामा** म्हणे तेव्हां कृपा-दृष्टी पाहात ॥ उठवी समस्त गाई गडी ॥ ८ ॥

(२)

जग-जेठी[3] तेव्हां क्रोधावला चित्तीं ॥ करीन मी शांती तुझी आतां ॥ १ ॥
माझीया लेंकरां दीधलासी त्रास ॥ करीन मी नाश आतां तुझा ॥ २ ॥
त्रैलोक्यांत कोण ऐसा हो समर्थ ॥ माझे शरणागत मारील तो ॥ ३ ॥
माझिया भक्तासी जो कां दुःख-दायें[4] ॥ करीन प्रळय त्याजवरी ॥ ४ ॥
स्फुरताती दंड कांपती अधर ॥ उठला सत्वर जगदीश ॥ ५ ॥
कळंबाचे वृक्षीं देव चढतसे ॥ पीतांबर कासे खोवीतसे ॥ ६ ॥
जगद्गुरु तेव्हां पुष्प-माळा काढी ॥ टाकीतसे उडी जळामध्यें ॥ ७ ॥
**नामा** म्हणे शोकें व्यापीले समग्र ॥ करूनी एकाग्र मन ऐका ॥ ८ ॥

(३)

घालीतसे वेढे दीसतसे जळीं ॥ आक्रांत सकळीं मांडीयेला ॥ १ ॥
गडी रडताती वत्सें पडताती ॥ कपाळ पीटिती सकळीक ॥ २ ॥

---

१ एक प्रकारचा खेळ, २ ' कालिंदीचें ' हा पाठ बरा दिसतो खरा परंतु ' काळीयाचें ' असाच पाठ सर्वसंग्रहांत सांपडतो. ३ जगाहून श्रेष्ठ अथवा जगाच्या पूर्वीं असणारा ईश्वर. ४ दुःख देणारा.

तुजवांचूनीयां रक्षी कोण आम्हां ॥ काय सांगूं रामो[1] सकळीक ॥ ३ ॥
रूसलिया आमुचें करीसी समाधान ॥ तुजवीण वन वोस वाटे ॥ ४ ॥
आम्हांसाठीं तुवां दुष्टांसी मारीलें ॥ कोण आतां लळे पुरवील ॥ ५ ॥
तुजवांचूनीयां आम्ही सर्व दीन ॥ न जाऊं एथून गोकूळासी ॥ ६ ॥
वियोगानें तेव्हां पक्षी रडताती ॥ आतां कृष्ण-मूर्ती कैंची आम्हां ॥ ७ ॥
बोलोनीयां ऐसें निस्तेज पडती ॥ नद्या वाहती[2] त्या स्थिरावल्या ॥ ८ ॥
**नामा** म्हणे होती दुश्चिन्हें बहुत ॥ गोकुळीं समस्त वीचारीत ॥ ९ ॥

( ४ )

यशोदा व्याकूळ होऊनियां म्हणे ॥ सुखी असो तान्हें वनामाजी ॥ १ ॥
उठती तीडका स्तनीं माझ्या फार ॥ लवतसे नेत्र वेळोवेळां ॥ २ ॥
जीव तळमळी दाटे माझा धांप ॥ पाहीन पाडस केव्हां आतां ॥ ३ ॥
गोकुळींचे जन निघाले सकळ ॥ पहाती गोपाळ वनामध्यें ॥ ४ ॥
कालिंदीच्या तीरीं पडले सकळ ॥ पाहोनि कोल्हाळ करीताती ॥ ५ ॥
कपाळ पीटिती यशोदा रोहिणी[3] ॥आतां चक्र-पाणी कैंचा आम्हां ॥ ६ ॥
धांव धांव कृष्णा दावीं रे वदना ॥ पाजूं आतां पान्हा कोणालागीं ॥७॥
तुझीया कौतुकें कंठीं[4] मी संसार ॥ जळतें अंतर तुजसाठीं ॥ ८ ॥
कोणावरी आतां घालूं अलंकार ॥ बुडालें हें घर माझें आतां ॥ ९ ॥
**नामा** म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण ॥ सकळांचें जीवन कृष्ण-नाथ ॥१०॥

( ५ )

नंद म्हणे माझें बुडालें जहाज ॥ अ-भाग्यासी मज कृष्ण कैंचा ॥ १ ॥
काय माझें तप संपूर्ण सरलें ॥ म्हणोनी बुडालें तान्हें माझें ॥ २ ॥
चिंतेनें व्याकुळ पिटी वक्षस्थळा ॥ दावा रे सांवळा प्राण माझा ॥ ३ ॥
आलीया अतीथा त्रासें दवडीलें ॥ म्हणोनि बुडालें बाळ माझें ॥ ४ ॥
प्रातःकाळीं पाहूं कोणाचें मी मूख ॥ एथूनीयां सुख नाहीं नाहीं ॥ ५ ॥
समस्तांची दृष्टी करी तुज कष्टी ॥ म्हणोनी जग-जेठी टाकीयेलें ॥ ६ ॥
गोकुळीचें जन देऊं पाहे प्राण ॥ वांचाया कारण काय आतां ॥ ७ ॥
अ-भय देतसे बळिभद्र[5] सर्वांसी ॥ मारूनी दुष्टासी येईल आतां ॥ ८ ॥
अंतर्यामीं जाणे[6] जन झाले वेडे ॥ **नामा** म्हणे वेढे काढीतसे ॥ ९ ॥

---

१ बळरामाला. २ वाहत होत्या त्या. ३ वसुदेवाची बायको व बळरामाची आई. ४ कंठितें. ५ बळराम. ६ जाणतो ( कृष्ण ).

(६)

तयाचे मस्तकीं नाचे नारायण ॥ आरंभी गायन जगदीश ॥ १ ॥
त्रैलोक्याचा भार घाली हृषीकेशी ॥ दमीतें[1] दुष्टासी स्वामी माझा ॥ २ ॥
होतां एक क्षण झाला तेव्हां क्षिण ॥ जाऊं पाहे प्राण कालियाचा ॥ ३ ॥
तेव्हां त्याच्या स्त्रिया येती काकूळती ॥ लक्ष्मीच्या पती कृपाळूवा ॥ ४ ॥
यज्ञेशा अ-च्युता गोविंदा मा-धवा ॥ दया-निधी के-शवा कृष्ण-नाथा ॥ ५ ॥
श्री-धरा वामना अगा वासु-देवा ॥ ऐकावी ही देवा विज्ञापना ॥ ६ ॥
आम्हांलागीं आतां देई चुडेदान[2] ॥ धरीती चरण देवाजीचे ॥ ७ ॥
दिनाचा दयाळ दासाचा कैवारी ॥ नामा म्हणे हरी उतरला ॥ ८ ॥

(७)

राहुं नका एथें जावें समुद्रासी ॥ सांगे हृषीकेशी सकळीकां[3] ॥ १ ॥
तुझीया मस्तकीं असती माझे चरण ॥ न भक्षी तुज जाण पक्षी-राजें[4] ॥ २ ॥
दिव्य सुमनांच्या घालीताती माळा ॥ पूजिती सांवळा बाप माझा ॥ ३ ॥
अनर्घ्य[5] रत्नांचे देती अलंकार ॥ श्री-मुख सुंदर पाहाताती ॥ ४ ॥
जांबूनदताटीं[6] घालीती भोजन ॥ निघती तेथून सकळीक ॥ ५ ॥
आला भगवान आनंदले गडी ॥ उभारीती गुढी जन तेव्हां ॥ ६ ॥
कालिया-आख्यान स्मरे जो मानसीं ॥ न डंकी[7] तयासी सर्प-कुळ ॥ ७ ॥
अहर्निशीं याचें करी जो पठण ॥ नामा म्हणे विघ्न नाहीं तेथें[8] ॥ ८ ॥

(८)

आला वनमाळी ॥ मग भेटती सकळी ॥ १ ॥
यशोदा रोहिणी ॥ पोटिं धरी चक्र-पाणी ॥ २ ॥
गाई धांवताती ॥ कृष्ण-अंगातें चाटिती ॥ ३ ॥
उड्या मारीताती ॥ गडी आनंदें नाचती ॥ ४ ॥
न वर्णवे तो आनंद ॥ नामयाची बुद्धि मंद ॥ ५ ॥

## अभंग—कंसवध.

मथुरेचा राजा कंस ह्यानें एकदां रामकृष्णांस मल्लांच्या कुस्त्यांत मारावें म्हणून अक्रूराला पाठवून त्यांस गोकुळाहून मथुरेस आणविलें; परंतु

१ शासन करीत. २ सौभाग्य. ३ कालियाचे सर्व कुटुंबास. ४ गरुड. ५ अमूल्य. ६ सोन्याच्या ताटांत. ७ दंश करी. ८ 'त्यासी' असा पाठ नसेल ना?

तेथें आल्यावर चाणूर व मुष्टिक ह्या मल्ळ मल्लांस कृष्ण व बळराम ह्यांनींच ठार मारिलें आणि शेवटीं कृष्णानें कंसासही मारिलें. अशी कथा ह्या प्रकरणांत आहे; म्हणून ह्यास कंसवध हें नांव दिलें आहे.

( १ )

कंसासूर सारे करोनी विचार ॥ धाडीतो अक्रूर[1] गोकुळासी ॥ १ ॥
अक्रूरा आनंद झाला असे फार ॥ पाहीन श्री-धर डोळेभरी ॥ २ ॥
आजि होइल माझ्या जन्माचें सार्थक ॥ वैकुंठ-नायक पाहीन मी ॥ ३ ॥
उजवे जाती काक दक्षिण करीं मृग ॥ पाहीन श्री-रंग[2] स्वामी माझा ॥ ४ ॥
शुभ ते शकुन मार्गीं हे होताती ॥ पाहीन भू-पती वैकुंठींचा ॥ ५ ॥
एथूनीयां माझी सरली येरझार[3] ॥ कंसानें उपकार केला मोठा ॥ ६ ॥
आजि माझे पितर उद्धरती सकळ ॥ पाहीन गोपाळ कृपा-सिंधू ॥ ७ ॥
नामा म्हणे आला गोकुळासंनिध ॥ हृदयीं आनंद न समाये ॥ ८ ॥

( २ )

चौदाजणें[4] ज्याच्या चरणांतें पूजिती ॥ त्याची घेइन माती आपुले शिरीं ॥ १ ॥
एकांतीं अर्चन करीतसे धूर्जटी ॥ त्यासीं बोलेन गोष्टी आवडीच्या ॥ २ ॥
सप्त-ऋषी ज्याचे वर्णिताती गुण ॥ करीतसे ध्यान ब्रह्मा ज्याचें ॥ ३ ॥
तेहतीस[5] कोटी देव ज्यातें पुजिती ॥ श्रुती वर्णिताती गुण ज्याचे ॥ ४ ॥
चारी वेद ज्याची वर्णिताती कीर्ती ॥ करीताती स्तुती साहीजणें[6] ॥ ५ ॥
लक्ष्मीचा पती ध्याती सनकादिक ॥ पाहीन श्री-मुख एक वेळां ॥ ६ ॥
पृथ्वीचा भार करावा हा दूर ॥ म्हणोनी अवतार घेत असे ॥ ७ ॥
नामा म्हणे आला यमुनेजवळीं ॥ उतरला खालीं रथाचीया ॥ ८ ॥

( ३ )

तनू हें आकाश चंद्रमा तें मुख ॥ ऐसें निष्कलंक परिक्षीती[7] ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र त्याहुनी अधीक ॥ शोभत श्री-मुख कृष्णजीचें ॥ २ ॥

---

१ कृष्णाचा भक्त एक यादव. २ लक्ष्मीचा प्रिय. ३ जन्ममरणांचे हेलपाटे. ४ चार वेद; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष, आणि छंद हीं सहा अंगें; पुराणें; न्याय; मीमांसा; आणि धर्मशास्त्र; मिळून १४ विद्या, अथवा १४ भुवनांतील लोक. ५ आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य आणि दोन आश्विनीकुमार अथवा प्रजापति व वषट्कार असे ३३ कोटि म्हणजे प्रकार. ६ (१) मीमांसा, (२) वेदांत, (३) सांख्य, (४) योग, (५) न्याय, (६) व्याकरण, धर्म, अशीं सहा शास्त्रें. ७ हें संबोधन.

भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा ॥ खेळत सांवळा जगद्गुरू ॥ ३ ॥
वैजयंती[1] माळा किरीट कुंडलें ॥ अक्रूरें देखिले दोघेजण[2] ॥ ४ ॥
जोडोनीयां हात घाली नमस्कार ॥ वाहातसे नीर क्षणक्षणा ॥ ५ ॥
**नामा** म्हणे त्वरें धांवे हृषीकेशी ॥ धरीत पोटासीं अक्रूरातें ॥ ६ ॥

(४)

भेटि देई मज म्हणे बळीरामा ॥ न वर्णवे प्रेमा अक्रूराचा ॥ १ ॥
पेंद्यासी[3] पुसती अवघे गडी तेव्हां ॥ कोण रे हा बावा आला एथें ॥ २ ॥
आपल्या कान्होबाच्या[4] पायां कां पडतो ॥ काय हा मागतो आम्हां सांगें ॥ ३ ॥
अक्रूर बळिराम घरीं आले गोपाळ ॥ नंदादी सकळ भेटीमेळे ॥ ४ ॥
मधुपर्क-विधि[5] करीता पूजन ॥ म्हणे धन्य दिन आजिचा हा ॥ ५ ॥
अक्रूराबरोबरी करीती भोजन ॥ पुसे वर्तमान मग त्यासी ॥ ६ ॥
भक्त माझें दैवत जगा दावी मात ॥ कृपाळु बहुत **नामा** म्हणे ॥ ७ ॥

(५)

प्रातःकाळीं मात[6] झाली गोकुळांत ॥ जातो भगवंत मथुरेसी ॥ १ ॥
गौळणींचा मेळा मिळाला सकळ ॥ पिटीती कपाळ आपुलें हातें ॥ २ ॥
एकी त्या घालीती केसांमध्यें माती ॥ एकी त्या लोळती भूमीवरी ॥ ३ ॥
आम्हां सोडोनीयां तूं रे कैसा जासी ॥ तुजवीण पीसीं आम्ही सर्व ॥ ४ ॥
कोण्ही रथापुढें जावोनीयां पडती ॥ आक्रोशें रडती सकळीक ॥ ५ ॥
अक्रूर[7] नव्हे बाई मोठा असे क्रूर ॥ नामीं निरंतर[8] क्रिया वसे ॥ ६ ॥
अक्रूरा आम्ही सर्व पसरीतों पदर ॥ नेऊं नको श्रीधर मथुरेसी ॥ ७ ॥
**नामा** म्हणे शोक न वर्णवे आतां ॥ झाला तो हाकीता रथ त्वरें ॥ ८ ॥

(६)

ब्रह्म-निष्ठ तेव्हां स्थिरावला चित्तीं ॥ अक्रूराचे गळती दोन्ही नेत्र ॥ १ ॥
दहीं-दूध-तूपें भरील्या कावडी ॥ चालती तांतडी सकळीक ॥ २ ॥
व्यापिलें अक्रूराचें मन ॥ काय वर्तमान होइल नेणों ॥ ३ ॥

---

१ विष्णूच्या गळ्यांतील पांच प्रकारच्या रत्नांची माला. २ बळराम व कृष्ण. ३ कृष्णाच्या खेळगड्यांपैकीं एक भोळसर खेळगडी. ४ कृष्णाच्या. ५ कोणी प्रतिष्ठित पाहुणा घरीं आला असतां दहीं, तूप व मध हीं त्यास देण्याची पूर्वी चाल असे, त्याला मधुपर्क म्हणत. ६ गोष्ट, वातमी. ७ हा अक्रूर नव्हे, तर क्रूरच आहे, आणि त्या नांवासारखी त्याची करणी आहे हा भाव.

नर-नारी शोक करीती सकळ ॥ दुराचारी खळ कंस आहे ॥ ४ ॥
मार्गीं तो स्नानासी उतरला अक्रूर ॥ रथावरी किशोर नंदजीचे ॥ ५ ॥
सोडोनियां घोडीं चालला तांतडी ॥ दिली असे बुडी जळामध्यें ॥ ६ ॥
दावोनी कौतुक[1] निरसी त्याचा धाक ॥ सांगतसे शुक परिक्षीती ॥ ७ ॥
जुंपोनीयां घोडीं चालीला स-त्वर ॥ लोपे दिन-कर नामा म्हणे ॥ ८ ॥

( ७ )

इच्छामात्रें मोडी ब्रह्मांडांच्या कोटी ॥ चालीला जग-जेठी कंस-द्वारा ॥ १ ॥
मदोन्मत्त हस्ती देखोनीयां हांसे ॥ पीतांबर कासे खोवीयेला ॥ २ ॥
सांवरोनी हातें केसां देत गांठ ॥ खोवीतसे नीट वैजयंती ॥ ३ ॥
खांबा टेकोनीयां राहे पुढें उभा ॥ सांवळी ही प्रभा अंग-कांती ॥ ४ ॥
पाहोनीयां मुख झाले समाधिस्थ ॥ ऋषी मुनी समस्त वेडावले ॥ ५ ॥
दुष्ट पापी हत्ती घाली अंगावरी ॥ क्षणार्धेंची मारी गजालागीं ॥ ६ ॥
उपडोनीयां दांत घेतसे श्री-धर ॥ जाहाला उद्धार कुवलयाचा[2] ॥ ७ ॥
नामा म्हणे पुढें चालीला गोविंद ॥ सावध सावध परिक्षीती ॥ ८ ॥

( ८ )

चौदा भुवनें वसती जयाचीये पोटीं ॥ त्यासी आणि [3]जेठी मारावया ॥ १ ॥
इंद्रादी सुर-वर जयाचे किंकर ॥ त्याशीं आणि पामर झोंबीसाठीं ॥ २ ॥
आतुर्बली तेव्हां दिसे नारायण ॥ जळतसे मन वैरीयांचें ॥ ३ ॥
कंसाचे अंगणीं उभा असे देव ॥ जैसा ज्याचा भाव तैसा भासे ॥ ४ ॥
कृष्णातें देखोनी वल्गना करीती ॥ चोळीताती माती दंडालागीं ॥ ५ ॥
बळिभद्रासी खुण दावीयेली तेव्हां ॥ उशीर न लावा मारायासी ॥ ६ ॥
नामा म्हणे एक उरलासे कंस ॥ वधिती सकळांस दोघेजण ॥ ७ ॥

---

१ मथुरेस जातांना वाटेंत यमुनेवर अक्रूर स्नानास उतरला, तेव्हां बळराम व कृष्ण हे झाडाखालीं रथावरच होते. इकडे अक्रूरानें बुडी मारली तों पाण्यांतही ते दोघे त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां विस्मित होऊन त्यानें वर रथाकडे पाहिलें तों त्यांत ते आहेतच, असें पाहून त्यास वाटलें कीं, पाण्यांत ते दृष्टीस पडले, ती भ्रांति असावी; म्हणून त्यानें पुनः बुडी मारिली, तेव्हांही ते पूर्वीप्रमाणें तेथें त्याच्या दृष्टीस पडले. हा अद्भुत चमत्कार पाहून हे ईश्वरांश आहेत, यांस कंसापासून कांहींएक भय नाहीं, अशी त्याची पूर्ण खात्री झाली; आणि त्यानें हा चमत्कार इतर गोपजनांस सांगितल्यावरून त्यांचीही भीति दूर झाली. २ कुवलयापीड नांवाच्या हत्तीचा. ३ मल्ल.

( ९ )

रमेच्या वल्लभें देखीयेला कंस ॥ धरूनी आवेश बैसलासे ॥ १ ॥
त्वरें जावोनीयां धरियेला केशीं ॥ पाडीला भूमीसी दुष्ट-बुद्धी ॥ २ ॥
वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण ॥ सोडीयेला प्राण कंसें तेव्हां ॥ ३ ॥
देव वर्षताती सुमनांचे भार ॥ भक्त जयजयकार गर्जताती ॥ ४ ॥
गाऱ्हाणें सांगती ऋषि मुनि सर्व ॥ गाताती गंधर्व सप्त-स्वरें ॥ ५ ॥
**नामा** म्हणे पुढें अप्सरा नाचती ॥ वर्णिताती कीर्ति कृष्णजीची ॥ ६ ॥

---

## *जनाबाईचे स्फुट अभंग.

ऐसी कीर्तनाची गोडी ॥ वैकुंठींहुनि घाली उडी ॥ १ ॥
आपण वैकुंठींच नसे ॥ भक्तांपाशीं जाण वसे ॥ २ ॥
**जनी** म्हणे कृपा-निधी ॥ भक्ति-भावाची मांदी[1] शोधी ॥ ३ ॥

( २ )

ये रे ये रे माझ्या रामा ॥ मन-मोहन मेघ-श्यामा ॥ १ ॥
संत-मिसें भेटी ॥ देईं देईं कृपा गोष्टी ॥ २ ॥
आमची चुकवीं जन्म-व्याधी ॥ आम्हां देईं हो समाधि[2] ॥ ३ ॥
**जनी** म्हणे चक्र-पाणी ॥ करीं ऐसी हो करणी ॥ ४

( ३ )

अहो नारायणा ॥ मजवरी कृपा कां करांना ॥ १ ॥
मी तों अज्ञानाची राशी ॥ म्हणून आलें पायांपाशीं ॥ २ ॥
**जनी** म्हणे आतां ॥ मज सोडवीं कृपावंता ॥ ३ ॥

( ४ )

गंगा गेली सिंधूपासीं ॥ त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
तरि तें सांगावें कोणाला ॥ ऐसें बोलें बा विठ्ठला ॥ २ ॥
जळ कोपलें जळ-चरा ॥ माता अव्हेरी कुमारा ॥ ३ ॥
**जनी** म्हणे शरण आले ॥ पाहिजे ते उद्धरिले ॥ ४ ॥

( ५ )

तुझी नाहीं केली सेवा ॥ दुःख वाटतसे जीवा ॥ १ ॥
नष्ट पापीण मी हीन ॥ नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥

---

* ही नामदेवाच्या घरची दासी होती. १ मंडळी. २ समाधान.

जें जें दुःख झालें मला ॥ तें तूं सोशिलें विठ्ठला ॥ ३ ॥
क्षमा करीं देव-राया ॥ दासी जनी लागे पाया ॥ ४ ॥

(६)

विवेक-सागर[1] ॥ सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनियां जावें ॥ बा माझ्याच्या पोटा यावें ॥ २ ॥
ऐसें करीं गा माझ्या भावा ॥ बापा माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥
जाईन वोवाळोनी ॥ जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ४ ॥

(७)

देव भावाचा लंपट ॥ सोडुनी आला वैकुंठ ॥ १ ॥
पुंडलिकापुढें उभा ॥ सम चरणांची शोभा ॥ २ ॥
उभा बैसेना सर्वथा ॥ पाईं वीट पंढरि-नाथा ॥ ३ ॥
सर्व सुखाचा सागर ॥ जनी म्हणे सारंग-धर[2] ॥ ४ ॥

(८)

ज्याचा सखा हरी ॥ त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें ॥ वारें सोशी आघाताचें[3] ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी ॥ कदा आपण नव्हे दूरी ॥ ३ ॥
अंग आपुलें वोढोनि ॥ त्याला राखे जो निर्वाणीं[4] ॥ ४ ॥
ऐसा अंकीत[5] भक्तासी ॥ म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

(९)

जेवीं जेवीं गा मुरारी ॥ तुज वाढितें शीदोरी[6] ॥ १ ॥
कनकाचे ताटीं ॥ रत्न-जडित ठेविली वाटी ॥ २ ॥
आमुचें ब्रह्म सारंग-पाणी ॥ फिरतसे वनोवनीं ॥ ३ ॥
गोपाळांचे मेळीं ॥ करीतसे हो राडोळी[7] ॥ ४ ॥
तुळसीच्या वनीं ॥ उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

(१०)

जाति-हीन चोखामेळा[8] ॥ त्याला भक्तीचा कळवळा ॥ १ ॥
त्याचा जाला म्हर्णायारा[9] ॥ राहे घरीं धरी थारा ॥ २ ॥

१ विचाराचा समुद्र. २ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा, विष्णु. ३ संकट किंवा दुःख ह्यांचा प्रहार-घाव. ४ संकटसमयीं. ५ स्वाधीन. ६ सिद्ध अन्न. ७ क्रीडा. ८ हा जातीचा महार असून विठोबाचा परम भक्त होता. ९ म्हणविणारा–सेवक.

देव जेवी तया घरा ॥ त्याचा भक्ति-भाव खरा ॥ ३ ॥
देव बाटविला तेणें ॥ हांसे **जनी** गाय गाणें ॥ ४ ॥

( ११ )

चोरा संगतीनें गेला ॥ वाटे जातां नागवला ॥ १ ॥
तैसी सांडोनियां भक्ती ॥ धरी विषयाची संगती ॥ २ ॥
अग्नीसवें खेळे ॥ न जळला तरी पोळे ॥ ३ ॥
विश्वासला चोरा ॥ **जनी** म्हणे घाला खरा ॥ ४ ॥

( १२ )

कोणे एके दिवसीं ॥ विठो गेला जनीपाशीं ॥ १ ॥
हळूच मागतो खायासी ॥ काय देऊं बा मी तुसी ॥ २ ॥
हातीं धरून नेला आंत ॥ वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥
प्रेम-सुखाचा ढेंकर दिला ॥ **जनी** म्हणे वीठो धाला ॥ ४ ॥

( १३ )

लोलो[1] लागला अंबेचा ॥ विठाबाई आनंदीचा[2] ॥ १ ॥
आदि ठाणें पंढरपुर ॥ नांदे कान्हाई सुंदर ॥ २ ॥
गोणाईनें नवस केला ॥ देवा पुत्र देई मला ॥ ३ ॥
शुद्ध देखोनियां भाव ॥ पोटीं आले नामदेव ॥ ४ ॥
दामाशेटी हरुषला ॥ दासी **जनी**स आनंद झाला ॥ ५ ॥

( १४ )

काय करूं पंढरि-नाथा ॥ काळ साह्य नाहीं आतां ॥ १ ॥
मज टाकिलें पर-देशीं ॥ नाहीं विठ्ठला तुजपाशीं ॥ २ ॥
बहु श्रम झाले जिवा ॥ आतां सांभाळीं केशवा ॥ ३ ॥
तुजवीण सखा कोण ॥ माझें करी समाधान ॥ ४ ॥
लीन दीन तुझे पोटीं ॥ **जनी** म्हणे देई भेटी ॥ ५ ॥

( १५ )

आम्ही बळवंताच्या दासी ॥ कोण गर्भ-वास सोसी ॥ १ ॥
करूं यमासी ताडण ॥ आमुचा धनी नारायण ॥ २ ॥
**जनी** म्हणे हरी ॥ पाप उरों नेदी उरी ॥ ३ ॥

---

1 छंद. 2 देवीचा.

## राजाईचे[1] स्फुट अभंग.

घर-धन्यानीं केला गुरू ॥ बाई मी आतां काय करूं ॥
असून नाहीं हा संसारू ॥ चमत्कारू कृपेचा ॥ १ ॥
धांव पाव गे मेसाई ॥ कवणाचेंही न चले काई ॥
सत्यपण तुझियेठायीं ॥ असून नाहींसें करीं हें ॥ २ ॥
मंत्र घेतलासे जैसा ॥ घरीं संताचा बोळसा ॥
वोस पडो या हरि-दासां ॥ गेले न येती मागुती ॥ ३ ॥
काय सांगूं यांच्या रिती ॥ सोसें पायवणी पिती ॥
अवघे भांबरभुते[2] होती ॥ नाचताती आनंदें ॥ ४ ॥
एकमेकांच्या पडती पायां ॥ लौकिकांतुन गेले वायां ॥
म्हणती ये गा पंढरी-राया ॥ ब्रह्मानंदें डुलती ॥ ५ ॥
भोळी सासु गोणाबाई ॥ पांढरा स्फटीक व्याली काई ॥
त्यानें जोडला शेष-शायी ॥ म्हणे राजाई काय करूं ॥ ६ ॥

## गोणाईचे[3] स्फुट अभंग.

गोणाई म्हणे नाम्या सांडीं देव-पिसें ॥ बळें घर कैसें बुडविशी ॥ १ ॥
जनाचीं लेंकुरें वर्तताती कैशीं ॥ तूं मज झालासी कुल-दीपु[4] ॥ २ ॥
धन्य धन्य पुत्र-कलत्रें नांदती ॥ अ-भाग्याचे चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥
यातें जे अनुसरती त्यांचें नुरे कांहीं ॥ हा देव नोहे पाहीं घर-घेणा ॥ ४ ॥
याची भक्ती कैशी लौकिकावेगळी ॥ संसाराची होळी केली नाम्या ॥ ५ ॥
गोणाई म्हणे नाम्या हें रे नव्हे भलें ॥ घर त्वां बुडविलें कुळासहित ॥ ६ ॥

( २ )

दोन प्रहर रात्र पाहोनि एकांत ॥ राजाई वृत्तांत सांगे माते ॥ १ ॥
अहो रखुमाबाई विठोबासी सांगा ॥ भ्रतारासी कां गा वेडें केलें ॥ २ ॥
वस्त्रपात्र नाहीं खाया जेवायासी ॥ नाचे अहर्निशि निर्लज्जसा ॥ ३ ॥
चवदा मनुष्यें आहेत माझे घरीं ॥ हिंडती दारोदारीं अन्नासाठीं ॥ ४ ॥
बरा मार्ग तुम्ही उमजोनी सांगा ॥ नामयाची राजा[5] भली नव्हे ॥ ५ ॥

---

१ नामदेवाची बायको. २ वेडे. ३ नामदेवाच्या आईचें नांव. ४ कुळाला भूषण; ( एथें व्याजोक्ति आहे ). ५ राजाई.

### गोंदोबाचे स्फुट अभंग.

भावें भक्ति-वादें करावें कीर्तन ॥ आशा-बद्ध मन करूं नये ॥ १ ॥
निष्कामें[2] करावें देवाचें कीर्तन ॥ भय हें सांडून शरीराचें ॥ २ ॥
रणामध्यें कैसा भिडतो रण-शूर ॥ होवोनी उदार जीवावरी ॥ ३ ॥
तैसा पांडुरंगीं धरा हो निर्धार ॥ उतरा हा पार भव-सिंधु ॥ ४ ॥
सिंधु उतरोनी लावा जग-ढाल[3] ॥ पाहा तें नवळ विठ्ठलाचें ॥ ५ ॥
देव जोडियेला तया काय उणें ॥ गोंदा म्हणे मन धीट करा ॥ ६ ॥

## एकनाथ.

**ज्ञानदेव, नामदेव** ह्यांच्या पाठीमागून सुमारें तीनशें वर्षांनीं **एकनाथ** झाला. ह्याला साधूंत गणितात, इतकेंच नाहीं, तर ज्ञानदेवाचा प्रत्यक्ष अवतार असें ह्याला समजतात. हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण **गोदातीरीं प्रतिष्ठानास** म्हणजे **पैठणास** राहत असे. ह्याचा जन्मकाल माहीत[4] नाहीं. ह्याच्या बापाचें नांव **सूर्यनारायण** आणि आईचें नांव **रुक्मिणीबाई**. ह्याचा बाप लहानपणींच वारला व ह्याचें पालनपोषण ह्याच्या आजानें केलें.

एकनाथाच्या स्त्रीचें नांव **गिरजाबाई**. ह्यास एक पुत्र आणि दोन कन्या होत्या. पुत्राचें नांव **हरिपंडित** आणि कन्यांचीं नांवें **गोदूबाई** व **गंगाबाई**.

एकनाथ मोठा परोपकारी असून त्याचें आचरण फार पवित्र असे. तसेंच शांति, क्षमा इत्यादि गुणही त्याच्या ठायीं लोकोत्तर होते. पितरांच्या उद्देशानें केलेलें अन्न अन्त्यजांस देणें, उन्हांत तळमळणाऱ्या चांभाराच्या पोराला कडेवर घेऊन घरीं पोहोंचविणें, इत्यादि त्याच्या संबंधाच्या गोष्टींवरून नीच जातींतलि लोकांविषयींही त्याच्या अन्तःकरणांत प्रेमभाव असल्याचें स्पष्ट होतें.

एकनाथ स्वतः संस्कृत भाषेंत मोठा पंडित होता, तरी महाराष्ट्र भाषेच्या उद्धाराकरितां त्यानें मुख्यत्वें ओंवीबद्ध ग्रंथ केले आहेत; शिवाय कांहीं अभंग व पदेंही केलीं आहेत. ह्यानें हिंदुस्तानी भाषेंतही कांहीं कविता केली आहे. एकनाथाचा गुरु **जनार्दनपंत** नामें होता, त्या संबंधानें त्यानें आपल्या कवितेंत आपलें नांव **एकाजनार्दन** असें लिहिलें आहे.

---

१ नामदेवाच्या मुलांपैकीं एकाचें नांव. २ कामनेवांचून. ३ झेंडा, ध्वज. ४ एकनाथ हा शके १४७० त जन्मला असा आतां शोध लागला आहे.

ज्ञानेश्वरीच्या भिन्न भिन्न प्रती जमवून व त्यांतील पाठांतरांचा विचार करून एकनाथानें शके १५१२ त ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली.

एकनाथाची भाषा सरळ आहे व तींत फारसे अप्रसिद्ध शब्द नाहींत. ह्याची वर्णन करण्याची शैली चांगली आहे. याचा मरणशक १५२१ आहे. फाल्गुन वद्य ६ रोजीं एकनाथ समाधिस्थ झाला असें वर्णन आहे.

## ह्यानें केलेले प्रसिद्ध ग्रंथ.

१ एकनाथी भागवत (भागवताच्या एकादश स्कंधावरील टीका). २ भावार्थ-रामायण. ३ रुक्मिणीस्वयंवर. ४ स्वात्मसुख. ५ चतुःश्लोकी भागवत टीका. ६ हस्तामलक. ७ आनंदलहरी.

---

## वेंचे–एकनाथी भागवत–अध्याय ४.

## नरनारायणाख्यान.

पूर्वीं **नारायण** या नांवाचा एक ऋषि होऊन गेला. त्यानें बद्रिकाश्रमांत राहून तप आरंभिलें; तेव्हां त्याचें उग्र तप पाहून इंद्राला आपल्या पदाविषयीं शंका आली व त्यानें काम क्रोध वगैरे मंडळी अप्सरांसह त्याच्याकडे त्याच्या तपाचा भंग करण्याकरितां रवाना केली. त्या प्रसंगीं नारायणानें आपली शांति न ढळूं देतां त्यांस फजित केलें अशी कथा या आख्यानांत आहे.

### ओंव्या.

जो अ-जन्मा नित्य त्रि-भुवनीं ॥ जो न जन्मोनि जन्मला योनीं ॥ तेणें धर्माची[1] धर्म-पत्नी ॥ केली जननी दक्ष-कन्या मूर्ती ॥ १ ॥ ते[2] मूर्ती[3]-मातेच्या उदरीं ॥ नर-नारायण अवतारी ॥ एकाचें दों रूपें करी ॥ धर्माच्या घरीं अवतरले ॥ २ ॥ तेणें नारदादिकांसि जाण ॥ निरूपिलें नैष्कर्म्य[4]लक्षण ॥ स्वयें आचरला आपण ॥ तें कथन ऐक राया[5] ॥ ३ ॥ नारायण म्हणसी कोणें देशीं ॥ तो बदरिकाश्रमीं आश्रम-वासी ॥ नारद-सनकादिक ऋषि ॥ अद्यापि त्यापाशीं सेवे असती ॥ ४ ॥ त्यासि स्वरूपाचें लक्ष ॥ सहजीं असे प्रत्यक्ष ॥ ते स्वरूप-निष्ठेचा पक्ष ॥ अलक्ष्याचें[6] लक्ष प्रबोधी स्वयें ॥ ५ ॥ तया स्वरूपाचा निज-बोध ॥ स्वयें पावावया विशद ॥ अद्यापवरी ऋषि-वृंद ॥

---

१ ह्या नांवाच्या ऋषीची. २ त्या. ३ मूर्ति (हें नरनारायणांच्या आईचें नांव). ४ पूर्ण ज्ञानाच्या योगानें कर्म करूनही कर्मकर्तृत्वाचा अभिमान नसणें. ५ हे जनकराजा. ६ मनाला व वाणीला अगोचर जें आत्मतत्त्व त्याचें ज्ञान.

नित्य संवाद करिताती त्यासीं ॥ ६ ॥ जें स्व-रूप लक्षेना जनीं ॥ तें विशद करून दे वचनीं ॥ तेंचि अनु-ग्रहें करूनी ॥ अनु-भवा आणी तत्काळ ॥ ७ ॥ ज्ञाते बहुसाळ ऋषीश्वर ॥ त्यांमाजीं नारायण अवतार ॥ तेथें वर्तलें जें चरित्र ॥ अति विचित्र ऐक राया ॥ ८ ॥ ऐसा नारायणाचा प्रताप ॥ देखोनि निष्ठा दृढ तप ॥ तेणें इंद्रासि आला कंप ॥ म्हणे स्वर्ग निष्पाप घेईल माझा ॥ ९ ॥ त्याचें तप देखोनि परम ॥ म्हणे गेलें गेलें स्वर्ग-धाम ॥ इंद्रें कोपें प्रेरिला काम ॥ अप्सरा-संभ्रमसमवेत ॥ १० ॥ कामसमवेत अप्सरा ॥ सवें वसंतही दूसरा ॥ क्रोध अवधियां पुढारा ॥ जो तापसांतें पुरा नागवी सदा ॥ ११ ॥ तीर्थोतीर्थींच्या अनुष्ठाना ॥ क्षमा नुपजे अंतःकरणा ॥ कोप येतांच जाणा ॥ करी उगाणा[1] तपाचा ॥ १२ ॥ क्रोध तापसांचा उघड वैरी ॥ तापसां नागवी नाना-परी ॥ तोही नारायणावरी ॥ अवघ्या अग्रीं चालिला ॥ १३ ॥ ऐशीं मिळोनि विरुदाइतें ॥ आलीं बदरिकाश्रमा समस्तें ॥ नारायण तप करी जेथें ॥ उठावलीं तेथें अनुक्रमेंसी ॥ १४ ॥ वसंतें शृंगारिलें वन ॥ कोकिळा कला-रावें[2] गायन ॥ सुगंध शीतळ झळके पवन ॥ पराग संपूर्ण वर्षती सुमनें ॥ १५ ॥ शस्त्रें तोडितां आकाशासी ॥ आकाश स्वयें सावकाशी ॥ तेवीं कामें छळितां नारायणासी ॥ तो निज-संतोषी निर्द्वंद्व[3] ॥ १६ ॥ नेणतां नारायण-महिमे ॥ धांवोनि घाला घातला कामें ॥ तेव्हां अवघींच पराक्रमें ॥ स्व-निंद्यकर्में लाजलीं ॥ १७ ॥ तेथें अवघीं झालीं पराङ्मुखें ॥ पाठमोरीं निघालीं अधोमुखें ॥ तेव्हां त्यांची गती निःशेखें ॥ नारायण देखे खुंटली ॥ १८ ॥ इंद्रियनियंता नारायण ॥ नेणूनि छळूं गेलीं आपण ॥ यापुढतीं पुनरागमन ॥ सर्वथा जाण करवेना ॥ १९ ॥ मागें न निघवे निश्चितें ॥ ऐसें जाणोनि समस्तें ॥ थोर गजबजिलीं तेथें ॥ भय-चकितें व्याकुळ ॥ २० ॥ जाणोनि नारायण-प्रताप ॥ आतां कोपून देईल शाप ॥ येणें धाकें म्लानरूप ॥ अति स-कंप भय-भीतें ॥ २१ ॥ ऐशी देखोनि त्यांची स्थिती ॥ कृपेनें तुष्टला कृपा-मूर्ती ॥ अणु-मात्र कोप न ये चित्तीं ॥ अभिनव शांती नारायणाची ॥ २२ ॥ इंद्रें केला अपराध ॥ तरी नारायणासि न येचि क्रोध ॥ बाप[4] निज शांती अ-गाध ॥ न मानी विरुद्ध कामादिकांचें ॥ २३ ॥ न येचि कामादिकांवरी कोप ॥ इंद्रा-सही नेदीच शाप ॥ नारायणाच्या ठायीं अल्प ॥ कदा विकल्प नुपजेची ॥ २४ ॥

---

१ लूट, नाश. २ (कल+आरावें) अव्यक्त व मधुर अशा शब्दानें. ३ आत्मस्वरूपा-व्यतिरिक्त ज्यास दुसऱ्या कशाचेंही भान नाहीं असा. ४ मोठी.

अपकाऱ्यावरी जो कोपला ॥ तो तत्काळ कोपें नागविला ॥ अपकाऱ्या जेणें उपकार केला ॥ तोचि लाधला परमार्था ॥ २५ ॥ अपकाऱ्या उपकार करिती ॥ त्याचि नांव गा परम शांती ॥ ते शांतीची निज स्थिती ॥ दावी लोकांप्रती आचरोनी ॥ २६ ॥ परमार्थाची मुख्यत्वें स्थिती ॥ पाहिजे गा परम शांती ॥ ते शांतीची उत्कट गती ॥ दावी लोकांप्रती आचरोनी ॥२७॥ भय-भीत कामादिक ॥ अप्सरा-गण साशंक ॥ त्यांतें अ-भय-दानें सुख ॥ देऊनियां देख नारायण बोले ॥ २८ ॥ आहो कामवसंतादिक स्वामी ॥ कृपा करून आलेत तुम्हीं ॥ तुमचेनि पदागमीं ॥ आश्रम-भूमि पुनीत झाली ॥ २९ ॥ तुमचें झालीया आ-गमन ॥ अवश्य करावें आम्हीं पूजन ॥ हेंचि आमुचें अनुष्ठान ॥ कांहीं बळि-दान[1] अंगीकारा माझें ॥ ३० ॥ अहो अप्सरा देवकांता ॥ तुम्हीं भिऊं नका सर्वथा ॥ एथें आलिया समस्ता ॥ पूज्य सर्व तुम्हीं मज ॥ ३१ ॥ आश्रमा आलिया अतिथी ॥ जे कोणी पूजा न करिती ॥ त्यांची शून्य पुण्य-संपत्ती ॥ आश्रम-स्थिती शून्य होय ॥ ३२ ॥ तुम्हीं नांगीकारितां पूजन ॥ कांहीं न घेतां बळि-दान ॥ गेल्या आश्रम हा होईल शून्य ॥ यालागीं कृपा करून पूजा घ्यावी ॥ ३३ ॥ आश्रमा आलिया अतिथी ॥ तो पूज्य सर्वांस सर्वार्थीं ॥ अतिथी आश्रमीं जे पूजिती ॥ ते आश्रम-कीर्ती शिव वानी ॥ ३४ ॥ व्याही रुसलिया पायां पडती ॥ तेवीं वि-मुख जातां अतिथी ॥ जे वंदूनिया सुखी करिती ॥ ते सुख पावती स्वानंदें ॥ ३५ ॥ व्याही रुसलिया कन्या न धाडी ॥ अतिथी रुसलिया पुण्य-जोडी ॥ पूर्वापर जे कां जोडी ॥ तेही रोकडी क्षय पावे ॥३६॥ वैकुंठीं ज्याची निज-स्थिती ॥ तो त्या आश्रमा ये नित्य वस्ती ॥ जे आश्रमीं अतिथी ॥ पूजिती प्रीती ब्रह्मात्म-भावें ॥ ३७ ॥ ऐसें बोलिला तयांप्रती ॥ परी माझी हे अ-गाध शांती ॥ हेही नारायणाचे चित्तीं ॥ गर्व-स्थिती असेना ॥ ३८ ॥ ऐक राया अति-अपूर्व ॥ असोनि निज-शांती अनुभव ॥ ज्याच्या ठायीं नाहीं गर्व ॥ तोचि देवाधिदेव निश्चयेंसी ॥ ३९ ॥ जो नित्य नाचवी सुर-नरांसी ॥ ज्यां भेणें तप सोडिलें तापसीं ॥ त्या अ-भय देवोनि काम-क्रोधांसी ॥ आपणापासीं राहविलें ॥ ४० ॥ एवं अ-भय देत नारायण ॥ स्व-मुखें बोलिला आपण ॥ तेणें कामादि अप्सरा-गण ॥ लाजाविरोन अधोमुख झालीं ॥ ४१ ॥ देखोनि

---

1 पूजाद्रव्य.

निर्विकार पूर्ण क्षमा ॥ श्री-नारायण हा परमात्मा ॥ कळों[1] सरलें वसंतादि-कामां ॥ त्याचाचि महिमा वर्णिती स्वयें ॥ ४२ ॥ ऐकें नर-देव-चक्रवर्ती ॥ विदेहा सार्वभौमा भू-पती ॥ त्या नारायणाची निज-स्तुती ॥ कामादि करिती सद्भा-वेंसीं ॥ ४३ ॥ जे सदा सर्वांतें छळिती ॥ त्यांहीं देखिली पूर्ण शांती ॥ तेचि शांतीची स्तुती करिती ॥ नारायणाप्रती कामादि क्रोध ॥ ४४ ॥ जेणें संतोषे श्री-नारायण ॥ त्यासी कृपा उपजे पूर्ण ॥ ऐशिया परीचें स्तवन ॥ मांडिलें संपूर्ण परमार्थ-बुद्धी ॥ ४५ ॥ जय-जय देवाधि-देवा ॥ तुझिया अ-विकार-भावा ॥ पाहतां न देखों जी सर्वा ॥ देवां मानवां माझारी ॥ ४६ ॥ मज मन्मथाचा यावा[2] ॥ न साहवे देवां दानवां॥ मग तेथें इतरा मानवां ॥ कोण केवा[3] सहावयासी ॥ ४७ ॥ त्या मज कामा न सरतें केलें ॥ शांतिचें कल्याण पाहिलें ॥ हें तुवांचि एकें यश नेलें ॥ स्व-भाव जिंकिले निज-शांति-योगें ॥ ४८ ॥ तो मी न सरता केला काम ॥ क्रोधा आणिला उप-शम ॥ वासनेचा सं-भ्रम ॥ नित्य निर्भ्रम त्वां केला ॥ ४९ ॥ हे नारायणा तुझी निष्ठा ॥ न ये आणिका तपोनिष्ठा ॥ केला अनुभवाचा चोहटा ॥ शांतीचा मोठा सु-काळ केला ॥ ५० ॥ मागें तपस्वी वाखाणिले ॥ म्हणती काम-क्रोधां जिंकलें ॥ त्यांसिही आम्हीं पूर्ण छळिलें ॥ ऐक तें भलें सांगेन ॥ ५१ ॥ कपिलों[4] ऐसा तेजोराशी ॥ क्रोधें तत्काळ छळिलें त्याशी ॥ शाप देतांचि सगराशी ॥ तोही क्रोधासी वश्य झाला ॥ ५२ ॥ जो सर्वदा विघ्नातें आकळी ॥ विघ्ने-शातें[5] कोप छळी ॥ तेणें अति कोपें कोपानळीं ॥ चंद्रासी तत्काळीं दिधला

---

१ कळून आलें. २ आगमन. ३ सामर्थ्य, पाड. ४ सूर्यवंशांतील सगर राजानें यज्ञसंबंधीं घोडा पृथ्वीवर फिरावयास सोडिला, आणि त्याच्या संरक्षणार्थ आपले साठ हजार मुलगे बरोबर पाठविले. वाटेंत इंद्रानें तो घोडा चोरून विवरांत कपिलमहामुनि ध्यानस्थ होता त्याच्या-जवळ बांधून ठेविला. तेव्हां एकाएकीं घोडा काय झाला म्हणून पहावयास, ज्या जागीं घोडा अदृश्य झाला ती जागा सगरपुत्रांनीं उकरिली; तों तो घोडा कपिलाशेजारीं दृष्टीस पडला. तेव्हां हाच आपला घोडा चोरणारा असें त्यांस वाटलें. नंतर त्यांच्या गडबडीनें ध्यानविसर्जन करून कपिलानें डोळे उघडून कोपानें त्यांजकडे पाहतांच ते भस्म झाले. अशी कथा रामायणांत आहे. ५ चंद्राला आपल्या रूपाविषयीं मोठा गर्व होता. तो एकदां गणपतीकडे पाहून त्याच्या रूपाच्या बेढबपणामुळें त्यास हांसला, तेव्हां गणपतीस कोप येऊन त्यानें चंद्रास तुजकडे कोणीही पाहणार नाहीं असा शाप दिला. मग चतुर्थी-व्रताचरणानें चंद्र शापमुक्त झाला. अशी कथा स्कंदपुराणांत आहे.

प्रार्थुनि म्हणे उगी, हा स्वस्ति[1] असो सर्व-विप्र-राय कवी ॥ १९ ॥
त्यावरि गुरु-कन्योक्तें पुष्पें आणावयासि जाय वना ॥
सांपडला त्या अ-सुरां कच जैसा वत्स एकला यवना ॥ २० ॥
पुनरपि त्या पापांनीं सद्विप्र-कुमार चरचरां चिरिला ॥
भय न धरिलें तिळहि त्या पापाच्या जोडितां महा-गिरिला ॥ २१ ॥
खंड तिळ-प्राय करुनि नेउनि केले नि-मग्न जळ-धींत ॥
नाहींच धर्म करुणा पाप-भय विचार-लेश[2] खळ-धींत ॥ २२ ॥
जो मुनि तयासि कन्या[3]-प्रिय-काम दयालु काव्य तो तारी ॥
रज गोळा करुनि घडी शिष्याची मूर्ति जेविं वोतारी[4] ॥ २३ ॥
पुनरपि तो कच वधिला केला तद्देह दग्ध रुष्टांनीं ॥
शुक्रासि पाजिलें हो तद्भस्म[5] सुरा-रसांत दुष्टांनीं ॥ २४ ॥
कच न दिसतां रडे[6] सुर-यानी, तीतें पिता म्हणे कां गे ॥
वत्से रडसी, ऐसें पुसतां तैसेंच ती पुन्हां सांगे ॥ २५ ॥
शुक्र म्हणे वत्से मी वांचवितों परि पुनः पुन्हां मरतो ॥
आग्रह धरूनि म्हणसी[7] प्रेत-गतिं-गतहि कच पुन्हां परतो ॥ २६ ॥
त्यज शोक, मत्प्रसादें तुज काय उणें, मुली नकोचि रडों ॥
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह दुःखाद्रिला नको चिरडों ॥ २७ ॥
ती तातासि म्हणे कच गुरु-भक्त कुलीन साधु-कार्य-कर ॥
जरि त्यासि सोडिलें जल तरि जल सोडू मलाहि[8] आर्य-कर ॥ २८ ॥
ब्रह्म-घ्नां शिष्यांचीं भीड धरुनि साधु शिष्य मोकलिला ॥
म्हणतिल[9] न ऐकवे तें न स्व-हित रुचीं असें गमो कलिलो ॥ २९ ॥
स्व-मनिं म्हणे[10] कवि-सत्तम मळवावें पंडितें न यश, हाणी ॥
प्राणाचीहि बरी परि न यशाची, सांगती नय शहाणी ॥ ३० ॥
मग मेळवी महात्मा एकत्र समस्त अ-सुर, कोपानें ॥
खवळे[11] प्रिय-पुत्र-भसित-मिश्रित-मधुच्याहि तज्ज्ञ तो पानें ॥ ३१ ॥

---

१ सुखरूप. २ दुष्टांच्या मनांत. ३ मुलीची आवड पुरविण्याची ज्याची इच्छा आहे असा. ४ ओतकाम करणारा. ५ मद्यांत. ६ देवयानी. ७ प्रेताच्या अवस्थेस गेलेला म्हणजे मेलेला. ८ आर्य म्हणजे थोर जो तूं त्याचा हात. ९ कचापासून आपलें हित नाहीं असें दुष्टाला वाटेल तर वाटो, परंतु आपणाला तसें न वाटावें. १० पंडितश्रेष्ठ. ११ आवडत्या पुत्रवत् मानलेल्या कचाची राख मिसळली आहे ज्यांत अशा मद्याच्या प्राशनानें.

अ-सुरांसि म्हणे कां रे नेणा अद्यापि मत्तपा[1], मरतो- ॥
कीं वांचतो पतंग न भी जो ज्वलनासि मत्त पामर तो ॥ ३२ ॥
विप्र अ-वध्य म्हणे श्रुति हाणोनि तिच्याही लात हा केला ॥
कच-हननें सुर-गुरुचा न तुम्हीं माझाचि घात हा केला ॥ ३३ ॥
ब्राह्मण कणसा खुपतो तुमच्या नेत्रीं नसो [2]सवे काढा[2] ॥
युक्तचि मरणाराला हित-परिणामहि न सोसवे काढा ॥ ३४ ॥
धिक्कारुनि अ-सुरांतें धर्मचि तो [3]अमृतमय-वचा शिकवी ॥
बाहे करुणा-विद्या-दिव्य-तपस्या-बळें कचाशि कवी ॥ ३५ ॥
जों गुरु वत्स कच म्हणुनि एहि[4] असें तो म्हणावया योजी ॥
तों विद्या-सामर्थ्यें उपजूनि गुरूदरीं[5] म्हणे वो[6] जी ॥ ३६ ॥
उदर-प्रवेश पुसता झाला तो पुण्य-राशि शुक्र मुनी ॥
सांगुनि खळ-कपट म्हणे[7] एथ वसो काळ हा शिशु क्रमुनी ॥३७॥
निर्भय वसेन काळ क्रमुनि पवित्रोदरीं असाचि सुखें ॥
न हित [8]गुरूदर-दारण निघतां मज निंदितील साधु-मुखें ॥ ३८ ॥
शुक्र म्हणे वत्से कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर ॥
हा तरलाचि परि तुझें या [9]कु-व्यसनीं बुडेल माहेर[9] ॥ ३९ ॥
सुरयानी त्यासि म्हणे वदतां हें अ-शुभ काय हो तात ॥
व्हावे दोघेहि मला चिंता-मणि हेचि पाय होतात ॥ ४० ॥
तारुनि शिष्यासि तरो गुरु, म्हणत्यें पात्र कन्यकान्या[10] या- ॥
नोहे वरासि वर-दा, जाणसि तूं सु-ज्ञ-नायका न्याया ॥ ४१ ॥
भीड सुतेची भारी विद्या संजीविनी कचा शिकवी ॥
गुरुलाहि वांचवाया योग्य करी सज्जना कचाशि कवी ॥ ४२ ॥
गुरु-कुक्षि विदारुनि कच बाहेर निघे परंतु बहु तो भी ॥
उठवुनि गुरु संकोचें नमुनि रडे, [11]कुल-ज-कीर्तिचा लोभी ॥४३॥
[12]कच-घातकासुरांतें सुरयानीचा स्वयें जनक दापी ॥

---

१ माझ्या तपश्चर्येस. २ लागलाच काढतां. अथवा सवे म्हणजे ही सवय काढा म्हणजे टाकून द्या. ३ अमृतासारख्या गोड वाणीचा. ४ ये. ५ शुक्राच्या पोटांत. ६ ओ. ७ कच म्हणाला. ८ गुरूचें पोट फोडणें. ९ ह्या तुझ्या दुष्ट नादानें मी मरेन, असा भाव. १० कन्येहून इतर. ११ कच कुलीनाच्या कीर्तीचा लोभी होता म्हणून गुरूचें पोट फोडून निघाला ह्याची त्यास शरम वाटली असा भावार्थ. ।फक्त कुलज जो असतो तो कीर्तीचा लोभी असतो. १२ कचाला मारणाऱ्या दैत्यांतें.

कीं जो ब्रह्म-द्वेष्टा कुशल न पावेल तो जन कदापी ॥ ४४ ॥
समजा वरें जसा मी विप्र गुरु तसाचि हा कच, पळाला ॥
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु वधिन न देतांचि हाक चपळाला ॥ ४५ ॥
अ-सुरांसि करुनि शिक्षा बाहु उभारुनि म्हणे अहो कानीं- ॥
ध्यावें माझें हित-कर [1]मर्यादा-वचन साधु लोकांनीं ॥ ४६ ॥
जो विप्र आजपासुनि मद्य-प्राशन करील तो पापी ॥
ब्रह्म-घ्ना-सम निश्चित असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥ ४७ ॥
वर्षें सहस्र होता कच गुरु-सेवेंत, मग तया प्राज्ञा ॥
शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा ॥ ४८ ॥
कच सिद्ध होय जों तों शुक्र-सुता त्या मनोहरा उचिता ॥
[2]स्व-कर-ग्रहार्थ विनवी बहु आवडली [3]सु-विद्यता शुचिता[3] ॥४९॥
जें गुरुचें तेंच तिसीं पूज्यत्वाचें धरूनि कच नातें ॥
ठेवूनि दृष्टि धर्मीं तो न तिच्या मान्य होय वचनातें ॥ ५० ॥
पडतां गळां म्हणे कच भगिनीला वरुनियां न भाउ तरे ॥
करितां अ-धर्म सद्यः [4]स्व-पितृ-सुहृज्जन-मुख-प्रभा उतरे ॥ ५१ ॥
सुख व्हावें तरि धर्माप्रति म्हण माथां वसें नसें दूर ॥
पूजा कैची लोकीं जरि दगड शिरीं धरी न सेंदूर ॥ ५२ ॥
धर्म अनंत असो परि तो करितां कीर्तन स्वसे वेचे ॥
सांग प्रकार याहुनि दुसरे कांहीं मज स्व-सेवेचे ॥ ५३ ॥
ज्या उदरीं वास तुझा तेथें माझाहि हें असे नातें ॥
केविं कर-ग्रहण करूं सं-मत धर्मासि जें असेना तें ॥ ५४ ॥
बहु दिवसांची आशा तत्काळ च्छेदितां कचें, रुष्टा- ॥
शुक्र-सुता त्यासि म्हणे, 'रे कपट-पटो भला भला दुष्टा ॥ ५५ ॥
'ऐक कृत-घ्ना जरि मी उठवाचि मदर्थ या हता शत-दा' ॥
ऐसें गुरुस न म्हणतें कैसा उठतास तूं हताश[5] तदा ॥ ५६ ॥
तूं मलिन[6] कुटिल[7] नीरस[8] जडहि[9] पुनर्भवपणें[10] हि कचसा[11] च ॥

---

१ नियमाचें भाषण. २ आपल्या पाणिग्रहणाकरितां म्हणजे आपणाशीं लग्न लावण्यासाठीं. ३ कचाची विद्वत्ता व शुद्ध आचरण हीं तिला फार आवडलीं. ४ आपले वडील व इष्टमित्र यांचें तोंड उतरतें. ५ नष्ट. ६ मळकट, पक्षीं पातकी. ७ कुरळे, पक्षीं कपटी. ८ शुष्क, पक्षीं प्रीतिरहित. ९ अचेतन, पक्षीं मूर्ख. १० वारंवार उत्पन्न होण्यानें, पक्षीं वारंवार मरून जिवंत होण्यानें. ११ केसासारिखा.

धरिला शिरींहि न स्व-प्रकृति-गुण त्यजिसि नाम कच साच ॥ ५७ ॥
न करीं वि-फळ मदाशा, आशा भंगूं त्र्येंचि साधूनीं ॥
जरि भंगिसील, विद्या सिद्ध नसो जीस नेसि साधूनी ॥ ५८ ॥
कचहि म्हणे गुरु-वेदानुज्ञा नाहीं म्हणोनि या कर्मा ॥
मान्य नसें, हूं शापीं कीर्ति-कराचि शाप न चुकतां धर्मा ॥ ५९ ॥
पढवीन ज्यासि विद्या ही त्यासि फळेल, तूंहि घे शाप ॥
तुज कोणीही ऋषि-सुत न वरील, फळो तुझें तुला पाप ॥ ६० ॥
जातां स्वर्गीं मिरवित निज-गुरु-सुत-रत्न देव यानीं तें ॥
वर्णिति दैत्यांतें किति, किति कवितें, कितिक देवयानीतें ॥ ६१ ॥

## आर्या; सुभद्राहरणप्रकरणीं,

(कृष्णविजय उत्तरार्ध अ. ८६).

**धर्म** व **द्रौपदी** हीं उभयतां एकांतीं असतां कांहीं कारणानें त्यांस पाहाण्याचा दोष **अर्जुनाच्या** हातून घडला; त्याच्या निवृत्तिकरितां तो तीर्थाटनास गेला. तेव्हां फिरत फिरत पश्चिमदिशेस **द्वारके**जवळ **प्रभास-तीर्थीं** आल्यावर, त्यानें, **कृष्णाची** धाकटी बहीण **सुभद्रा** ही **बळरामानें** **दुर्योधनास** देण्याचा निश्चय केला आहे, हें वर्तमान ऐकिलें. तेव्हां ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून कृष्णाच्या अनुमतानें त्यानें कपटसंन्यास घेतला, आणि संधि पाहून सुभद्रेचें हरण केलें. मग हा अर्जुन असें समजल्यावर बळरामानें त्यास मोठ्या आदरानें बोलावून आणून सुभद्रा दिली. ही कथा ह्यांत आहे.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासालों ॥
आप्त-मुखें निज-मातुल-कुल-वृत्तांतासि ऐकता झाला ॥ १ ॥
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥
तीतें स्व-मतें हल-धर धृतराष्ट्र-सुतासि द्यावया पाहे ॥ २ ॥

१ आपला स्वाभाविक गुण. २ ब्राह्मणाचा मुलगा. ३ आपल्या गुरूचा उत्तम पुत्र (कच).४ द्वारकेजवळील एका तीर्थाला. ५ आपल्या मामाचें (वसुदेवाचें) कुल म्हणजे यादवकुल, त्याच्या वृत्तांतास. ६ दुर्योधनाला.

तातादिकें म्हणति मनीं सु-मति खळाला अ-चक्षुला रत्न ॥
शूद्रास श्रुति देतो रामें, न चालेचि यापुढें यत्न ॥ ३ ॥
ऐकुनि मनीं म्हणे[2] मज [3]तीर्थ-स्नार्थीस जाहली शुद्धि ॥
या सु-कृतें ते व्हावी प्राप्त वि-रक्तास जेविं सद्बुद्धि ॥ ४ ॥
निर्जे-सुख-सिद्धि सुभद्रा साधाया होइन त्रिदंडि[5] यती ॥
प्रिय तीहूनि नसे मज; तीं[6] कीं ही रीति गति, अहो नियती ॥ ५ ॥
पार्थां त्रिदंडि-वेष स्वीकारी हल-धरासि वंचायों ॥
युक्तीनें स्व-पर-वि-हित-हित करितां कपट-दोष कंचों या ॥ ६ ॥
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चोरें मासपर्यंत ॥
[11]हृर्यंतः-करणासचि ठावा तद्योग[12] जो [13]स-पर्यंत ॥ ७ ॥
मौन, सदा एकांत-स्थिति, साधु-समाधि-योग, [14]सु-विरक्ती ॥
सक्ति न लोक-समाजीं; लागे पौरांसि पार्थ-यति-भक्ती ॥ ८ ॥
रामासहि कळलें कीं योगी मोठा असे म्हणे पाहूं ॥
आहों ब्रह्मण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं ॥ ९ ॥
तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्व-गेहास ॥
पूजुनि सु-श्रद्धेनें जेववितां माधवास ये हास ॥ १० ॥
यति-दर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ ॥
न बळ प्रेक्षी, परि यति-हर्स्ताचा पाहतां[15] गळे कवळ ॥ ११ ॥
कन्या-रत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ॥
घोर-प्रताप परि श्री भीमानुज, कीं [16]अनंत-बळ थोर ॥ १२ ॥
दामोदर[17] दासा दे अनु-मोदन ती हरावया नवरी ॥

---

१ वसुदेव आदिकरून. २ ह्याचा कर्ता अर्जुन. ३ तीर्थांचीं स्नानें करणारा जो मी त्यास. ४ आपल्या सुखाची साक्षात् सिद्धिच. ५ तीन दंड धारण करणारा संन्यासी. ६ अन्वय-ती (सुभद्रा) कीं ही रीति (संन्यासी राहणें) (हीच) गति (परिणाम), अहो नियति सुभद्रा प्राप्त होईल तर बरें; नाहीं तर संन्यासीच राहणें बरें. काय प्रारब्धीं असेल कोण जाणे. ७ फसवावयास. ८ आपलें व दुसऱ्याचें योग्य मार्गास अनुसरून केलेलें हित. ९ कशाचा-कोणता. १० चातुर्मास्यभर. ११ फक्त कृष्णाच्या अंतःकरणासच. १२ त्याची संन्यासाची युक्ति. १३ संपूर्ण. १४ तीव्र वैराग्य. १५ त्याचें कर्म सुभद्रा. १६ अनंत (शेष)-बळराम, त्याचें बळ. बळराम हा शेषावतार होता म्हणून त्यास कवीनें अनंत म्हटलें आहे. १७ कृष्ण.

दादास देव दावी दारक[1]-रीति स्वयें सदैव वरी[2] ॥ १३ ॥
ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी ॥
बळ-वीर-भीति कोपोपशमोपायासि[3] सांगुनी पळवी ॥ १४ ॥
अनुकूळ ब्रह्म[4] तसें तों झालें तन्मनोरथा पर्व[5] ॥
तीर्थ-स्नान कराया पुर-वासी लोक चालले सर्व ॥ १५ ॥
नर-हय-रथ-गज शिबिकारूढ सकळ [6]वृष्णि-दार-जन चाले ॥
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदु-भट; धरा बळें हाले ॥ १६ ॥
दिव्य-रथांत सुभद्रा बैसुनि सेनेंत तेधवां शोभे ॥
[7]यन्मुख-सुधाकरें नर[8]-वर-पार्थाशय-पयोनिधि क्षोभे ॥ १७ ॥
तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं जसा पाटीं ॥
सु-चिर-क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥ १८ ॥
समय-ज्ञ चतुर सेवक, धनु तूण तशांत देति आणोनी ॥
धांवति रक्षक सैनिक कपट[9]-यति-कृतात्यनर्थ जाणोनी ॥ १९ ॥
त्यांतें म्हणे सुभद्रा[10]-मुक्ता-हर वीर अर्जुन मराळें ॥
समरा लक्षहि या परि काक तुम्ही गति[11] विसर्जुनें मराल ॥ २० ॥
धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शश-किशोर, आटोपा ॥
या टोपा कवचाच्या भिमा वल्गां[12] उगेची आटोपा ॥ २१ ॥
ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ ॥
मारिति हाका केवळ, नागविला वनिं जसा वणिक्सार्थ[13] ॥ २२ ॥
सार्थक पार्थ करी, ती कैरविणी[14] तो सुधांशु गौरविता ॥
सविता बिसिनीसि[14] वरी, कीं भेटे तो गुण-ज्ञ ती कविता ॥ २३ ॥
श्रुति सत्क्रिय[15] धर्म-पथा शोभविती दंपती तसे स्व-रथा ॥
अन्योन्य-प्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंद-कथा ॥ २४ ॥

१ लहान मुलाची रीत. २ बाह्यात्कारीं. ३ राग शांत करण्याची युक्ति. ४ परब्रह्मकृष्ण. ५ ज्याप्रमाणें कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूल ( साह्यकारी ) होता, त्याप्रमाणेंच एक पर्वही त्याला अनुकूल झालें. पर्व असल्यामुळें आपला हेतु सिद्धीस न्यावयास त्यास संधि सांपडली, हें तात्पर्य. ६ यादवांच्या स्त्रिया. ७ जिच्या मुखचंद्राच्या योगानें. ८ नरवर ( पुरुषश्रेष्ठ ) असा पार्थ ( अर्जुन ) त्याचा आशय ( मन ) हाच पयोनिधि ( समुद्र ). ९ खोट्या संन्याशानें केलेला मोठा अनर्थ. १० सुभद्रा हीच मुक्ता ( मोती ) तिचें हरण करणारा वीर अर्जुन हाच हंस. ११ थकून. १२ घोड्यांचे लगाम. १३ व्यापारी लोकांचा तांडा. १४ कमलिनी. १५ सत्कर्मानें वागणारा.

झटिति भट-कटक बहु करि कन्या नेली म्हणोनि बोभाट ॥
वाटे बळासि सांगे[1] जो जो त्या दस्युचाचि तो भाट[1] ॥ २५ ॥
प्र-स्फुरदधर-दल[2] प्रभु बलभद्र म्हणे खरोंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटु गांठितसे जो पटांत आंगारे ॥ २६ ॥
कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निज-धर्षण-कर-खळ-दंडोत्सवासि[3] पाहों द्या ॥ २७ ॥
पर्वीं[4] अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ॥
संध्यां-राग-सु-रंजित-शरदभ्राहूनि फार तो शोभे[5] ॥ २८ ॥
कोप-ज्वर-भर-कंपित-काय[6] प्रभु[7] लोचनें करी शोणें ॥
होणें पुढें सु-दुर्घट वारावें त्या महेश्वरा कोणें[8] ॥ २९ ॥
जाय हळूच विनय-नत-काय वृष्णि-राय देव हरी ॥
माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी ॥ ३० ॥
नमनीं प्रकटवि सह-भव[9] सद्गुण शांति-क्षमानुकंपादी ॥
कंपा दीन-सख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य संपादी ॥ ३१ ॥
हांसे बळभद्र म्हणे कृष्णाक्रूरोद्धवा अहो कळलें ॥
घळलें मन, मत्पद[10] भय सोडा, आदानें[11] बंधुचें टळलें ॥ ३२ ॥
जा जा उठा मुलीला पाहूं वाहूं[12] वरा घरा आणा ॥
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्यीं[13] आणा ॥ ३३ ॥
अथवा कशास शासन-भय धरुनि मनीं पळेल तो दूर ॥
शूर ख्यात पळेना नेऊं द्या पारिबर्ह[14] अक्रूर ॥ ३४ ॥
धाडा भूषा वसनें दासी-दासाश्व-हस्ति-रथ-रत्नें ॥

१ जो जो बळासी ( बळरामास ) (हें वर्तमान) सांगे (तो तो) त्या दस्यूचा( चोराचा-अर्जुनाचा ) भाटच (स्तुतिपाठकच) वाटे. प्रत्येक मनुष्य अर्जुनाच्याच पराक्रमाचें वर्णन करूं लागला; हा भाव. २ रागानें कांपत आहे अधरोष्ठ ज्याचा. ३ आपलें बलात्कारानें हरण करणाऱ्या दुष्टाला जो दंड हाच उत्साह, त्यास. ४ अमावास्या व पूर्णिमा ह्या दिवशीं. ५ सायंकालच्या तांबडेपणानें रंगविलेल्या शरत्कालच्या मेघांपेक्षां अधिक शोभे, म्हणजे रागानें फार लाल झाला. ६ अत्यंत कोपानें ज्याचें शरीर कांपत आहे असा. ७ बळराम. ८ अन्वय-(त्याच्या) पुढें होणें (देखील) सुदुर्घट (मग) त्या महेश्वरा कोणें वारावें ?-त्या वेळीं बळरामाच्यापुढें जाणें देखील कठीण; मग त्यांचें निवारण करण्यास कोण समर्थ ? ९ जन्मतः असणारे-स्वाभाविक. १० मत्पद सोडा व भय सोडा. ११ मोठें मन, १२ अर्पण करूं. १३ मत्+अंघ्रि-माझे पाय त्यांच्या. १४ लवाजमा.

झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महा-यत्नें ॥ ३५ ॥
हें रसिक-कर्ण-तर्णक-शत तर्पायासि काम-धेनु कथा ॥
करिती प्रभु-वर अनुचर-पर-सुख-कर अनुसरोनि लोक-पथा ॥ ३६॥

## वनपर्वांतील नलोपाख्यान ( म० भा० अ० ५३-५७ ).

( मोरोपंत अ० ४. )

सोमवंशांतील वीरसेनाचा मुलगा नळराजा ह्यास स्वयंवरांत विदर्भ देशाच्या भीम नामक राजाची कन्या दमयंती हिनें वरिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

श्री-वीरसेन-सुत नळ निषधेश्वर सु-गुण-मणि-करंडक हो ॥
ब्रह्मण्य-प्रभु दुर्गत दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक हो ॥ १ ॥
तो पुण्य-श्लोक रणीं करितां रिपु-वीर-हानि वासवसा ॥
तत्कीर्ति म्हणे गा श्री-धी हो या योग्य हा निवास वसा ॥ २ ॥
वैदर्भ भीम-राजा होता बहु खिन्न हीनें संतानें ॥
तो भेटोनि सुखविला दमनानें स्वपद-लीन संतानें ॥ ३ ॥
नृप-दास्य-तुष्ट मुनिचें मन त्या मुनिला म्हणे सखे दमना ॥
झाला शुद्ध करावा संतति-सुख-पात्र हा स-खेद-मना ॥ ४ ॥
ब्रह्मर्षि-वरें दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी, गाती गुणौघ संत तिचा ॥ ५ ॥

---

१ भगीरथाला गंगा पृथ्वीवर आणण्यास जसा महाप्रयास पडला, तसाच अर्जुनाला सुभद्रा हरण करण्यास पडला, सबब अर्जुन हा भगीरथाचा सखा झाला, म्ह० त्याच्या बरोबरीचा झाला; असा भाव.

२ अन्वय—प्रभुवर ( बलराम व कृष्ण ) लोकपथा अनुसरोनि रसिककर्ण हें ( च ) तर्णकशत ( वासरांचें शत ) तर्पायासि अनुचर-पर-सुखकर-( भक्तांना अत्यंत सुख देणाऱ्या ) कथा ( लीला ) कामधेनु करिती. ३ निषध देशाचा राजा. ४ सु+गुण+मणि +करंडक –चांगले गुण हेच मणि ( रत्नें ) ह्यांचा करंडा, म्हणजे उत्तम गुण ज्याच्यामध्यें परमेश्वरानें एकत्र सांठविले आहेत असा. ५ दरिद्रीलोकांचें दारिद्र्य हाच समुद्र त्यांतील ( तो तरण्यास ) उत्तम नौकारूप. मोठा दानशूर हें तात्पर्य. ६ शत्रुभूत वीरांचा नाश. ७ संपत्ति व विद्या ह्या दोघींचा बहुधा एकत्र वास नसतो; परंतु नलापाशीं त्या दोन्ही होत्या हें तात्पर्य. ८ विदर्भ-देशचा. ९ संततीनें रहित असल्यामुळें. १० ऋषिविशेष ह्यानें. ११ आपणाला शरण आलेला. १२ राजाच्या सेवेनें संतुष्ट झालेल्या. १३ खेदयुक्त आहे मन ज्याचें असा. १४ ब्रह्मर्षींमध्यें श्रेष्ठ. १५ गुणांचा समुदाय.

ठेवां दम, दांत, दमन, दमयंती हीं अशीं तयां नांवें ॥
ज्या मुनि-वर-प्रसाद-प्र-भवांतें[1] त्रि-भुवनेंहि मानावें ॥ ६ ॥
भीम-नृ-पति दुग्धोदधि दमयंती श्रीच वपु सु-रुचिर[2] तिचें ॥
पाहूनि देह दिवसां-दिवस दिसे दीन जरि सु-रुचि रतिचें ॥ ७ ॥
ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्व-रूप सुंदरसें ॥
श्री-वनमाळेंहि पुढें मिरवील स्व-मद[3] काय कुंद रसें ॥ ८ ॥
श्री-कृष्णें रुक्मिणीला, श्री-कृष्णा रुक्मिणी जशी आतां[4] ॥
दमयंतीस नळ, नळा दमयंती आयकों जनें गातां ॥ ९ ॥
नळ नृ-प म्हणे शिवा ती नवरी हो मन दुजीस न वरी हो ॥
भैमी म्हणे शिवे[5] तो नवरा हो[6], प्रेम नित्य नव राहो ॥ १० ॥
एका समयीं धरिला हंस नळें तो म्हणे कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयंती वधू नृपा करें[7]-गा ॥ ११ ॥
करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती ॥
सत्य प्रिय हित वदती शुद्धात्मे[8] न धरितीच नव रीती ॥ १२ ॥
नळ-मुक्त[9] राजहंसासह हंसाची नभः-पथें[10] आली ॥
आली प्रमद-वनीं[11] तों भैमी[12] ही घेउनि प्रिया आली ॥ १३ ॥
भैमी म्हणे मराळ-ग्रहणेच्छा[13] मन्मनांत आली हो ॥
एकासि तरि धरूं या विखरा मुक्ता वनांत आली हो ॥ १४ ॥
इतरा हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनि दूरवर ॥
भैमी त्यास धरूं ये ज्या दे असु-दान दान-शूर-वर ॥ १५ ॥
एकांतीं तीपाशीं स्तविला निषधेंद्र तो खगानें हो ॥
जाणो राधेला दे खग-भगवद्वेणु[14] तोख गानें हो ॥ १६ ॥
पुण्य-श्लोक निषध-पति नळ खळ-बळ-जल-धि-वाडवानल[15] गे ॥

---

१ मुनिश्रेष्ठाच्या वराच्या प्रसादानें उत्पन्न झालेल्यांस. २ उत्तम आहे कांति ज्याची असें. ३ आपला गर्व. ४ आतां म्हणजे सांप्रत कृष्ण व रुक्मिणी हीं दोघें जशीं एकमेकांस शोभतात असें लोक म्हणतात; तशीं पूर्वी नल व दमयंती हीं परस्परांस अनुरूप होतीं असें लोक गात होते; हें आम्ही ऐकतां असें कवि म्हणतो. ५ हे पार्वति. ६ होवो. ७ हस्तगत. ८ निर्मल अंतःकरणाचे. ९ नळानें सोडलेला. १० आकाशमार्गानें. ११ क्रीडेच्या बागेंत. १२ भीमराजाची मुलगी दमयंती. १३ हंस धरण्याची इच्छा. १४ हंसरूपी-कृष्णाचा वेणु. १५ दुष्टांचें सैन्य हाच समुद्र त्याला वडवाग्नीसारखा.

लोकां महोत्सव-प्र-द तोचि सदा, त्यांसि पाडवा नलगे ॥ १७ ॥
स्मर-बुध-दस्र-रुचिरतर ऐसें म्हणणार जे न ते लटिके ॥
हैयंगवीन जैसें सु-रसिक रसनेपुढें न तेल टिके ॥ १८ ॥
अनुपम अनु-रूप अनर्घ जरि वरिला त्वां नृपात्म-जे न नळ ॥
होइल केवळ ताप-द, कीं जो नर नळ न होय तो अनळ ॥ १९ ॥
नळ-कस्तुरीस टाकुनि कां तूं घेतीस अन्य नर माती ॥
जरि वरिती न हरीप्रति घेती म्हणवूनि धन्य न रमा ती ॥ २० ॥
नर-रत्न तोचि, तूंचि स्त्री-रत्न, उदंड आड-नांवांचीं[11] ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवीं हि आड-नावांचीं ॥ २१ ॥
ती सु-मति म्हणे आर्या त्वां तिकडेही असेंचि कळवावें ॥
साधो हळुहळु मृदु मधु हित मित बोलोनि चित्त वळवावें ॥ २२ ॥
आज्ञा म्हणोनि एथुनि कळवुनि हें प्रेम तेथुनि[13] उडाला ॥ २३ ॥

इकडे ती उपवर झाली आहे असें भीमराजानें समजून तिच्या स्वयंवराची योजना केली, आणि राजेरजवाड्यांस निमंत्रण केलें. त्यानंतरः—

देवर्षि-मुखें[14] परिसुनि शक्र करी धरुनि हरिख गमनातें ॥
त्याच्या विमान येइल काय न येतांचि [15]हरि-खग मनातें ॥ २४ ॥
जों निकट कुंडिनीं[16]च्या आले यम[17] वरुण-भूभृदर्यनळ ॥

१ मोठा आनंद देणारा. २ पाडवा लोकांस एक दिवस मात्र आनंद देतो, परंतु नल सर्वकाळ आनंद देणारा होता; असा भावार्थ. ३ मदन, बुध व अश्विनीकुमार (हे तिघेही रूपाविषयीं प्रसिद्ध आहेत) त्यांपेक्षांही हा सुंदर. ४ ताजें तूप. (तत्तु हैयंगवीनं यद्ध्यो गोदोहोद्भवं घृतम्—काल काढिलेल्या गाईच्या दुधापासून केलेलें तूप.) ५ रुचि घेण्यांत मार्मिक अशा लोकांच्या जिभेपुढें. ६ ज्याला उपमा नाहीं असा. ७ योग्य. ८ निष्पाप. ९ उत्तरार्ध—नळास टाकून तूं जर इतर पुरुष (अनळ) वरशील तर तो तुला संताप देणारा होईल; कारण, जो नळ नव्हे तो अनळ म्हणजे अग्नि होय. १० नररत्न, स्त्रीरत्न अशा नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत; परंतु त्या नांवांच्या अर्थास अनुसरून तुम्हां दोघांवांचून कोणी सांपडावयाचीं नाहींत असा भाव. ११ विहिरी आणि नावा त्यांचीं. १२ मधासारखें गोड. १३ नळाकडून. १४ नारद. १५ विष्णूचा गरुड. उत्तरार्ध—दमयंतीकडे येण्याची इंद्राला इतकी उत्कंठा झाली कीं, अतिवेगवान् जो गरुड तोही त्याला वाहनार्थ आवडेना, मग विमानाची कथा कशाला? १६ कुंडिन हें भीमक–राजाच्या राजधानीचें नांव. १७ (यम+वरुण+भूभृदरि+अनळ) = यम, वरुण, (पर्वतांचा शत्रु) इंद्र आणि अग्नि.

तों तोहि [1]सकळ-सद्गुण-निधि पुण्य-श्लोक [2]वीर-वर्य [3]नळें ॥ २५ ॥
ते सुर म्हणति अहाहा नळचि सकळ-पुरुप-वर्य वीर-मणी ॥
नवरी न वरील कशी याला पाहोनि सु-मति ही रमणी ॥ २६ ॥
आम्हांलाचि न केवळ लावितसे व्यक्त लाज हा रविला ॥
आम्हीं निज-तेजो-मद याचिपुढें सर्व आज हारविला ॥ २७ ॥
भेटोनि त्यासि म्हणती, कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत, [4]वि-मुख न असें,[5] सत्य-व्रता नला जावें ॥ २८ ॥
होतों दूत नळ म्हणे कार्य वदा कोण हो तुम्ही चवघे ॥
ओळख देउनि म्हणती आम्ही भैम्यर्थ पातलों अवघे ॥ २९ ॥
भैमी स्वयें वरू या आम्हां चौघां जणांत [6]अन्य-तमा ॥
हें कार्य,दूत होगा जा गा बा तिजकडेचि धन्य-तमा ॥ ३० ॥
स-स्मित-वदन नळ म्हणे प्रभुजी जो हेतु [7]सुर-वरागमनीं ॥
माझ्याहि तोचि, सर्वांहि मृगांच्या तुल्य [8]सु-रव राग मनीं ॥ ३१ ॥
दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको [9]पावों ॥
[10]कोणावरिही सु-नय न स्वातिक्रम आठवून कोपावा ॥ ३२ ॥
शक्र म्हणे वदलासि प्रथम तसें वचन मग असें वदसी ॥
अ-चळ करींच असावा व्यवहारीं शब्द संगरीं [11]सदसी ॥ ३३ ॥
भू-प म्हणे यों[12] कर्मीं[12] पवनहि होईल मज न सांगाती[13] ॥
अंतः-पुर-प्रवेशीं जी प्रभुजी साधु युक्ति सांगा ती ॥ ३४ ॥
शक्र म्हणे जा गा तूं चिंता आधींच करिशि कां गा ती ॥
आम्हांसि हें कठिण जरि, तरि सु-ज्ञ प्रभु म्हणोनि कां गाती ? ॥ ३५ ॥
शक्र-वरें नळ गेला शिरला अंतः-पुरीं सुखें सुर-सा ॥

---

१ साऱ्या सद्गुणांचा ठेवा. २ वीरांमध्यें श्रेष्ठ. ३ हा 'आला' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ४ प्रतिकूल, पराङ्मुख. ५ होऊं नको. ६ कोणालातरी एकाला. ७ देवश्रेष्ठांच्या आगमनांत. ८ मधुरध्वनीविषयीं आवड. ९ कृपा करा. १० ( सुनय स्वातिक्रम आठवून कोणावरिही न कोपावा, असा अन्वय.) तात्पर्य—तुम्ही व मी एकच कार्याकरितां आलों आहों; म्हणून त्याच कामासाठीं तुम्ही मला तिकडे दूत करून पाठवितां हें उचित नाहीं; परंतु तसें न कराल तर कोणाच्याही हातून नीतीचें उल्लंघन होणार नाहीं. ११ (सत्+असी)=उत्तम खड्ग. उत्तरार्ध—व्यवहारीं शब्द अचल असावा; व संगरीं करींच सदसी अचळ असावा, असा अन्वय. १२ ह्या ( अंतःपुरप्रवेशरूप) कार्यांत वायुही मजबरोबर यावयास भिईल म्हणजे वारा देखील जेथें शिरूं शकत नाहीं. १३ सहाय; सोबती.

भैमीच्या हा, याच्या ती सेवी रूप-संपदा सुरसा ॥ ३६ ॥
भैमी हर्पे त्याच्या[1] विधुच्या तशि कुमुदिनी न आगमनीं ॥
सत्कारूनि म्हणे जी यावें मद्वापणें न आग[2] मनीं ॥ ३७ ॥
सुंदर-वर कोण तुम्ही गुरुच्या[3] वाटो न हें[4] परागं[5] मना ॥
कीं जें जें अंतःपुर तें तें हि विषय[6] नव्हे परागमना[7] ॥ ३८ ॥
आलां कसे अ-वारित,[8] कार्यार्थ प्रगट आयकों दावा[9] ॥
वाटे कर्णी तुमचा वाङ्मय[10] सौवर्ण[11] काय कोंदावा ॥ ३९ ॥
वोहों लागे गुरु-घन-रस-पूरित वरिसेन-भू-पनळ[12] ॥
सुंदरि मी पाशि-पितृ-प-पावक-पुरुहूत-दूत[13] भूप नळ ॥ ४० ॥
सु-मुखि प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाळ ते चवघे ॥
अवघे उणेचि रस; तूं दिव्य रसाचीच सर्वदा चव घे ॥ ४१ ॥
सुज्ञे[14] तुवां वरावा आम्हां चवघां जणांत अन्यतम ॥
धन्य-तम-त्व तुला यो[15] न शिवो पळ दयित-विरह-जन्य तम[16] ॥ ४२ ॥
हांसोनि म्हणे भैमी प्रणति-प्रिय देव गुरु असें म्हणती ॥
त्यांहीं क्षमा करावी, स्वीकारावी यशोर्थ भत्प्रणती ॥ ४३ ॥
वरिले हेचि चरण म्यां, त्यजितां ज्वलनांत काय होमीन ॥
यज्जीवन जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन ॥ ४४ ॥
नळ नृप म्हणे सु-बुद्धे या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटि-गुणें ते आग्रह कांहीं धरूं नको, पावें ॥ ४५ ॥
मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें ॥
स्वःपाणि ग्रहणें मी देवांच्या बहु शिणेन कोपानें ॥ ४६ ॥

---

१ नलाच्या. ह्याचा संबंध आगमनाकडे. २ अपराध. मी जें पुढें बोलतें त्याची माफी असावी हें तात्पर्य. ३ पित्याच्या. ४ तुमचें अंतःपुरांत येणें. ५ मोठा अपराध. ६ योग्य; पात्र ७ परक्याच्या येण्याला. ८ कोणीं अटकाव न केलेले असे. ९ (कार्यार्थ प्रगट दावा, आयकों)-कोणत्या कामाकरितां आपण आलां हें स्पष्ठ सांगा, तें मला ऐकूं द्या. १० वाणीरूप. ११ सोन्याचा; पक्षीं, उत्तम (अकारादि) वर्णांनीं युक्त. १२ मोठा आणि पाण्यानें गच्च भरलेला; हें पनळाचें विशेषण. तात्पर्य कीं, गंभीर व अत्यंत रसाल असें भाषण करण्यास नलानें आरंभ केला. १३ वरुण, यम, अग्नि व इंद्र ह्यांचा दूत. १४ अतिशय कृतार्थंना. १५ येवो. १६ पतीच्या वियोगापासून उत्पन्न होणारें दुःख. तात्पर्य तूं मनुष्यास वरिलें तर तुला पतिवियोगाचें दुःख सोसावें लागेल त्याकरितां आम्हां देवांपैकी एकास वर. १७ ज्याचें वांचण्याचें साधन.

विदुषी[1] म्हणे म्हणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण ती ॥
प्रणति प्रभूंसि करिती अनुकंप्या मी स्वयं-वरा म्हणती ॥ ४७ ॥
सत्संमत स्वयं-वर-विधिनें वरितां तुम्ही न अपराधी ॥
काय करूं त्यजुनि तुम्हां माझी पळ अनु-सरे न अपरा धी ॥ ४८ ॥
होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नैल-गामी ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं ॥ ४९ ॥
होय अ-कृत-कार्यहि नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्येंहि सुधा-रसें निवे दून ॥ ५० ॥
रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
जाणो चकोर ते ती मूर्त-ज्योत्स्नाचि ताप-दमयंती ॥ ५१ ॥
साहे न परोत्कर्षा ज्याची मति सच्छळीं सदानलसा ॥
बैसे तिघांजणांसह हरिहि अधिष्ठूनि त्या सदा[10] नलसा ॥ ५२ ॥
रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम[11] जे ॥
भैमी देव-कृत-च्छळ ऐसें चित्तांत तेधवां समजे ॥ ५३ ॥
पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव तीस ॥
बुद्धि[13] म्हणे कां भीसी गुरु-चरणीं त्यजुनि खेद लवतीस ॥ ५४ ॥
कर जोडूनि म्हणे ती नळ भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो ॥ ५५ ॥
नळ पति इतर पुरुष पितृ-बंधु जरि मनांत मानिले असती ॥
तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी अ-सती ॥ ५६ ॥
तीचा बलवान् निश्चय सुरें-धृत नळ-रूप घे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्त्व-गुण च्छळीं हिरा ऊनीं ॥ ५७ ॥

---

१ शाहणी. २ स्वतः पति पाहून त्यास वरणारी. ३ दुसऱ्याकडे. ४ नळाकडे जाणारा. ५ केलें नाहीं कार्य ज्याणें. ६ दुःखित. ७ शमविणारी. ८ साधूचा छळ करण्याविषयीं. ९ ( सदा+अनलसा )=सर्वदा आलस्यरहित. १० सभेला ( सदस्=सभा ). ११ पति जो नळ त्यासारखे. १२ लेशमात्र. १३ नम्र होत आहेस. म्हणजे गुरुचरणीं (श्रेष्ठ इंद्रादिदेव त्यांच्या चरणीं) खेद त्यजुनि (जर) लवतीस म्हणजे शरण जाण्यास सिद्ध आहेस (तर) तूं कां भीसी-भितेस. १४ देवांनीं घेतलेलें. १५ हिरा उन्हांत जसा (जास्त) तेज प्रकट करितो तसा शुद्ध जो सत्त्वगुण तो (त्याचा छल केला असतां) जास्त सामर्थ्य प्रकट करितो.

शुद्ध सर्वांग कुश नलद परि उप-भोगोचितत्व नलदासी ॥
ऐसें मनांत आणुनि दमयंती सु-मति होय नल-दासी ॥ ५८ ॥
पति-रूप सोडवुनि ती लोकेशांचा प्रसाद साधूनी ॥
घाली नळासि माळा स्तविलीं प्रेम-प्रसन्न साधूनीं ॥ ५९ ॥
नल तीस म्हणे कुल-जे त्वां जरि देवां-समक्ष मज वरिलें ॥
जों सासु तों तुझा मी होतांहि प्रेम ऊन मजवरिलें ॥ ६० ॥
झाला विवाह गेला स्व-पुरा नळ मग तिशीं सदा रमला ॥
भूमि म्हणे ताराया अव-तरला विष्णु हा सँ-दार मला ॥ ६१ ॥

---

## वनपर्वांतील जयद्रथ-कृत द्रौपदी-हरण.

( म० भा० अ० २६४—२७२. मोरोपंत अ० ९ ).

धर्मादि पांडव काम्यकवनांत असतां एके दिवशीं मृगया करण्याकरितां सर्व वनांत गेले होते. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. त्याच दिवशीं जयद्रथ ह्या नांवाचा राजा विवाह करण्याच्या उद्देशानें नवरी पाहाण्याकरितां सैन्यासह चालला असतां त्या आश्रमाजवळ उतरला होता. तेथें द्रौपदी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो तिच्या सौंदर्यानें मोहित झाला, आणि तिला आपल्या रथांत घालून घेऊन चालला. पुढें लागलेंच पांडवांनीं त्यास गांठून त्याचा पराभव करून द्रौपदीस परत आणिलें. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

रार्या धृतराष्ट्राचा प्रिय जामाता विवाह-काम वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळ-भरें कांपवीत ती अवनी ॥ १ ॥
मृगयार्थ पांडु-नंदन गेले असतां निजाश्रम-द्वारीं- ॥
होती उभी द्रुपद-जा, जैसी शंपा[12] [13]नवांबु-भृद्वारीं ॥ २ ॥

---

१ ( सर्व+अंग )-यज्ञाचे अंगभूत. २ वाळा. ३ उपभोगाला योग्य असणें. तात्पर्य कीं जसे देव पवित्र तसा नलही पवित्र, ते जसे प्रेमार्ह तसा हाही प्रेमार्ह; पण ते गुरु म्हणून प्रेमार्ह, व हा पति म्हणून प्रेमार्ह असें समजून तिनें नलालाच वरिलें. ४ इंद्रादि लोकपालांचा. ५ ज्यापक्षीं. ६ ( स+असु )—जिवंत. ७ स्त्रीसहित. ८ जनमेजया. ९ धृतराष्ट्राची दुःशला नांवाची मुलगी जयद्रथास (सिंधुदेशाच्या राजास) दिली होती. १० लग्न करण्याची ज्यास इच्छा आहे असा. ११ आपल्या सैन्याच्या भारानें. १२ वीज. १३ ( नव-अंबु-भृत्-वारी ) नव्या मेघाच्या पाण्यांत.

तीतें पाहुनि झाला तो रावणसाचि पात्र अ-न्याया ॥
मित्रासि म्हणे चित्ता हेचि बहु-मता नकोचि अन्या या[1] ॥ ३ ॥
जा कोटिका सख्या तूं पूस तिचें वृत्त, होय मत्कर[2]-गा- ॥
ऐसें आधीं चतुरा सामें[3] निज-कार्य सिद्धिमंत् कर गा[4] ॥ ४ ॥
सांगुनि निज वृत्त तिचें वृत्त पुसे तीस कोटिक[5] वि-हितसें ॥
स्वल्पांत तीहि सांगे बोलों शकती न कोटि-कविहि तसें ॥ ५ ॥

नंतर कोटिकानें सांगितल्यावरून जयद्रथास समजलें कीं, द्रौपदी ही आपली बहीण आहे; तरी तो तिला, तूं मला वर, असें म्हणून आणखी बोलतो:—

राज्य-च्युत-संगें[6] श्रम-पात्र करिसि दिव्य देह कां गे हें ॥
श्रीमद्देह मिळाल्या सेवावीं निर्धनेंचि कां गेहें ॥ ६ ॥
त्वां फेडिलेंचि त्यांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता, देइन मन[7] तुज, गानासि जेविं दे हरिण ॥ ७ ॥
कृष्णा म्हणे कु-बुद्धे खद्योतीं[8] कीटकाधमीं मलिनीं ॥
द्यु-मणि-पति सोडुनि प्रिय-भव धरील काय रे नलिनी ॥ ८ ॥
स्पर्शेंचि मृति-प्र-द हा वीर-परिग्रह[9] महाहिचा मणि[10] कीं ॥
अंडें-घटीं[11] द्यु-मणि-द्युति योग्या नांदावयास कीं मणिकीं ॥ ९ ॥
त्यजितिल भट तुज समयीं त्यजिति[12] हरि जसे नगासि नगें-दाहें[13] ॥
भीम-प्रिया प्रिय-सखी[14] लवहि न साहेल लंघनें[15] गदा हें ॥ १० ॥
धांवोनि बळात्कारें हां हां म्हणतांहि तो शिवे कपिसा[16] ॥ ११ ॥
पावे व्यसन अ-नाथा जाणों वि-जनांत तापसी ते, तें ॥
खळ दे तिला, जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें ॥ १२ ॥
कृष्णेनें भावि-नरक-पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥
म्हणउनि कृष्ट[17]-निजोत्तर-पट आखुंडितांचि दुष्ट पडला हो ॥ १३ ॥

१ ह्या मला. २ माझ्या हस्तगत. ३ सामोपचारानें. ४ घडून येईल असें. ५ पुसण्याला योग्य. ६ राज्यभ्रष्ठ (पांडव) ह्यांच्या संगतीनें. ७ तुझ्या आज्ञेंत राहीन. ८ काजव्याविषयीं हा आपला आवडता पति आहे अशी बुद्धि. ९ ही (मी) वीरपत्नी. १० मोठ्या विषारी सर्पाचा मणिच केवळ. ११ ब्रह्मांडोदरांत. १२ सिंह. १३ वणव्यानें पर्वत पेटला असतां. १४ माझी प्रियसखी. १५ मजशीं दुर्वृत्तपणानें वागणें. १६ माकडासारखा १७ (जयद्रथानें) ओढलेलें आपल्या अंगावरील वस्त्र (द्रौपदीनें) जोरानें ओढतांच.

धौम्यासि म्हणे धांवा मजला हें[1] मूर्त-पातक विटाळी ॥
रक्षा मज कीर्तिसही, कीं स्वें-[2]पर-व्यसन-पात कवि टाळी ॥ १५ ॥
पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उगारे[3] ॥
तों धांउनि धौम्य म्हणे न उठ धराया सती-वर उगा रे ॥ १६ ॥
ती नमुनि म्हणे मुनिला न वदावें व्यर्थ, दुष्ट हा निपट ॥
ओढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि पट ॥ १७ ॥
भवदाज्ञेनें बैसो हे[4] दुष्ट-रथीं वृकोदर-गदासी[5] ॥
न हरि-प्रसाद-कविची[6] आपन्ना [7]खळ-वृकोदर-ग दासी ॥ १८ ॥
बसतां स्व-रथीं हर्षे तो, जेविं दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासि ती, कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला[8] भें ॥ १९ ॥
ती बहु त्यासि दटावी कार्पासा काय दापिना कीला[8] ॥
काय बधेल पराला त्यजुनि सती [9]काय-दा पिनाकीला[10] ॥ २० ॥
जरि [11]तूळ-राशि-मध्य-स्व-बिळीं नेईल आखु वार्तातें ॥
तरि वाति आखुतें बा सहसा भक्षील आखु वा तीतें ? ॥ २१ ॥
रे तत्काळचि [11]साध्वी-धर्षण-कर जरि महा-तपा मरतो ॥
धौम्य मुनि असें सांगे हित, परि जोडी न हात पामर तो ॥ २२ ॥
कृष्णाहि म्हणे काय न कापिल गिळितां वृकानना शस्त्री ॥
वधि दश-मुखा मग करिल एक-मुखाचाहि कां न नाश स्त्री ॥ २३ ॥
अप-शकुन-ज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला ॥
जो मृगयेंत न चित्तें त्यजुनि दया राम नाम-जप रतला ॥ २४ ॥
तों मार्गीं भृत्याची भार्या [12]धात्रेयिकाचि आढळली ॥

---

१ जयद्रथ हेंच मूर्तिमंत पातक. २ आपलें व दुसऱ्याचें संकटांत पडणें शहाणा टाळतो. ३ उठून धरावयास धांवला. ४ ही (मी द्रौपदी). ५ गदेसारखी. ६ शुक्राचार्याची. ७ खळ+वृक+उदर+ग (दुष्ट–जयद्रथरूप) लांडग्याच्या पोटांत गेलेली; (अन्वय–हरिप्रसादकविची खळवृकोदरग दासी आपन्ना न; कृष्णाचा प्रसाद हाच कवि (शुक्राचार्य) त्याची दुष्ट लांडग्याच्या (जयद्रथरूपी वृकाच्या) उदरांत (रथांत) गेलेली अशी मी दासी दुःखित होणार नाहीं. संदर्भाकरितां पृ. २६५ आर्या १६, कचोपाख्यान पहा.) ८ अग्नीची ज्वाला. ९ आपलें अर्धांग देणाऱ्या महादेवास. १० (हें धौम्याचें भाषण) कापसाच्या ढिगामधील आपल्या बिळांत. ११ पतिव्रतेची अब्रू घेणारा जरी मोठा तपस्वी असला तरी तो मरतो. १२ या नांवाची.

धांवे पडेहि अ-सकृन्नग-शिखराहुनि जशी शिळा ढळली ॥ २५ ॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त करायासि पांडु-योध-मनीं ॥
[1]सरला[2] सु-वंश-जा ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी ॥ २६ ॥
रिपुला गांठाया ते पांडव देती भरों न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी, जाणों न पळहि साधूपुढें अघ टिके तें ॥ २७ ॥
गांठिति रिपु-कटकातें हरिणाच्या सिंह जेविं कळपातें ॥
रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय जें[3] विकळ पातें[4] ॥ २८ ॥
स्व-रथावरूनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि [5]नाक-द न- ॥
वरिलें पलायन खळें, कीं न पहावेंचि लोचना कदन ॥ २९ ॥
धर्म स्व-रथीं स्त्रीतें मुनितें घेउनि म्हणे पुरोध्यातें ॥
[6]व्हां शांत, असेंचि प्रिय राज्य-श्री-मोचनें पुरो ध्या तें ॥ ३० ॥
अर्जुन भीमासि म्हणे न करावें व्यर्थ भीत-भट-कदन ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन ॥ ३१ ॥
भीम म्हणे स-पुरोहित राया तूं आश्रमांत जायेतें- ॥
निववीं, तेंचि करावें तेणें जें स्वच्छ कर्म जा[7] येतें ॥ ३२ ॥
जा सहदेवा नकुळा तूंही जा या तिघांसि सांभाळा ॥
लावावा गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३३ ॥
येतों आतांचि नको साधाया शत्रु-वध मला उशिर ॥
[8]कृष्ण असो, जा आर्या[9], त्वचरणा तो न अधम लाउ[10] शिर ॥ ३४ ॥
धर्म म्हणे रे बा त्या निज भगिनीच्या[11] न उग्र हो तिलकीं ॥
नित्य [12]सुता-सौभाग्य-क्षय-शोकें पितर[13] साश्रु होतिल कीं ॥ ३५ ॥
कृष्णा म्हणे अहो जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें ॥

१ सरळ, पक्षीं, निष्कपट. २ चांगल्या वेळूची केलेली, पक्षीं, चांगल्या कुळांत झालेली. ३ जें कटक. ४ पडण्यानें. ५ स्वर्ग देणारें. (पलायनाचें विशेषण). ६ शांत व्हा, राज्यश्रीमोचनें (आपलें राज्य सोडविल्याच्या योगानें) असेंचि प्रिय (इष्ट) पुरो (मिळो) तें ध्या (असें चिंता). ७ ज्याला जें कर्म उत्तम येतें तें, त्यानें करावें. ८ अर्जुनमात्र मजबरोबर असूं द्या. ९ हे धर्मा. १० तो अधम (जयद्रथ) तुला शरण न येवो; तसें झाल्यानें त्याची तुला दया येईल, हा भाव. ११ आपल्या बहिणीच्या (दुःशलेच्या) तिलकाविषयीं म्हणजे कुंकवाविषयीं कठोर होऊं नको, म्हणजे जयद्रथास मारून तिला वैधव्य देऊं नको. १२ कन्येच्या वैधव्याच्या दुःखानें. १३ गांधारी व धृतराष्ट्र.

मारावेंचि नय-ज्ञें आर्ते स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ ३६ ॥
कोश-मितांतर[1] असतां बीभत्सु[2] म्हणे शरांस कळवा जी- ॥
आलों असें अरिस[3] तो दूर न जावा वधा स-कळ वाजी ॥ ३७ ॥
अर्जुन-नामांकित-शर-हत हय पाहून फार तो भ्याला ॥
बहु पाप-जीवितहि[4] त्या प्रिय; जैसें पाप-वित्त लोभ्याला ॥ ३८ ॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महा-बळ पळांत आटोपी ॥
ज्याचें चित्त म्हणे स्व-क्रोधा-और्वा[5] खलाब्धि आटो पी ॥ ३९ ॥
अर्जुन म्हणे उभा रे सिंह-स्व त्यजुनियां न कुतरा हो ॥
उतरा[6] हो, क्षण पाहों, जा यम-भट हो तळीं न उतरा हो ॥ ४० ॥
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन, परत रे ॥
अभि-मुख मरोनि जरि मळ पळतां न [7]महा-बलायन पर तरे ॥ ४१ ॥
भीम रथावरुनि उडी टाकुनि धांवुनि धरी तया अरितें ॥
वाटे प्रभुचें भीमाकृति[8] खल-बल-दलन-लब्ध-यश अरि तें ॥ ४२ ॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु[9] निघे ॥
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळांसि ओतुनि घे ॥ ४३ ॥
बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण-दोष-फलानुभव रोकडा लाहो ॥ ४४ ॥
वि-कळ जयद्रथ होतां वारी धर्मानुजा गुडाकेश[10] ॥
कीं [11]तत्सत्सेव्य-गुणा कोप[12] न दूषू जसा गुडा केश ॥ ४५ ॥
भीम म्हणे गुरु-दुःख-द तो[13] स्त्री-जितचि[14] हा दया-जित कीं ॥

---

१ कोसभर अंतर. २ अर्जुन. ३ जयद्रथास. ४ दुराचारामध्यें घालविलेलें आयुष्य. ५ हे क्रोधरूप वडवानला, हा खल ( जयद्रथ ) हाच समुद्र पी, हा आटू दे. ६ उत्तरार्ध-(अर्जुन) उतरा हो (असें यमभटांस म्हणून जयद्रथास मारावयास तयार झाला; परंतु युद्धांत मारून उत्तम गतीस जाण्याची त्याची इच्छा आहे किंवा नाहीं हें पहावें म्हणून तो पुनः त्यांस म्हणतो ) क्षण पाहों--क्षणभर वाट पाहूं या इ०. ७ पर ( शत्रु ) जरि महाबलायन ( महाबलिष्ठ ) (तरी) पळ पळतां न तरे, अभिमुख मरोनि तरे. ८ भीमाचें स्वरूप घेणारें, दुष्टांच्या सैन्याच्या नाशापासून मिळविली आहे कीर्ति ज्यानें असें प्रभूचें ( विष्णूचें ) तें अरि ( चक्र--सुदर्शन ) च वाटे. ९ घोका. १० अर्जुन. ११ त्याच्या ( धर्माच्या ) सज्जनांनीं सेव्य अशा ( दयारूप ) गुणास. १२ ( तुझा ) राग. १३ तो दशरथ, बायको ( कैकेयी ) म्हणेल तसें वागणारा.

चालों न देचि कर्में मी करितों तीं हितोदया जितकीं ॥ ४६ ॥
हा धर्म[1] दया-जित तुज योग्य सखा स्त्री-जिता दश-रथा[1] रे ॥
शर सह्य पार[2] जातां हृदयींच जनापवाद-शर थारे ॥ ४७ ॥
वत्सा जैसा तो गुरु[3] होतोसि तसाचि तूंहि कां पार्थे ॥
या पापातें पाहुनि सन्नयनें न नरकेंहि कांपावें ॥ ४८ ॥
देऊं दे प्राणांत प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खहि सुहृत् वसावा स्वर्गीं चिरकाळ कीं महा-नरकीं ॥ ४९ ॥
वध-सम विडंबन असें समर्थांच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदु-शरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५० ॥
मी पांडव-दास असें स्व-मुखें सर्वत्र बोलशील तरी ॥
देईन जीवित तुला तारी विपदाब्धिमाजि शील-तरी ॥ ५१ ॥
वंदुनि म्हणे जयद्रथ ऐसेंच म्हणेन मी सदा साचें ॥
मारूं नको वुक्यांनीं रक्षावें जीवित स्व-दासाचें ॥ ५२ ॥
ज्यापासुनी धरावी प्र-बळतराराातिच्याहि[4] भी मानें ॥
बांधुनि केतु-स्तंभीं खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५३ ॥
प्रेषूनि[5] कोटरेतें प्रेम्यानें जेविं बाण राखविला ॥
तैसाचि निजाङ्गनें जेणें[6] तो त्या प्रभूसि[6] दाखविला[7] ॥ ५४ ॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि म्हणे अगा महा-बाहो ॥
सोड न विलोकवे मज, द्या या असु, मृत्युला न हा बाहो ॥ ५५ ॥
भीम म्हणे देवीला सांगा ती जरि म्हणेल सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा [8]सत्यंचल-कर्ष-पाणि तोडीन ॥ ५६ ॥

१ पहिल्या ओळीचा भाव—वा दशरथा, तुला जसें कैकेयीनें पूर्णपणें जिंकिलें तसें धर्मराजाला दयेनें जिंकिलें आहे; म्ह० तुम्ही दोघे सारखेच आहां. २ दुसऱ्या ओळीचा भाव—बाण शरिरांतून पार निघून जातो (म्हणून) तो सह्य (होय); परंतु लोकनिंदारूप बाण हृदयांत रुतून राहतो (म्हणून तो असह्य). ३ धर्म. ४ ज्या भीमापुढें पराकाष्ठेचा बळकट शत्रुही गर्वहीन होतो; हा भाव (प्रबळतर+अराति). ५ पुत्रप्रेम्यानें कोटरेला पाठवून जसें बाणासुराचें रक्षण केलें; बाणासुर व कृष्ण ह्यांचें युद्ध चाललें असतां शेवटीं आपल्या पुत्राचा नाश होतो असें पाहून बाणासुराची आई कोटरा नग्न होऊन रणांगणांत कृष्णापुढें येऊन उभी राहिली, तेव्हां कृष्णानें खालीं मान घातली, नंतर बाणासुर युद्धांतून परतला, अशी कथा आहे. ६ जेणें (धर्मानें) प्रभूसि (धर्मास). ७ (भीमानें) पुढें उभा केला. ८ (सती+अंचल+कर्ष+पाणी) सतीचा पदर ओढणारा हात.

कां सोडितां असों द्या हा निज दासांत दास राबावा ॥
या काम-हता रक्षा पायांचा ह्याचि आसरा वावा ॥ ५७ ॥
कृष्णा धर्मासि म्हणे देवा सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयतेसह अ-कीर्ति आंगा जी ॥ ५८ ॥
धर्म म्हणे रे साधो जाऊं दे सोड दे मला बा हें- ॥
जातें त्यजुनि भलेपण न विटावें सु-यश तें तया[1] बाहें ॥ ५९ ॥
भीम म्हणे मी पांडव-दास असें तीन वेळ मोठ्यानें ॥
हा खळ म्हणो, भल्याला विनवावें धरुनि पाय खोट्यानें ॥ ६० ॥
धर्म म्हणे गा भीमा तुज जरि आम्ही प्रमाण तरि सोडीं ॥
न वदें निष्ठुर कांहीं अ-भय-वितरणें [2]सदीड्य यश जोडीं ॥ ६१ ॥
भीमें गुरु-मंत्र-वश-व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें- ॥
धर्मासि करि, वरि लवे मात्र शिरें, दुष्ट अंतरीं न मनें ॥ ६२ ॥
नृप त्यासि म्हणे घ्याया भुजगीच्या झोंबतां नर मणीतें ॥
वांचेल, परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें ॥ ६३ ॥
जा, यावरि न करावें पाप असें मागतों, मला दे हें ॥
जें कर्म [3]धर्म-शर्म-द त्यासाचि संपादितो भला देहें ॥ ६४ ॥
खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच कटुचि अमृत-कराकरवींही शर्करेंत घोळविला ॥ ६५ ॥
हर-दर्शनार्थ गंगा-द्वारीं तपतां तया [4]कृपा-पर तो ॥
भेटोनि म्हणे घे वर, कष्टापासोनि मति [5]नृपा परतो ॥ ६६ ॥
युद्धांत पंच-पांडव-परि-भव हो मत्करें असेंच वदे ॥
प्रभु-कर्णी तें बहु कटु वच जाणों गर मुखीं रसें चव दे ॥ ६७ ॥
शंभु म्हणे नारायण-सख नर अर्जुन पुराण ऋषि, तातें- ॥
धनसें [6]पाशुपतहि ज्यां त्यासि दिलें, जेविं अ-मृत तृषितातें ॥ ६८ ॥
मजपासीं तुज द्याया [7]तद्भंगावह असा नसेच वर ॥

१ (अशा कर्मानें आपणापासून जाणाऱ्या) सुयशास वाहें (बोलाव) म्हणजे राख. २ (सत्+ईड्य) साधूंनीं स्तुत्य. ३ पुण्यकारक व सुखकारक. ४ दयाशील शिव. ५ हे जयद्रथा. ६ या नांवाचें अस्त्र. ७ (तत्+भंग+आवह) अर्जुनाचा पराजय करण्यासारखा.

हो मशक-मक्षिका-हर गरुडा नाशी असें नसे चवर ॥ ६९ ॥
यश एकदांचि अर्जुन-रहितहि चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो, बहु हेंही जरि लंघुनि [2]कुळ-गिरींशि पंगु निघे ॥ ७० ॥
झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुज-देव [3]वेदा त्या ॥
प्रभुसहि विटवी मागुनि जें तैशाही न देववे दात्या ॥ ७१ ॥
मागावा [4]कामाद्यरि-परि-भव-वर वर-द-नायका, परि तो ॥
सत्परि-भव-वर मागे, खळ न पराहित निजाहितहि करितो ॥ ७२ ॥
स्व-गृहा जाय जयद्रथ विसरुनियां दुःख तें परि-भवाचें ॥
[5]दासासमंजसत्वें क्षोभे मन शांतही परि [6]भवाचें ॥ ७३ ॥

---

## वनपर्वांतील सावित्रीचें आख्यान.

### ( म० भा० अ० २९३-२९९. मोरोपंत अ० १३ ).

मद्रदेशच्या अश्वपतिराजाची कन्या **सावित्री** ( सावित्रीदेवीचा अवतार ) हिनें शाल्वदेशच्या द्युमत्सेनराजाचा मुलगा **सत्यवान्** यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं **यम** जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असतां, सावित्रीनें त्याच्या मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें; आणि सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, आपल्या बापास शंभर पुत्रांची प्राप्ति, व आपणाला शंभर पुत्रांची प्राप्ति, असे वर त्यापासून संपादिले; आणि शेवटीं सत्यवानाचा प्राणही परत आणिला; हें या आख्यानांत सांगितलें आहे.

**धर्म** [7]पुन्हा त्यासि म्हणे **मार्कंडेया** मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं [8]सत्त्वाढ्या आमुची जशी भार्या ॥ १ ॥

---

१ हें चवराचें विशेषण. २ कुलपर्वतास--हे कुलपर्वत सात आहेत त्यांचीं नांवें–महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष ( गंधमादन ), विंध्य, आणि पारिपुत्र ( पारियात्र ) एथें याचा अर्थ ( मेरूच्या संबंधानें ) लहानसा डोंगर असा इष्ट दिसतो. ३ ज्ञानस्वरूप ( अशा शिवाला ). ४ कामादिक सहा रिपूंचा पराभव व्हावा असा वर. ५ जयद्रथाच्या मूर्खपणामुळें. ६ शंकराचें. ७ रामकथा सांगितल्यानंतर. ८ सत्त्वगुणानें युक्त म्हणजे कसाही प्रसंग गुदरला तरी जी आपलें सद्वर्तन सोडीत नाहीं अशी.

मुनि त्यासि म्हणे होती सावित्री [1]नाम [2]अश्वपति-तनया ॥
तच्चरित श्रवण करीं, ऐकाया योग्य साधु पतित न [3]या ॥ २ ॥
होय प्राप्त [4]विधि-स्त्री-सावित्रीच्या वरेंचि ती [5]राया ॥
यत्कीर्ति जना म्हणती कर देत्यें रे [6]अघाब्धि-तीरा या ॥ ३ ॥
झाली भक्त-सुता ती श्री-सावित्रीच उद्धरायाला ॥
[7]श्री क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला ॥ ४ ॥
अश्वपति म्हणे वत्से चिंता मज हेचि एक परमा गे ॥
झालीस [8]दान-योग्या परि कोणीही तुला न वर मागे ॥ ५ ॥
जा शोधुनि ये वत्से वरुनि मनें मानल्या कुलीनातें ॥
[9]कीं तुजकडेचि आहे शत-पुत्रांचेंहि गे मुली नातें ॥ ६ ॥
‘स्व-वर पहा जा’ ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिव[10] दाया[10] ॥ ७ ॥
अनु-रूप वर विलोकुनि आली तों त्या नृपा [11]परम-हर्षी- ॥
सांगत होता सु-कथा **श्री-नारद** जो कृपा-पर महर्षी ॥ ८ ॥
ती दोघांतें वंदी तों तीस [12]ब्रह्म-काय-भू पाहे ॥
स-स्मित असें पुसे कीं त्वत्तनया होय काय भूपा हे ॥ ९ ॥
कोठें गेली होती श्वशुर-गृहाहूनि काय आणविली ॥
[13]हा ! सचिवांनीं असुनी दानोचितता इची न जाणविली ॥ १० ॥
भू-प म्हणे परिसावें तेंचि तुवां [14]सर्वसाधु-कुल-गीतें ॥
ज्यां पाठविलें होतें स्व-वर पहाया स्वयें स्व-मुलगीतें ॥ ११ ॥
वद वत्से, काय कसें ? वर बरवा पाहिला ? न लाजावें ॥
या गुरुनें धन्य असें म्हणुनि स्व-मुखें तुला मला, जावें ॥ १२ ॥
सांगे ती सावित्री नृप द्युमत्सेन[15] [16]शाल्व-पति आहे ॥

१ नांवानें प्रसिद्ध. २ अश्वपतिनामक राजाची मुलगी. ३ ह्या चरित्रास. ४ ब्रह्मदेवाची बायको. ५ हे राजा धर्मा. ६ पातकसमुद्राच्या तीरास. ७ लक्ष्मी. ८ देण्यास योग्य. ९ शंभर पुत्रांच्या ठिकाणीं तूं आहेस हें तात्पर्य. १० मंत्री आणि उपमाता ह्यांस. ११ ब्रह्मानंदांत निमग्न. १२ ब्रह्मदेवाच्या शरिरापासून म्हणजे मांडीपासून झालेला नारद. १३ खेदसूचक अव्यय. पूर्वार्धाचें ‘नाहीं’ असें उत्तर राजानें दिल्यावर नारदाचें भाषण या उत्तरार्धानें सांगितलें आहे. १४ सर्व साधूंच्या समुदायानें स्तविलेला. १५ द्युमत्सेन नांवाचा. १६ शाल्व-देशाचा राजा.

जरि वृद्ध अंध [1]रिपु-हृत-राज्य [2]वन-स्थहि न काळजी वाहे ॥ १३ ॥
कुल-शील-सत्त्व-गुण-निधि तो [3]पुत्र-कलत्र-मात्र-परिवार ॥
परि वार[4] सर्व सम त्या, कीं मथिला [5]स्वांतर-स्थ [6]अरि-वार ॥ १४ ॥
तो श्वशुर मानला मज, चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जरि लाजविति सख्या, अनु-सरली गौरी हरा न त्या हरिला ॥ १५ ॥
नारद म्हणे नृपा हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान् योजू अन्या, असे उणें न वरा ॥ १६ ॥
भू-प म्हणे सर्व-ज्ञा देवा उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुल-ज-वर जरि तरिहि तुला अ-योग्य कां गमला ॥ १७ ॥
काय इणें न धरावें अ-धन-त्वें [7]भू-प-जन-वरा जीवीं ॥
कां न प्राशावें मधु मधु-पानें [8]कूप-ज-नव-राजीवीं ॥ १८ ॥
मुनि सांगे वर्षांतीं येइल त्या भूप-पुत्रका [9]व्यसु-ता ॥
अन्य वरू, वृतहि कच त्यजुनि वरी भू-प-पुत्र [10]काव्य-सुता ॥ १९ ॥
भू-प म्हणे न वरावा वत्से जरि सु-गुण-सागर लवायु[11] ॥
शीतल मंद सु-गंधहि वद सेवावा कसा गरल-वायु ॥ २० ॥
ती सु-मति म्हणे ताता न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न [12]पतंग-चित्त-वृत्ति क्षणही रत्नीं त्यजूनि दीप [12]रते ॥ २१ ॥
वरिला तो वरिलाचि, स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा, स्तवितील कुलीन कन्यका यातें ॥ २२ ॥
आयुष्य असो किति तरि मज तदितर[13] पुरुष तुज-समचि राया ॥
मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥ २३ ॥
देवर्षि म्हणे त्यासचि दे [14]साध्वी-व्रत-परा सुता राया ॥

१ शत्रूंनीं हरण केलें आहे राज्य ज्याचें असा. २ अरण्यांत राहाणारा. ३ पुत्र आणि कलत्र (स्त्री) एवढाच आहे परिवार ज्याचा. ४ परि (तथापि) त्या (द्युमत्सेनाला) सर्व वार (दिवस) सम. ५ आपल्या अंतःकरणांत राहाणारा. ६ कामक्रोधादिक शत्रूंचा समुदाय. ७ राजश्रेष्ठास. ८ विहिरींत उत्पन्न झालेल्या नव्या कमलांत. ९ (वि+असु+ता) गतप्राणता (मरण). १० शुक्राचार्याची मुलगी (देवयानी). ११ अल्पायुषी. १२ अन्वय-पतंगचित्तवृत्ति दीप त्यजुनि क्षणही रत्नीं न रते. १३ सत्यवानाहून निराळा. १४ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं तत्पर.

शुचि निश्चयाहुनि अधिक अमृत-रस नसे [१]परासु ताराया ॥ २४ ॥
होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ॥
येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्यं-जय तुम्हां सदा-शिव हो ॥ २५ ॥
गेला मुनि जो [२]भगवत्-कीर्ति-महा-काम-धेनुचा दुहिता[२] ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवान्-करीं दुहिता ॥ २६ ॥
झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते[३], तें- ॥
अद्भुत सत्त्व तिचें बा, तितका नव्हताचि ताप सीतेतें ॥ २७ ॥
वेद श्वशुर, श्वश्रु स्मृति, ती [४]स्वाचार-पद्धतीच सती ॥
मुनि म्हणति या नृपाच्या उटजीं सिद्धि [५]स्नुषा-मिषें वसती ॥ २८ ॥
तो सत्यवान् म्हणे हे [६]पितृ-राज-श्री तपोवनांत पती- ॥
हो [७]आपन्मुक्त म्हणुनि बहुधा आपणहि [८]या मिषें तपती[९] ॥ २९ ॥
तत्सद्गुणें प्र-मुदितें झालीं केवळ मनांत न तिघें तीं ॥
सकळें [१०]स-देव-तापस-वृंदेंहि तपोवनांत [११]नति घेती[११] ॥ ३० ॥
ती स्व-मनांत म्हणे तुज तनु रडविल सर्व काळ जीवा हे ॥
सोड इला वेड्या, बुध न कु-संगति धरुनि काळजी वाहे ॥ ३१ ॥
ऐसें चित्तीं बोले, मोजी [१२]उर्वरित दिवस महिने ती ॥
नसतें तसें तरि सुखें वय भोगुनि[१३] तदधिक [१३]श्रमहि नेती ॥ ३२ ॥
उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
[१४]तन्नियमीं [१५]प्रिय-वाक् ती शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥ ३३ ॥
श्वशुर म्हणे त्रि-दिन-व्रत झालें कीं ? वंश धन्य केला गे ॥
कर पारणा, क्षुधा बहु पूर्व-वया-माजि कन्यके लागे ॥ ३४ ॥
ती संकल्पीं आहे सूर्यास्तीं पारणा करायाची ॥

---

१ गेले आहेत ज्याचे प्राण असा. २ भगवंताची कीर्ति हीच कामधेनु तिचें दोहन करणारा ( धार काढणारा ). ३ ती सावित्री. ४ सदाचाराचा क्रम. ५ सुनेच्या रूपानें. ६ बापाची राज्यलक्ष्मी. ७ विपत्तीपासून मोकळा झालेला. ८ त्या सावित्रीच्या रूपानें. ९ तप करिते. १० देवांसहित ऋषींचे समुदाय. ११ त्या पतिव्रतेचा नमस्कार मोठ्या आनंदानें स्वीकारीत. १२ बाकी राहिलेले. १३ अन्वयं—तदधिक श्रमहि भोगुनि वय नेती. १४ सावित्रीच्या नियमांत. १५ मधुर भाषण करणारी हें रंभेचें विशेषण. उत्तरार्धाचा अन्वय-तन्नियमीं (जी) तीव्रता (होती) ती प्रियवाक् रंभा शुकीं (ही) न विलोकी.

ऐसें श्वशुर-श्वश्रू-चरणांतें जोडुनी करा [1]याची ॥ ३५ ॥
फल-मूलार्थ निघे पति त्यासिं म्हणे मजहि सत्तमा [2]न्या हो ॥
वन पाहेन, तुम्हां हे न प्रथम-प्रार्थना अ-मान्या हो ॥ ३६ ॥
[2]चित्राश्व म्हणे दयिते गमली [3]वन-सरणि काय कोमळ ती ॥
श्रमशिल, [4]शिबिका-स्थार्हा [5]दुर्ग-वन-पथांत बायको [6]मळती ॥ ३७ ॥
उप-वास तीं दिसांचा तूं आधींच प्रिये [7]सु-मृदुला गे ॥
त्यावें कसें चरण-युग नवनीता-परिसर्हा सु-मृदु लागे ॥ ३८ ॥
मज सोसेल कशी जी न पहावे स्त्री-व्यथा नरा नीचा[8] ॥
श्रम-दा प्र-मदा-हृदया कथितांहि कवी कथा न रानींच्या ॥ ३९ ॥
येणाराचि तरि साध्वी श्वश्रू-श्वशुरांसि पूस मग ये, तें- ॥
योग्य तुज मजहि, मानिति गुर्वाज्ञाधिक सु-बुद्धि न [9]गयेतें ॥ ४० ॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो [10]स्व-पितृ-पाद साधु निघे ॥ ४१ ॥
ती न स्त्री रक्षाया त्यासि निघे आत्त-मूर्ति [11]जनकाशी ॥
परम शिव जींत[12] नांदे म्हणुनि जिला[13] म्हणति सुज्ञ-जन काशी ॥४२॥
जे पक्षी जे श्वापद-संघ [14]अधिष्ठूनि कानना वसती ॥
त्यांचें [15]तद्वचनामृत-पानार्थ पुसेल कां न नांव सती ॥ ४३ ॥
पात्र भरूनि फळांनीं काष्ठें फोडी वनांत, [16]सत्त्व-रतें- ॥
पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनि-वच मनांत स-त्वर तें ॥ ४४ ॥
जों साध्वी हळुच म्हणे हा नाथा [17]नियत-मान-दा रुचिरा ॥
मूर्ति श्रमत्ये, भ्रमत्ये मति, कीं जी प्रियतमा न दारु चिरा ॥ ४५ ॥
तोंचि म्हणे तो[18] उठल्या [19]करित्या [19]स्मृति-हानि वेदना, लागे- ॥

---

१ बिनंती करी. २ सत्यवान्. ३ वनांतला मार्ग. ४ पालखींत बसलेली. ५ रानांतील खडतर मार्गांत. ६ दुःख पावते. ७ फार नाजूक. ८ निर्दय अशा. ९ गयाक्षेत्रास. १० आपल्या बापाचे पाय. ११ (जनक+आशी) बापाचा आशीर्वाद. १२ ज्या आशीमध्यें. १३ ज्या आशीला. १४ आश्रय करून. १५ त्या सत्यवान चें वचन हेंच अमृत घ्यावें म्हणून. १६ धैर्यशील-हें तत्कलत्रें त्याचें विशेषण. १७ निश्चयेंकरून मान देणाऱ्या म्हणजे माझें वचन कधीं न मोडणाऱ्या. १८ सत्यवान्. १८ स्मरण नाहींसें करणाऱ्या—अशा वेदना.

शूल-शत शिरीं, जाणों सखि अ-क्षम [1]हा निवेदनाला गे ॥ ४६ ॥
तुझिया [2]मृदु-शीतांकीं शिर ठेवुनि वाटतें निजावें गे ॥
स्वत्स्पर्श अ-मृत म्हणवुनि या मत्तापें पळोनि जावें गे ॥ ४७ ॥
मांडी देउनि पतिचें मस्तक हस्त-कमळें सु-धी रंगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निज-निश्चय जो खरा सु-धीर गडी ॥ ४८ ॥
सीता दश-कंठा जसि ताशि सत्त्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों [3]पाश-पाणि-पुरुषा-प्रति पति-पार्श्वीं पति-व्रता पाहे ॥ ४९ ॥
क्षितिवरि पति-शिर उतरुनि स-वि-नय झडकरि उठोनि कर जोडी ॥
नमुनि म्हणे देव तुम्ही, अशि कैंची अन्य-दर्शनीं गोडी ॥ ५० ॥
फळोंचे धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश निवावें बहु हे सेवूनि कान नामातें ॥ ५१ ॥
देव म्हणे सति यम मी; कां आलां? न्यावया तुझ्या पतितें ॥
हें दूत-कार्य कीं जी; जें सेवक-कृत्य वेगळें सति तें ॥ ५२ ॥
हा सत्यवान् सु-कृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्य-त्व स्वामीचें तें न [4]सेवकानीकीं ॥ ५३ ॥
अंगुष्ठमात्र[5] पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी ॥
तें हाय हाय म्हणती बहु सद्गद-कंठ साश्रु नाकर्षी ॥ ५४ ॥
त्यातें बांधुनि घेउनि यम-धर्म प्रभु निघे अवाचीतें[6] ॥
भ्याला सतीस बहुधा जें ब्रह्म-लिखित बरें न वाची तें ॥ ५५ ॥
त्यामागें तीहि निघे धर्म म्हणे भागलीस जा परत ॥
स्नेह-ऋण फेडिलें त्वां करुनि [7]स्व-पति-क्रिया रहा स्मरत ॥ ५६ ॥
साध्वी म्हणे प्रभो पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥
[8]स्व-गुरु-व्रत-प्रसादें मद्गतिसि[9] न रोधितील हेति[10] कडे[10] ॥ ५७ ॥
संत म्हणति सप्त-पदें सह-वासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्रचि[11] न व्यसनीं अन्याखिल-मित्र[11] संकटीं पडतें ॥ ५८ ॥

---

१ मी. २ मृदु आणि शीतल अशा मांडीवर. ३ पाश आहे हातीं ज्याच्या अशा पुरुषाला. ४ ( सेवक+अनीकीं ) चाकरांच्या मंडळींत. ५ आंगठ्या एवढ्या. ६ दक्षिण दिशेस. ७ उत्तरकार्य. ८ माझ्या वडिलांच्या आणि व्रताच्या प्रसादानें. ९ माझ्या गमनाला. १० शस्त्रें व डोंगराचे कडे. ११ साधु ज्याचा मित्र आहे असें कोणीही दुःखांत पडत नाहीं; त्यावांचून इतर सर्व जरी कोणाचे मित्र असले, तरी तें संकटांत पडतें.

तुज संत म्हणति पितृ-पति सम-वर्ती[1] धर्म-राज बापा, हें- ॥
सत्य यश म्हणुनि याही कन्येसि दया करूनि बा पाहें ॥ ५९ ॥
ऐसें सती वदे, तो बोल शशी, देव तोहि सागर-सा- ॥
प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि साग[2] रसा[3] ॥ ६० ॥
धर्म म्हणे साध्वी बहु श्रमलीस स्वाश्रमासि जा मागें ॥
जो मागशील तो वर देतों, घे, इष्ट तें मला मागें ॥ ६१ ॥
देवा व्हावे चक्षुस्तेजस्संपन्न[4] आश्रमा-माजी ॥
मामाजी ऐसें द्या, मति साहेनाचि त्या श्रमा माजी ( ज्ञी ) ॥ ६२ ॥
दिधलें धर्म म्हणे परि जातचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे पुनरपि जा वत्से घे वर दुजाहि मागूनी ॥ ६३ ॥
ती सु-मति म्हणे राज्य-भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु काळ सासु[5] राहो तो ॥ ६४ ॥
होइल जा धर्म म्हणे परि करि अनु-गमन स बहु-मान सती ॥
कीं जी हंसी हंसात्रांचुनि मानील न बहु मानसें[6] ती ॥ ६५ ॥
पुनरपि मार्गीं काढी जें धर्म-रहस्य जेविं नव[7] पुसंती ॥
तें होय वशीकरणचि, कीं भासों दे तयांशि न वपु[8] सती ॥ ६६ ॥
धर्म म्हणे गे बाई करिसी कां व्यर्थ या श्रमास तिजा- ॥
वर घे नकोचि मागों, आलीस सु-दूर, आश्रमा सति जा ॥ ६७ ॥
त्यासि म्हणे सावित्री संपन्न असो पिता [9]सु-तनय-शतें ॥
हा [10]लक्ष्मी-सुत-कवि किति लिहिल सतीचें उमा-सुत[11] न यश तें ॥ ६८ ॥
उडु-पा उडुसें धर्मौदार्या[12] लाजोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सु-यशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥ ६९ ॥

---

१ सर्वांशीं समदृष्टीनें वागणारा. २ पर्वतासहित. ३ पृथ्वी; भूतमात्राला करुणा आली हें चौथ्या चरणाचें तात्पर्य. ४ डोळ्यांच्या ( पाहण्याच्या ) शक्तीनें युक्त. ५ जिवंत. ६ मानससरोवर. ७ नवीन काढलेली पुस्ती. ८ 'तयांशि सती वपु न भासों दे' म्हणजे त्यांचें देहभान नाहींसें करी. ९ उत्तम शंभर पुत्रांनीं. १० लक्ष्मी हें मोरोपंताच्या आईचें नांव. ११ गणपति. १२ यमाच्या औदार्यास ; उत्तरार्ध—सावित्रीच्या अतिशुभ्र यशानें विश्व इतकें भरून गेलें होतें कीं, अभ्रमूचा पति ऐरावत हा अत्यंत शुभ्र असल्यामुळें त्या यशांत बुडून कोठें दिसेनासा झाला, तेव्हां ती रडूं लागली. तात्पर्य, सावित्रीचें यश अगदीं निर्मळ असून त्यान्या त्रैलोक्यांत भरलें होतें. यशाचा वर्ण शुभ्र आहे असें कवि मानितात.

ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा- ॥
सोडीना सोडविल्यावांचुनियां ती सती नवर-देवा ॥ ७० ॥
देव म्हणे[1] तूं स्वच्छा स्व-च्छायाशीच मागतीं सति घे ॥
वर घेउनि जा चवथा देतों मागोनि[2] मागतीस तिघे[2] ॥ ७१ ॥
व्हा सु-प्रसन्न, वत्से तुज हो सुत-शत असें वदा, न्या हो- ॥
सु-यशो-राशि स्वर्गीं लज्जा-प्र-द सुर-न-गा वदान्या हो ॥ ७२ ॥
भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावी मागें म्हणवुनि म्हणे 'तथास्तु' तिला ॥ ७३ ॥
हळुचि म्हणे सावित्री पावेन वरें करूनि संततिला ॥
तुमचा प्रसाद म्हणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ७४ ॥
तरि मत्पति मज द्या कीं तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि [3]सत्य-गुणासक्त-मानस त्यागी[4] ॥ ७५ ॥
रोमांचित धर्म म्हणे बाई गातिल तुझा प्र-भाव सती ॥
पतिशीं [5]अ-विना-भावें वसशिल रविशीं जशी प्रभा वसती[6] ॥ ७६ ॥
राज्य चतुः-शत वत्सर करिल तुझा कांत सोडिला जा गे ॥
हा स्वन्माहिमा जागो सीतेनें जेविं जोडिला जागे ॥ ७७ ॥
तें वृत्त[7] वर्तमान[7] स्वल्पहि न कळे तिच्या वरा पार्शीं[8] ॥
जातां यम सावित्री धांवत आली कलेवरापाशीं ॥ ७८ ॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनियां स्व-पति-शिर ती ॥
जशि चेतना धवांगीं होय इची जीवितांत[9] मति शिरती[9] ॥ ७९ ॥
वन-देवता म्हणति त्या बा गा मूर्च्छोत्थिता[10] चकोरा हो- ॥
स्वस्थ, ज्योत्स्ना कीं हे, द्रुत उठाचि, नमावया नको राहों ॥ ८० ॥

---

१ देव म्हणे तूं स्वच्छा (व) स्वच्छायाशीच (माझ्या सावलीप्रमाणेंच) मागतीं (मागें) (येत आहेस) (म्हणून) (हे) सति, तिघे (तीन) वर मागोनि (हां) चौथा मागतीस (तर) देतों घे, म्हणजे घेऊन जा. २ अन्वय–तिघे मागोनि मागतीस चवथा देतों इत्यादि. ३ सत्याविषयीं तत्पर आहे मन ज्याचें तो. ४ सोडितो. ५ वियोग न होतां. ६ राहाते. ७ झालें काय व होत आहे काय. ८ पाशांत असतां. ९ तिच्या जिवांत जीव आला. १० मूर्च्छा जाऊन सावध झालेला असा.

नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासचि वनीं, ती- ॥
दे त्यासि जसि नृपासि व्यसनीं देती सुखा [1]सचिव-नीती ॥ ८१ ॥
त्यांस म्हणे [2]सु-भगे त्वां मृदु मांडी मांडिली उशी, रमला- ॥
आत्मा निद्रेशीं, रवि मावळला लागला उशीर मला ॥ ८२ ॥
पुरुष श्याम [3]महौजा ओढित होता बळेंचि मजला जो- ॥
तो कोण, पुसेन तया नसतां स्वप्नोत्तमर्णें[4] मज लाजो ॥ ८३ ॥
कथिन उद्यां, झाली बहु रात्रि, बळ असेल तरि उठा राया- ॥
देत्यें हात, चला जी, घेत्यें फळ-भाजना कुठारा या ॥ ८४ ॥
नेत्रें पुसोनि पदरें पतिस म्हणे भेटतील मामाजी ॥
'आई' म्हणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामाजी ॥ ८५ ॥
भेटवित्यें ताताला मातेला, या उठा, असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे कलभाशि सांवरी कदली ॥ ८६ ॥
आला प्रकाश नेत्रीं, अंध-त्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप [5]पुत्र-मोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ८७ ॥
त्याला म्हणती **गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य** तापस हा- ॥
बा गा उगा मुहूर्तोपस्थित[6] दुर्दैव-दत्त[6] ताप सहा[7] ॥ ८८ ॥
सावित्री शुभ-लक्षण गुण-संपन्ना महा-सती बा हे ॥
जी जी साध्वी[8] स्व-धवानुमतें द्वास्था[9] महास[9] ती बाहे[9] ॥ ८९ ॥
वाखाणिति बहु पाहति [10]मुनि-दारहि [11]भासुर-व्रत तिला जे ॥
साध्वीच देवता ही साध्वीला बा सुर-व्रतति लाजे ॥ ९० ॥
शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा ॥
दिसतें कल्याण पुढें, होऊंचि नको अधीन या वेगा ॥ ९१ ॥
ऐसें समजाविति त्या राजाला जों दया-पर महर्षी ॥

१ मंत्र्यांनीं सांगितलेली चांगली मसलत. २ हे सुंदरी प्रिये. ३ मोठा तेजस्वी. ४ (स्वप्न+उत्तमर्ण) स्वप्नांतलाही सावकार. ५ पुत्रशोकानें. ६ क्षणभर प्राप्त झालेलें; दुर्दैवानें दिलेलें दुःख. ७ सहन कर. ८ साध्वी आपल्या नवऱ्याच्या अनुमतानें (वागते). ९ दारांत उभा राहिलेल्या (किंवा जवळ असलेल्या) उत्सवास बोलाविते. उत्तरार्ध—आनंद हा पतिव्रतेच्या नेहमीं दारीं उभा असतो, म्हणजे तिला अति सुलभ असतो, हें तात्पर्य. १० ऋषिपत्नी. ११ उत्कृष्ट आचारयुक्त. १२ कल्पवल्ली.

तों झाले अवलोकुनि सावित्री-सह तया परम हर्षी ॥ ९२ ॥
मुनि म्हणती हा आला नेत्रें उघडुनि पहा स-दारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्र-मुदित यांसह रहा सदा राया ॥ ९३ ॥
दे आलिंगन, अंकीं घे, मस्तक-पद्म हुंग, वाराया- ॥
[1]आत्मात्म-ज-तापातें दे आशी राज-सत्तमा राया ॥ ९४ ॥
पुसतां विलंब-कारण चित्राश्व[2] म्हणे [3]शिरो-व्यथा-शयन ॥
मुनि म्हणति हें नव्हे, वद वत्से, हो तूंचि आमुचें नयन ॥ ९५ ॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अ-शेष [4]साधु-सद नमुनी ॥
तेव्हां झाले अ-तुल प्रीति-क्रीडेशि केलि-सदन[5] मुनी ॥ ९६ ॥
मार्कंडेय म्हणे बहु वर्णावें काय जेविं शिव-सेवा ॥
मज काळापासुनि तशि मुक्त करी त्याशि[6] ती[7] [8]मनु-ज-देवा ॥ ९७ ॥
दुसरे दिवशीं प्रकृति[9] प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
या राज्य करा, सचिवें वधिला हरिली स्व-भूमि ज्या पतितें ॥ ९८ ॥
मुनि म्हणति अनुभवावें स्वस्थ-मनें राज्य-पद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्री-युक्त सदन ताराया ॥ ९९ ॥
सिंहासनीं वसविला सावित्रीच्या व्रतेंचि, हा नियम[10] ॥
वर-सामर्थ्य म्हणा परि गेला होता करूनि हानि यम ॥ १०० ॥
सावित्रीनें केला उभय-कुलोद्धार हा असा राजा[11] ॥
[12]कृष्णाहि अशीच, स्तुति येती न मुखाशि या [13]अ-सारा जा(ज्या)॥ १०१ ॥
राम-घन-मयूर[14] म्हणे निववालचि सु-रसिकांशि केकाहो[15] ॥
शंभुहि[16] म्हणे न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके[17] कां हो ॥ १०२ ॥

१ आपणाला व आपल्या मुलाला झालेलें जें ( वियोग ) दुःख त्यात. २ सत्यवान्. ३ मस्तकव्यथेमुळें निजणें. ४ साधूंचा समुदाय. ५ क्रीडेचें स्थान. ६ सत्यवानाला. ७ सावित्री. ८ हे धर्मराजा. ९ प्रजा. १० हेंच खरें समजावें. ११ हे धर्मराजा. १२ द्रौपदी. १३ निरर्थक. १४ राम हाच मेघ त्याला मोरासारिखा मोरेपंत कवि. १५ मयूरवाणी हो. १६ अन्वय–शंभुहि ( काशिकेला ) म्हणे ( हे ) काशिके मद ( अज्ञान ) ( तुज ) न सेविति, म्हणुनि कां हो झुरसि–अज्ञान जन तुजमध्यें येऊन वास करीत नाहींत, म्हणून तुला खिन्न होण्याचें काय कारण आहे? असें साक्षात् शंभुही काशीला म्हणतो. तस्मात् हे केकाहो अज्ञानजनांनीं तुमचा अनादर केला तरी तुम्हीं खेद करूं नये. जे रसज्ञ आहेत त्यांना तुम्हांपासुन आनंद खचीत होईल. १७ हे वाराणसि.

## विराट-पर्वांतील उत्तर-गोग्रहण.

( म० भा० अ० ३५-५३; मोरोपंत अ० ३-६ ).

**पांडव** अज्ञातवास करण्याकरितां विराटाच्या नगरींत राहिले तेव्हां विराटाचा सेनापति **कीचक** ह्यानें **द्रौपदी**विषयीं दुर्वासना दर्शविल्यामुळें **भीमानें** त्यास ठार मारिलें. हें ऐकून विराटापासून फार त्रास पावलेला **त्रिगर्त**देशाचा राजा **सुशर्मा** ह्यानें **दुर्योधनास** सुचविलें कीं, ही संधि **विराटनगरावर** स्वारी करण्यास बरी आहे. तो विचार दुर्योधनास पटून त्यानें त्या नगराच्या दक्षिणेच्या बाजूस सैन्यासह **सुशर्म्यास** पाठविलें आणि आपण स्वतः मोठें सैन्य घेऊन त्याच्या उत्तरेच्या बाजूस आला. ह्या प्रकरणांत उत्तरेकडील सैन्यानें विराटाच्या गाई हरण केल्या, हा प्रकार वर्णिला आहे, ह्यासाठीं ह्यास **उत्तरगोग्रहण** म्हणतात.

[1]मत्स्य-पुरोत्तर-भागीं प्रातःकाळींच ये सु-योधन हो ॥
[2]ज्यासि जय-प्राप्ति मनीं म्हणती भीष्मादिही सु-योध न हो ॥ १ ॥
सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध-भुज गवळी ॥
षष्टि-सहस्र सु-गोधन तो [3]कुरु-कुळ-चंदन-द्रु-भुज-ग वळी ॥ २ ॥
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥
चित्तीं म्हणे बुडाया [4]कुर्वधमा हरिसि धेनु कां गा या ॥ ३ ॥
तो राज-गृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य तनयातें- ॥
नमुनि म्हणे हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अ-नयातें ॥ ४ ॥
कवची खड्गी धन्वी व्हा, चित्तीं रामचंद्राहि [5]असा ध्या ॥
बैसा रथीं, जय-श्री [6]गो-विप्रावन-परासि न अ-साध्या ॥ ५ ॥
उत्तर म्हणे असें जरि मी एकाकी लहान परि सवतें- ॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥ ६ ॥
कर्णादिकांसि देता[7] समरीं [8]वैराटि-केसरी [9]करि-ता ॥

१ मत्स्यदेशाच्या राजधानीच्या उत्तरेच्या बाजूस. २ ज्यासि ( दुर्योधनास ) जयप्राप्ति (अर्जुनाची गांठ किंवा जय मिळणें) न हो (असें) भीष्मादिही सुयोध मनीं म्हणती, असा अन्वय. ३ कौरवांचें कुळ हाच चंदनवृक्ष त्याजवरचा सर्पच (दुर्योधन). ४कुरुकुलांतील नीचा. ५ कवची, खड्गी व धन्वी असा. ६ गाई आणि ब्राह्मण यांच्या रक्षणाविषयीं जो तत्पर त्यास. ७ देणारा झाला असता. ८ विराटपुत्र हाच सिंह. ९ हत्तीपणा.

[1]जिष्णुपुढें अ-सुर-जनीं कोणी वैरा टिके सरी करिता ॥ ७ ॥
मिळवा कोणीतरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरु-भट-समूह पाहूनि मज जेवि हिमासि [2]सु-दधि-सार थिजो ॥ ८ ॥
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
[3]चित्र-पट-कटकसें शिशु-भाषण येईल काय कामा जी ॥ ९ ॥
तें परिसुनि एकांतीं पार्थ म्हणे देवि कृष्ण-सखि जावें ॥
उत्तर-सारथि होउनि म्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें ॥ १० ॥
कृष्णा म्हणे बहु बरें, व्हा मारुत, हो [4]पलाल खळ-बळ तें ॥
मद्धृदय न अरिसैन्यें तुमच्या दैन्येंचि फार खळबळतें ॥ ११ ॥
त्या उत्तरासि सांगे सारथ्य बृहन्नडा करिल यातें ॥
सूत करुनि विजयानें नेले बहु खांडवीं अरिलयातें ॥ १२ ॥
सारथ्य-गीत-नृत्य-प्राप्तीचा हेतु जिष्णु-सह-वास ॥
पूर्णत्वाचा लागे [5]पशु-पां भ्रमतांहि विष्णुसह वास ॥ १३ ॥
भगिनी-मुखेंचि विनवा तन्मतिला उत्तराचि वळवील ॥
अति-सहवासि-वच मना कतक [6]कलुषिता [7]वना निवळवील ॥ १४ ॥
उत्तर म्हणे कुरु-कटक न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्व-सेनेतें ॥ १५ ॥
माझें सारथ्य करू तुझिया वचनें बृहन्नडा, गमला—॥
हाचि सदुपाय वत्से, लागो अप-कीर्तिचा न डाग मला ॥ १६ ॥
ती धांवत जाय म्हणे गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समर्थी सारथ्य-गुणा नुघडूनि कदर्युचा [8]न डेरा हो ॥ १७ ॥
उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्रीमदुदधिवरि लहरी ॥
[9]धरितां हनु न नु म्हणतां प्रणताचें कां न [9]सु-दधि वरिल हरी ॥ १८ ॥

१इंद्रापुढें. २तूप. ३चित्रपटावरील सैन्याप्रमाणें. ४फेरकसपट. ५कृष्णाच्या सहवासानें गोपाळांस (अज्ञान गुराख्यांस) परमेश्वर जो कृष्ण त्याचे सर्व गुण प्राप्त झाले. ६निवळीचें बी. ७गढूळ पाण्यास. ८ कृपणानें डेऱ्यांत पुरून ठेविलेलें द्रव्य कधींच कोणाच्या उपयोगीं न पडल्यामुळें व्यर्थ होय. तसा तुझा सारथ्यगुण समर्थी प्रकट न होईल तर व्यर्थ होय. असें तात्पर्य. ९प्रेमळ भक्तानें आर्जवानें दिलेलें सुदधि (उत्तम दहीं) हरी नु (नको) न म्हणतां कां न स्वीकारील? तसें युद्धप्रिय अर्जुनास दुर्योधनाबरोबर युद्ध करण्याची प्रार्थना कशी न रुचेल?

वाद्य असो नृत्य असो हो अभि-नय किमपि[1] गीत अथवा हो ॥
जाणोनि कसें म्हणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो ॥ १९ ॥
वैराटि म्हणे नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो ॥
सारथि हो या समयीं एकहि वश कौरवांसि गाय न हो ॥ २० ॥
ऐसें वदे कवच दे त्या [2]श्रित-कुशलावहास ल्यायाला ॥
तद्धारणीं चुके तो, कन्या पाहूनि हांसल्या याला ॥ २१ ॥
स-स्वर बृहन्नडा नृप-सुत-रथ घेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि म्हणे हेरावें म्हणसी [3]कुरु-कटक काय बा हेर ॥ २२ ॥
कुरु-कटकासि पहातां तो उत्तरबाळ फार गडबडला ॥
[4]स्व-पर-बळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ २३ ॥
बोले बृहन्नडे हें कुरु-बळ [5]कल्पांत-सिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयनहि पाहतां बहु भ्रमतें ॥ २४ ॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनचि शिरतां कांख्यावरि घालितां चिरे [6]पट कीं ॥ २५ ॥
पार्थ म्हणे राज-सुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य रण-क्षितिवरीच हा काय ॥ २६ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला [7]सदसी ॥ २७ ॥
[8]निज-वृत्ति-रसीं लोभी हो, साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निज-हित-लोभें धरितो शिशुहि मुखीं एक, अन्य थान करीं ॥ २८ ॥
मरतीच न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेंक विस्या[9] ॥
म्हणती [10]सद्यः-कीर्ति-प्रज्ञा-घ्न-स्पर्श तोंडलें कवि त्या ॥ २९ ॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक-बागुलासि पोर पळे ॥

१ (किं+अपि)=कोणतेंही; हें गीताचें विशेषण. २ (श्रित+कुशल+आवहास) आश्रितांचें कल्याण करणाऱ्या (अर्जुनाला). ३ बा, कुरुकटक हेरावें म्हणसी काय? हेर (पाहा) असा अन्वय. ४ आपलें तसेंच शत्रूचें बळ व अबळ. ५ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ६ वस्त्र. ७ (सत्+असी) चांगली तरवार. ८ क्षत्रियाच्या कर्माची (युद्धाची) आवड धर. ९ बापाला. १० कीर्तिरूप प्रज्ञा (बुद्धि) हिचा तावडतोब नाश करणारा आहे स्पर्श ज्याचा; हें तोंडल्याचें विशेषण.

शत्रु-प्रताप-दाव-ज्वालांनीं तो कुरंग होरपळे ॥ ३० ॥
उत्तर म्हणे नको गे पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोड [1]दिली, दुखवुं नको केवळ [2]पितृ-कर-तळ-स्थ.हा[3] फोड ॥ ३१॥
कुरवाळोनि म्हणे गा राज-सुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुल-त्व म्लान-त्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ ३२ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनुस मी रण हो ॥
मज मेघासि कराया [4]शर-वृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ ३३ ॥
आतां सोडवितों पशु खल-बल पल न लगतांचि पळवीतों ॥
मी विजय असें तुजचि न सकळांही कौरवांसि कळवीतों ॥ ॥ ३४ ॥
धृत-रश्मि कुमार म्हणे दारुक कीं आज मातली लाजो ॥
दंड करावा या कुरु-सेनेला योग्य मातलीला जो ॥ ३५ ॥
काढूनि [5]शंख-वलयें त्याला पुं-भूषणें सितें वस्त्रें ॥
बांधूनि केश माथां [6]प्राङ्मुख होऊनि आठवी अस्त्रें ॥ ३६ ॥
जातां कुरु-कटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर ॥
तो होय जना जैसा कल्पांतीं [7]रुद्र-देव [8]दत्त-दर ॥ ३७ ॥
भ्याला उत्तर त्यातें जिष्णु म्हणे पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अ-धैर्य कां पदरें ॥ ३८ ॥
हांसोनि म्हणे हरि-सख हो [9]गाढासन [10]वि-कंप-धी धीट ॥
न धरीं बा दर[11] हा [12]दर, सादर[13] दे वाजवूं पुन्हां नीट ॥ ३९ ॥
द्रोण म्हणे न दिसे जय कां करितां आननें नत पहा रे ॥

१ तुला हवी ती देणगी देतों. ह्यास आधार—महाभारत विराटपर्व अ० ३८ श्लो० ४३, ४४—शातकुंभस्य शुद्धस्य शतं निष्कान्ददामि ते ॥

मणीनष्टौ च वैदूर्यान्हेमबद्धान्महाप्रभान् ॥ १ ॥
हेमदंडप्रतिच्छन्नं रथं युक्तं च सुव्रतैः ॥
मत्तांश्च दश मातंगान्मुंच मां त्वं बृहन्नले ॥ २ ॥

२ बापाच्या करतळावर असणारा. ३ हा मी ( करतळावरील फोडाप्रमाणें बाप मला जपतो ) हें तात्पर्य. ४ बाणांची वृष्टि पक्षीं, जलवृष्टि. ५ शंखाचीं केलेलीं वलयें ( चुडे ). ६ पूर्वाभिमुख. ७ महादेव. ८ दिलें आहे भय ज्यानें असा. ९ दृढ आहे आसन ज्याचें असा ( हो )—बळकट बैस. १० निर्भय आहे बुद्धि ज्याची असा. ११ भय. १२ शंख. १३ मनापासून.

आला विजय जयाचें[1] श्री-शंभु-तपापुढें न तप हारे ॥ ४० ॥
गांधार[2] म्हणे गुरुजी पण न करुनि पूर्ण हा प्रकटला हो ॥
पुनरपि वन-वास करू गुरु-घातक-पातक[3] प्रकट लाहीं ॥ ४१ ॥
कर्णाद्यासांसि म्हणे तुमचे वि-जयी असोत हात रणीं ॥
[4]शर-पटलाच्छादित हो अर्जुन-शक्र-प्रताप हा तरणी ॥ ४२ ॥
गुरुजींस[5] काय पुसतां चापीं गुण गद्रुचेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि म्हणावें कीं आम्हां धर्म-शास्त्र पढवा हो ॥ ४३ ॥
पढवावें मात्र इहीं भेदावें [6]पर-हृदब्ज कटुक वचें ॥
[7]कीं दूरूनि दिसावे प्रेक्षक-दृष्टीस युद्ध-पटु [7]कवचें ॥ ४४ ॥
प्रार्थुनि पुढें करावे हे यज्ञीं कीं सु-भोजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कशी जी केली [8]केलि-हेतु नाव सरीं ॥ ४५ ॥
खळ-कृत गुरु-निंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सु-कवी ॥
कीं [9]ती [10]श्री-गुरु-भक्ति-प्रेमामर-पादपांकुरा सुकवी ॥ ४६ ॥
त्यासि कृप म्हणे कर्णा सु-ज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें दहांत बोलावें ॥ ४७ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे[11] वचन-यज्ञ ॥
अद्भुत कर्म करूनिहि ना न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ४८ ॥
घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होइल तनुची क्षणांत रांगोळी ॥ ४९ ॥

---

१ जयाचें तप श्रीशंभुतपापुढें न हारे असा अन्वय; त्याची कथा अशी आहे कीं पाशुपतास्त्र मिळवावें म्हणून अर्जुन हिमालयावर शिवप्रसादार्थ उग्र तप करीत असतां त्याच्या बलाची परीक्षा पाहाण्याकरितां शिवानें भिल्लाचें रूप घेतलें आणि एक रानडुकर उत्पन्न केला. तो रानडुकर अर्जुन तप करीत होता तेथून कांहीं अंतरावरून जातांना त्यावर दोघांनीं एकदम बाण सोडून त्याचा प्राण घेतला, तेव्हां तो मीं मारिला, मीं मारिला असें म्हणून दोघेही त्याविषयीं भांडूं लागले आणि हातघाईवर आले. त्या प्रसंगीं अर्जुनानें महान् पराक्रम करून शिवाला जेर केलें; तेणेंकरून शिव प्रसन्न होऊन त्यानें अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें; त्या कथेस लक्षून हें लिहिलें आहे. २ दुर्योधन. ३ गुरुहत्या करणाराचें पातक. ४ बाणांच्या समुदायानें पक्षीं, मेघांनीं झांकलेला. ५ (४३, ४४, व ४५) ह्या आर्यांतील बोलणें कर्णाचें आहे. ६ दुसऱ्याचें हृदयकमळ. ७ अथवा कवच घातल्यामुळें हे गुरु पाहाणाराच्या दृष्टीला युद्धपटु (रणचतुर) असे दिसावे. ८ क्रीडा हाच आहे उद्देश जिचा अशी. ९ गुरुनिंदा. १० श्रीगुरुभक्तीचें प्रेम हाच कल्पवृक्षाचा अंकुर, त्यास. ११ शुष्क—तोंडचा यज्ञ.

कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया, हें[1] शील' नसो असो इतर शील ॥ ५० ॥
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि नव्हे श्वेत-वाह सामान्य ॥ ५१ ॥
द्रौणि म्हणे एकाकी तूंचि क्षम [2]जिष्णु-वारणा सूत[3] ॥
बहुधा बद्ध करीलचि लतेचें [4]जिष्णु-वारणा सूत ॥ ५२ ॥
करिसि वि-कत्थन जिंकुनि नेलें नसताहि गो-धन शिवेतें ॥
सप्रिय शुचि यश कर्णा भलत्या न करूनि शोध न शिवे तें ॥ ५३ ॥
पावोनि सर्व महितें वि-गुणाहि गुरूसि जे कुल-ज नर ते- ॥
सत्कारिति, अलि कमलीं तेविं गुरु-पदीं [5]महा-कुल-जन रते ॥ ५४ ॥
राधेया[6] उद्धत तूं हा दुर्योधनहि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध, शुद्ध तरे ॥ ५५ ॥
सिंहासीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा[7] रे ॥ ५६ ॥
दुर्योधन नमुनि म्हणे गुरुजी मज अरि-करीं न सोपावें ॥
तेजो-जननार्थ[8] असें वदलों, त्वन्मत्सरीं नसो, पावें ॥ ५७ ॥
हांसोनि द्रोण म्हणे आम्हां कोपों न देचि वत्सल-ता ॥
नसतें [9]क्षमा-कवच तरि हृदयीं त्वच्छब्द अशनिवत् सलता ॥ ५८ ॥
भीष्मासि मग म्हणे नृप पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला- ॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला ॥ ५९ ॥
भीष्म म्हणे गांधारे[10] पांडव पंडित खरे न [11]दभ्र मती ॥
न भ्रमले जे प्राकृत तेंचि मनीं धरुनियां मद भ्रमती ॥ ६० ॥
कामी कोपी लोभी जे संसारांत पावती भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हेहि केविं न भ्रमते ॥ ६१ ॥
[12]शास्त्र-मतें मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥

१ हा साहसाचा स्वभाव. २ अर्जुनाचा पराभव करण्यास. ३ सारथी-कर्ण, हा एका सारथ्याच्या राधा नांवाच्या बायकोस लहानपणीं सांपडला व तिनें त्यास वाढविलें म्हणून त्याचीं सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नांवें आहेत. ४ इंद्राच्या हत्तीला म्हणजे ऐरावताला. ५ मोठ्या कुलांत झालेला जन. ६ राधापुत्रा कर्णा. ७ हे मेंढ्या. ८ ईर्ष्या उत्पन्न व्हावी म्हणून. ९ क्षमारूप चिलखत. १० दुर्योधना. ११ अल्पबुद्धीचे. १२ शास्त्रमानानें.

अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंच तत्त्व देखावें ॥ ६२ ॥
तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
[1]चांद्र-शरन्मानें हे संख्या संख्यावदादृता[2] घडती ॥ ६३ ॥
एवंच[3] चांद्र-मानें तेरांही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागों देतिल न आपणां शब्द ॥ ६४ ॥
येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा- ॥
हूं[4] न म्हणतील, काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६५ ॥
युद्धें करूनि पाक्षिक[5] जय, त्यांतहि विजय पातला समरा ॥
सम रामाशीं[6] व्हा, हो शम राज्य-समर्पणें, हटें न मरा ॥ ६६ ॥
कुर्वधम म्हणे युद्धचि हो, सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल यातें मद्धृतें पद ओपितां महायासीं[7] ॥ ६७ ॥
पार्थ म्हणे वैराटे रथ कुरु-कटकासमीप राहूं दे ॥
गो-धन हरावयास्तव आले भट कोण कोण पाहूं दे ॥ ६८ ॥
तो गुरु[8], तो गुरु-नंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह, रे ॥
यांहीं धेनु वळाव्या ! ! शिव शिव गोपाळ राम कृष्ण हरे ! ! ॥ ६९ ॥
रे उत्तरा शकुनिचा[9] या व्यूहांत न दिसे मला भाचा[9] ॥
त्यावांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ ७० ॥
हें कटक सोड, तिकडे चाल, तुझ्या हरुनि गोधना खळ तो- ॥
[10]प्राण-त्राण-परायण जिकडे निरपत्रपाग्रणी[11] पळतो ॥ ७१ ॥
उत्तर निज तुरगांतें द्याया अरुणासि[12] कौतुक पिटाळी ॥

---

१चांद्रवर्षांच्या मानानें—चांद्रमानानें वर्षाचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें ३६५ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिने व १२ दिवस जास्त धरिले जातात. २ ( संख्यावत्+आदृता ) ज्योतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. ३ ह्याप्रमाणें पाहिलें असतां. ४ हें स्वीकारार्थ अव्यय. ५ अनियमित, कोणत्या तरी पक्षाचा. ६ रामचंद्र जसा नीतीस्तव राज्यत्याग करून वनवासास गेला, तसे तुम्ही न्यायास अनुसरून पांडवांस राज्य द्या; असा भाव. ७ मद्धृत ( मत्+हृत ) पद ( मी घेतलेलें राज्य ) यातें ( अर्जुनातें ) ओपितां शक्रही महायासीं ( महा+आयासीं=मोठ्या संकटांत ) बुडेल—असा अन्वय. ८ कौरव पांडवांचा गुरु द्रोणाचार्य. ९ शकुनिचा भाचा—दुर्योधन. १० प्राण राखण्याविषयीं तत्पर. ११ ( निर्+अपत्रपा+अग्रणी ) निर्लज्जांमध्यें श्रेष्ठ ( दुर्योधन ). १२ सूर्याचा सारथि अरुण हा सूर्याच्या घोड्यांना जो वेग देतो, त्यापेक्षांही उत्तर आपल्या घोड्यांस जास्त वेग देता झाला असा भाव.

तों गर्जोनि कुरु-कटक-कर्णीं बसवी ध्वज[1]-रथ कपि टाळी ॥ ७२ ॥
कोठें जाल उभे रे [2]मत्स्येश्वर-धेनु-पश्यतो-हर हो ॥
सोडा गो-धन नाहीं तरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर हो ॥ ७३ ॥
खल-बल-जलधि-नि-मग्ना धेनु उसळल्या अलाबु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं म्हणे कां [3]गोप-सख्या मला बुजाल्या हो ॥ ७४ ॥
गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छ-भार वाहोनी ॥
राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ॥ ७५ ॥
येतांचि वि-क्रम-लवें श्री-हरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करि-घटेसि[4] जैसा त्या कुरु-सेनेसि वासवी रगडी ॥ ७६ ॥
तत्काळ उत्तरें तो नेला कर्णाकडेचि रथ वातें- ॥
घन गिरिकडे, सु-वैद्यें स्वौषध रुग्णाकडेचि अथवा तें ॥ ७७ ॥
दव जेविं तृणावरणा[5] वृष[6] भस्म करी महा-शरावरणा ॥
पार्थ म्हणे करितो गिरि-श[7]-कमंडलुशीं पहा शराव[8] रणा ॥ ७८ ॥
होते [9]यदंश-शेष-श्वास-ज्वलनांत हे समिद् धरणी ॥
त्याचा सखा धनंजय होय खल-शलभ-लया [10]समिद्ध रणीं ॥ ७९ ॥
मग [11]गगन-ग-नग-भिन्मुख-सुर-मत-गुरुसींहि अ-नव मुनि[12] नर तो-॥
कलह[13] करी कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि न रतो ॥ ८० ॥

---

१ एका समयीं अर्जुन व मारुति ह्यांचा एकमेकांच्या बळाविषयीं कांहीं पण पडला असतां अर्जुनास कृष्णाचें साहाय्य असल्यामुळें त्यांत मारुति हरला; तेव्हां कृष्णमतें असा नियम ठरला कीं, " मारुतीनें प्रत्येक युद्धप्रसंगीं अर्जुनाच्या ध्वजावर बसून आपल्या गर्जनेनें शत्रूंस भयभीत करावें. " ह्यावरूनच अर्जुनास ' कपिध्वज ' हें नांव पडलें आहे. २ विराटराजाच्या गायी पाहातां पाहातां नेणारे. ३ गवळ्याच्या ( कृष्णाच्या ) मित्रास. जो गोपसख त्यास गायींनीं बुजूं नये हें तात्पर्य. ४ हत्तींचा समुदाय ( घटा ). ५ ( तृण=आवरणा ) गवताच्या आच्छादनास. ६ कर्ण. ७ महादेवाच्या कमंडलूबरोबर. ८ परळ. ९ ज्या कृष्णाचा अंश जो शेष त्याच्या श्वासांच्या अग्नीमध्यें. प्रलयकाळीं प्रखर सूर्यकिरणांनीं पृथ्वी तापून ती आग शेषाच्या मस्तकास पोंचली असतां तो फूत्कार करितो, व त्या योगानें सर्व पृथ्वी जळून जाते; अशी कथा आहे. १० फार पेटलेला. ११ गगनांत गमन करणारे आणि नगाभित् ( पर्वताचा भेद करणारा ) म्हणजे इंद्र तो आहे प्रमुख ज्यांत असे जे सुर म्हणजे देव त्यांना मान्य जो गुरु ( द्रोण ) त्याबरोबर १२ पुराणऋषि. अर्जुन हा नरनारायणांपैकीं नराचा अवतार होय. १३ उत्तरार्ध— यासि इतरक्षत्रियधर्मास अनुसरून मात्र केलेल्या कलहास ) वमुनि ( खेरीज करून ) इतरीं गुरुकलहीं ( गुरूशीं दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या कलहांत ) जन न रतो; असा अन्वय.

गुरुला वि-विध शरांची वाहे तो राग-राशि लाखोली ॥
भेटे अस्त्र-तति तया जशि [1]पाहे सागरा शिला खोली ॥ ८१ ॥
करिती [2]सुर्यास्तोदय एक मुहूर्तांत एक शतदां ते ॥
[3]त्यांत न एकासमही होती मेघांअसेहि शत दाते ॥ ८२ ॥
द्रोणार्जुन तुल्य-क्रिय [4]बिंब-प्रति-बिंबसेचि ते गमती ॥
किति कुरु-कटकें प्रेक्षक वृत्र-प्राचींहि लोचनें भ्रमती ॥ ८३ ॥
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥
जन कासया विते सुत [5]कसिते न करावया भजन कास ॥ ८४ ॥
[6]सांवर्तिक मेघांच्या लाजाव्या द्रौणि-[7]सायकां धारा ॥
[8]सत्ताताहुनि होइल सुत म्हणवायासि हाय कां धारा ॥ ८५ ॥
बहु कल्पना सु-कवि-सा विजयहि बहु [9]शर-परंपरा व्याला ॥
भंगू पाहे समरीं गुरु-पुत्रासहि जसें पराव्याला ॥ ८६ ॥
[10]प्रति-रव-मिषें शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥

१ उत्तरार्धाचा अर्थ—शिळा महासागरातही टाकली असतां जशी ती त्याच्या थट तळाशीं जाते, तसे नानाविध अस्त्रांचा प्रयोग करून जे बाण अर्जुनानें महापराक्रमी द्रोणावर सोडिले ते सर्व त्याच्या शरिरास भेदून गेले—असा भाव. २ एकानें आपल्या बाणांच्या वृष्टीनें सूर्य झांकून टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुनः सूर्याचा उदय करावा, असे ते एक एक ( प्रत्येक ) मुहूर्तांत शेंकडों वेळां करीत होते; हा भाव. ३ मेघां असेही ( मेघांसारखे देखील ) शत दाते होती ( जन्मतात ) [ पण ] त्यांत ( त्या दोघांत, द्रोणार्जुनांत ) एकासमही ( एकासारखा दुसरा एक ) न ( जन्मत नाहीं ). अर्जुनासारखा वीर एक अर्जुनच होय, द्रोणासारखा वीर एक द्रोणच होय, इतर तत्सम कोणी नाहीं, शंभर मेघांसारखे दाते पुरुष होतात, पण या केक वीरासारखा वीर होत नाहीं. ( काव्यसंग्रह, महाभारत, विराटपर्व, पृष्ठ १०४ पाहा. ) ४ कोणतेंही प्रतिबिंब ( प्रतिच्छाया ) ज्या पदार्थाचें असतें, त्या पदार्थास ( त्या प्रतिबिंबाचें ) बिंब म्हणतात. पदार्थ आणि त्याचें प्रतिबिंब हीं जशीं सर्वांशीं सारखीं असतात, तसे द्रोण व अर्जुन पराक्रमानें अगदीं सारखे भासले. ५ सुत भजन ( सेवा ) करावया ( जर ) कास न कसित, ( तर ) जन ( त्यांस ) कासया विते? असा अन्वय. ६ प्रलयकालसंबंधी ७ अश्वत्थाम्याच्या बाणांस. ८ उत्तरार्ध—हाय म्हणावयास ( अरे रे हा कुपुत्र निघाला म्हणून दुःखाचे उद्गार काढविण्यास ) सुत सत्ताताहुनि ( पराक्रमी बापापेक्षां ) धारा ( कमी योग्यतेचा ) कां होईल? असा अन्वय. तात्पर्य, अश्वत्थामा द्रोणापेक्षा पराक्रमानें कमी नव्हता. ९ बाणांच्या पंक्ति. १० प्रतिध्वनीच्या मिषानें.

देवी म्हणति सख्यांनो दारुण हा क्षात्र-धर्म न भला गे ॥ ८७ ॥
झाले भाते समरीं आणाया गुरु-सुतीं उणेंच रिते ॥
[1]देती सामग्री जय तरि कां सद्गीतिला गुणी वरिते ॥ ८८ ॥
भंग अश्वत्थामा [2]अश्वत्था मा [2]कचित् सदा हरिला ॥
तसि इतरासि जय-श्री नित्य हरि-जनासि तो तिणें वरिला ॥ ८९ ॥
हरुनि यशो-धन गो-धन योध न गणितां क्षयासि नेऊन ॥
त्या नृप-पुत्रास म्हणे चाल पुरा हें मनींच ठेवून ॥ ९० ॥
[3]झांकी वपुला क्षत-जें वसतां वर्मी अरींषु [3]न्हाल्याला ॥
झाला सारथि पहिल्या [4]योषा-वेषासि तो पुन्हा त्याला ॥ ९१ ॥
विजयी विराट इकडे ये पूजिति पौर विप्र-जन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्व-तनयातें ॥ ९२ ॥
जन कथिति धेनु कुरुंनीं वाळिल्या येऊनि [5]उत्तराशेला ॥
[6]त्वत्कीर्तिनें पसरिला स्व-परित्राणार्थ उत्तरा शेला ॥ ९३ ॥
गेला कुरु जिंकाया आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥
सत्य [7]कुमारचि, वदला लागो अप-कीर्तिचा न डाग मला ॥ ९४ ॥
भू-प म्हणे कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्र [8]मुला ॥
दुःख [9]सुदेष्णेला जें शिरतां सिंहांत कलभ अभ्रमुला ॥ ९५ ॥
देवा[10] कुमार आला सोडविल्या धेनु पळविलीं कटकें ॥
न [11]वय प्रमाण तेजस्वि-जनीं म्हणती कवी न तें लटकें ॥ ९६ ॥
धर्म म्हणे आयकिलें दूताचें वचन चांगलें कानें ॥
राया सुख-रोमांचित केलें कीं आजि आंग लेकानें ॥ ९७ ॥

१ ह्याच्या स्पष्टीकरणार्थ का. सं. महाभा. विराटपर्व पृ. ११० पहा. २ फक्त शनिवारींच अश्वत्थ (पिंपळ) त्यापाशीं लक्ष्मीचा वास असतो, अशी प्रसिद्धि आहे. ३ वर्मी बाण लागून रक्तानें भिजलेल्या शरिरास झांकी. ४ स्त्रीवेषास. ५ (उत्तर+आशेला) उत्तर दिशेला. ६ त्वत्कीर्तिनें स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला पसरिला, हा अन्वय; तुझ्या कीर्तीनें उत्तरापुढें पदर पसरून, माझें रक्षण कर अशी विनंती केली. तुझी कीर्ति राखण्याकरितां तो युद्धास गेला; हें तात्पर्य. ७ सत्य कुमाराचि गमला—म्हणजे खरोखर कार्तिकस्वामीच वाटला. ८ मुलाला (उत्तराला). ९ सुदेष्णा ही विराटाची बायको, तिला. १० हे राजा. ११ अंगांत मोठा पराक्रम असण्यास वय मोठें असावें लागत नाहीं, हें तात्पर्य.

सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत बायका नवला ॥
[2]चिंता-मणि-गल बालक जो दुर्लभ त्यासि काय कानवला ॥ ९८ ॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ॥
मज-मागें मत्स्यांचा हा रिपु-शशि-राहु-बाहु राणा[2] हो ॥ ९९ ॥

---

## उद्योग-पर्वांतील कृष्ण-शिष्टाई.

( म० भा० अ० ७२–९५; मोरोपंत अ० ६–८ )

पांडवांचा अज्ञातवास संपल्यानंतर त्यांनीं आपला राज्याचा हिस्सा आपणांस मिळावा, व दुर्योधनाशीं सल्ला व्हावा म्हणून कृष्णास शिष्ट ( वकील ) करून हास्तिनापुरास पाठविलें, हें ह्या आख्यानांत आहे.

धर्म म्हणे श्री-कृष्णा बुडतों मी सत्य जाण तार मला ॥
भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला ॥ १ ॥
जेणें न बुडे कुरु-कुळ धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया- ॥
सांग, सख्या भ्रमला हा जन, केवळ आप्त[3] तूंचि यदु-पा या[3] ॥ २ ॥
श्रीकृष्ण म्हणे देवा[4] जातों मी त्याकडे हित वदाया ॥
काय सु-योधन न शके पचवाया वृत्र-हाहि तव दाया ॥ ३ ॥
धर्म म्हणे हितहि तया अ-हित, अहि तसाचि तो परम खळ गा ॥
व्यसनीं भल्यासि पाडी दुष्ट गजा जेविं [5]पिहित-मुख खळगा ॥ ४ ॥
शौरि म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकानें ॥
हरिचें काय करावें परिसो तो[6] हित-कथा पिशुन[6] कानें ॥ ५ ॥
जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा जा[7] ( ज्या ) ॥
करिल हरि-मथन शश तरि करिल सु–योधनहि मन्मथन राजा ॥ ६ ॥
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्या ही ॥
प्राणापरीस बहु मज जेविं तुम्ही तेंवि तो बहु न व्याही[8] ॥ ७ ॥

---

२ चिंतामणि ( इच्छिलेलें देणारें रत्न ) ज्याच्या गळयांत आहे असा बाळक. २ शत्रु हाच चंद्र त्याला राहूसारिखा (ग्रासणारा) आहे बाहु ज्याचा; हें 'राणा' याचें विशेषण. ३ या ( ह्या धर्मास) यदुपा ( हे कृष्णा) तूंचि आप्त, हित व खरें सांगणारा ( आहेस). ४ हे धर्मराजा. ५ गवतानें वगैरे झांकलें आहे तोंड ज्याचें असा. ६ तो खल दुर्योधन. ७ ज्याला. ८ दुर्योधनाची मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब ह्यास दिली होती, म्हणून तो व्याही.

माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेविं हित ॥
तेविं करितसे मन्मति होय निज-दयेसि काय जें वि-हित ॥ ८ ॥
देइल अंश सु-योधन तरिं आम्हां पावला सदाशिव हो ॥
म्हणतोसि तूंहि मीही कीं [1]प्रज्ञा-चक्षुचें सदा शिव हो ॥ ९ ॥
श्री-राम जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति[2] अंगदा साच्या ॥
धर्म तसा प्रभुला, जो कार्यां देणार अंग दासाच्या ॥ १० ॥
भीम म्हणे केशवजी मृदु बोला उग्र तो सु-योधन हो ॥
वा त्यासीं सख्यचि हो युद्धीं हत एकही सु-योध न हो ॥ ११ ॥
इतर असो, लाजलचि त्या नित्य मदांध सुर-गज गदीशा[3] ॥
दुर्योधना गुरु असें म्हणतिल गरलांध उरग जगदीशा ॥ १२ ॥
श्री-कृष्ण म्हणे हा रे भीमा जरि तूं महा-भुज गदीन[4] ॥
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महा-भुजग दीन ॥ १३ ॥
आम्हां तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिशील तूं अगदीं ॥
[5]निर्वीर्यत्व [6]चिकित्सा-समयीं आलें [7]चिरार्जितीं अगदीं ॥ १४ ॥
भीम म्हणे हा घाया सुत-शोक पित्यासिं[8] यादवा[9] लाजे ॥
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला[10] जे ॥ १५ ॥
अर्जुन म्हणे सख्या जें कीर्ति-कर असेल तेंचि कर जा गा ॥
सांगावें काय, तुझा प्रणत-त्राणीं असोचि कर जागा ॥ १६ ॥
कृष्णाहि म्हणे कृष्णा म्हणसि जिला प्रिय-सखी पहा हे ती ॥
विसरो तुझी न समयीं ईस श्रित-भव्य-दा[11] महा-हेति ॥ १७ ॥
बहु गहिंवरोनि दावुनि [12]दुःशासन-पाणि-कृष्ट-केश वदे ॥
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा तीस अ-भय केशव दे ॥ १८ ॥
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥

१ प्रज्ञा ( बुद्धिच ) आहे चक्षु ज्यास म्हणजे अंध, त्याचें-धृतराष्ट्राचें. २ सामाविषयीं भाषणें. ( पृ. ४३, एकनाथकृत अंगदशिष्टाई, ओंव्या १७-२१ पहा. ) ३ गदा धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ अशा (दुर्योधनास). ४ गदी+इन-गदा धरणाऱ्यांत श्रेष्ठ. ५ निःसारपणा. ६ रोग दूर करण्याच्या वेळीं. ७ पुष्कळ दिवस संपादन करून ठेविलेल्या औषधांत. ८ कौरवांचा बाप ( धृतराष्ट्र ) त्यास. ९ हे कृष्णा. १० हा ( मीच जो ) वणवा झाला. ११ आश्रितांचें कल्याण करणारी, किंवा हें कृष्णाचें संबोधन. १२ दुःशासनानें हातानें ओढलेले केस

[1]दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य-पद्म-भानु मिघे ॥ १९ ॥
धर्म म्हणे शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्ति-सह देवा ॥
मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य [2]साधु-सहदेवा ॥ २० ॥
तूं जेविं देवकीला भेटासि तैसाच भेट आतेला[3] ॥
आम्हांहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥ २१ ॥
कृष्णा कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें ॥
पंकीं धेनु[4] भ्रमती पुण्य-श्लोका मुरारि बा धावें ॥ २२ ॥
धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक[5] विदुर कृप द्रोण सर्व शुचि तज्ज्ञ[6] ॥
जे त्यांसि भेट, वद हित, सांगों तुज काय,तूंचि उचित-ज्ञ ॥ २३ ॥
म्यां पुशिलें कुशल[7] असें कर्णासि सुयोधनासि सांगावें ॥
येतां पंचम दाटुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें[7] ॥ २४ ॥
ऐसें अ-जात-रिपु नृप सूचित[8] सुचवूनि शौरिला परते ॥
मग विजय म्हणे देवा येऊं द्यावे न मजपुढें पर ते ॥ २५ ॥
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी ॥
राजर्षि ब्रह्मर्षि स्व-यश जयांच्या मनासि आकर्षी ॥ २६ ॥
इच्छा पुसतां वदले बा तुज-सम अन्य बोलका नाहीं ॥
प्राशूं धृतराष्ट्र-सभे-माजि तुझे धन्य बोल कानांहीं ॥ २७ ॥
दे[9] या अयास याया आज्ञा स-दया महोदया परिसा[9] ॥
यापरि साधु-मनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद या परिसा ॥ २८ ॥
सामार्थ प्रभु येतो ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं ॥
बहु तृषित अंधचातक मेघागम जेविं काय केकांनीं ॥ २९ ॥

१ दुर्योधन आदिकरून जे दुष्ट हेच काजवे त्यांस ' व त्या दुष्टांहून इतर म्हणजे (सुजन) तींच पद्में त्यांस ' सूर्यासारखा. दुष्टांचें दमन करणारा व साधूंस संतोष देणारा असा कृष्ण. २ बाळा सहदेवाला. सहदेव सर्वांत लहान असल्यामुळें असें म्हटलें आहे. ३ कुंतीला. ४ कुंती हीच गाय. ५ हा शंतनुराजाचा भाऊ व भीष्माचा चुलता. ६ ज्ञाते. ७ कोकिळास पंचम (गोड स्वरानें) गातां येत असतां त्यानें शिकून (दाटून) कर्णकटु कां गावें?—धर्मराजा अगदीं सरळ स्वभावाचा व अजातशत्रु होता म्हणून त्यानें कर्णदुर्योधनांस (ते दुष्ट असतांही) कुशल विचारिलें हें तात्पर्य. ८ (सु+उचित) योग्य. ९ हे सदया महोदया (भक्तांचा मोठा उत्कर्ष करणाऱ्या) परिसा, या अयास (हे आम्ही जे लोखंड त्यांस) याया (येण्याला) आज्ञा दे.

मार्गी सभादि सर्वहि बहु साहित्य प्रति-स्थळीं करवी ॥
कीं आपणावरि दया-दृष्टि करावी यदूत्तमें बरवी ॥ ३० ॥
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट ॥
मैंदाचें स्वीकारिल कवण विचक्षण अ-मूल्य निष्कपट ॥ ३१ ॥
धृतराष्ट्र म्हणे विदुरा जो साधु-मनें स्व-सद्गुणें हरितो ॥
येइल वृकस्थळाहुनि[1] आम्हां भेटावया उद्यां हरि तो ॥ ३२ ॥
दासी शत दासहि शत आठ महा-नाग रुक्म-रथ सोळा ॥
देईन तोहि सन्मणि शुचि तेजाचाचि जो गमे गोळा ॥ ३३ ॥
विदुर म्हणे कपट मनीं प्रेम वरि असें करूं नको पावें ॥
तुजवरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ॥ ३४ ॥
पांचां पुत्रां द्यावीं पांच न होउनि खळासि वश गांवें ॥
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्व-मुखेंकरून यश गावें ॥ ३५ ॥
गुळ-खोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ॥
सत्य प्रेमचि दावुनि सु-ज्ञें तो विश्व-पाळ कवळावा ॥ ३६ ॥
कपटादरें वळो पर[2] पर परमेश्वर कसा वळेल हरी ॥
कृष्ण-कृपामृत-निधिची [3]अ-कपट-वि-नताकडे वळे लहरी ॥ ३७ ॥
येतो साम कराया होय यशोर्थीच, तो यश लाहो ॥
देणार तुम्ही हय गज रथ दासी दास, हे कशाला हो ॥ ३८ ॥
समजाल तरि करिल हरि हर्षें पावोनियां विडा लास्य ॥
नाहीं तरि खेद-द त्या सर्व, जसें [4]प्र-स्थिता बिडालास्य[4] ॥ ३९ ॥
तेव्हां सु-योधन म्हणे सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें[5] ॥
न पुरेल कृष्ण-मानस-हरणीं बळ मेरुच्याहि हरित्यांचें ॥ ४० ॥
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्हीं अहो तात ॥
भ्याले म्हणेल, मान्य न अव-मानाला कुलीन होतात ॥ ४१ ॥
[6]त्रि-भुवन-पूज्य-तम प्रभु सत्यचि हें किंच[7] तो असे व्याही ॥
परि संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णेतरा अ-सेव्याही ॥ ४२ ॥

---

१ वृकप्रस्थ ( गांवाचें नांव ) तेथून. २ ईश्वराहून अन्य. ३ कपट सोडून शरण गेले-ल्याकडे. ४ बाहेर जाणारांस जसें ( बिडाल+आस्य ) मांजराचें तोंड, ( मांजर ) वाटेंत आडवें आलें तर तें दुःखद होतें. ५ पांडवांचें. ६ तिन्ही लोकांत पूजा करण्यास अत्यंत योग्य. ७ आणि.

जें वैर वाढलें तें आतिथ्यें करुनि काय हो शमतें ॥
अव-मान नव्हे जेणें तें क्षत्रोचित[1] असें मला गमतें ॥ ४३ ॥
[2]वृष्णि-प वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सु-ज्ञ ते सर्व ॥
जन सामोरे गेले अंदुक[3] जाला [3]सु-योधना गर्व ॥ ४४ ॥
धृतराष्ट्र-गृहा नेती राज-पथीं हळुहळूच हरि[4] हरितें ॥
त्यां पशु म्हणेल तो पशु, त्यांचें स-कृप-त्व अ-तुळ हरिहरि[5] तें ॥ ४५ ॥
भेटे धृतराष्ट्राला तत्कृत पूजेसि बहुत भाउनि घे ॥
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा[6] निववावयासि भाऊ[6] निघे ॥ ४६ ॥
"आहेत[7] सुखी पांडव देवा आलासि काय सामास[8] ॥
खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय[9] सा[10] मास[10]" ॥ ४७ ॥
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वास-राज[11] कुंतीतें ॥
जीस अ-सुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती[12] तें ॥ ४८ ॥
वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या ॥
ब्रह्मासहि[13] गहिंवरवी महिवर-वीरेंद्र-पांडुची भार्या ॥ ४९ ॥
प्रभुला म्हणे मुकुंदा बा तूंचि करिसि सुखी [14]स-खेदास ॥
संप्रति आहेत कसे मद्बालक ते तुझे सखे दास ॥ ५० ॥
प्रिय-सुत-विरह सु-दुःसह [15]देह-विरह बहु बरा सु-सह देवा ॥
पावेन कधीं बा मी म्हणतें [16]स्व-बहिश्चरासु सहदेवा ॥ ५१ ॥
वत्सा सहदेवा मी मेल्यावरि हाय नच वदावें हो ॥
तेरा[17] पळेंहि नसती माता, हें हायन चवदावें हो[17] ॥ ५२ ॥

---

१ क्षत्रियाला योग्य. २ यादवांचा पति (कृष्ण). ३ गर्वानें दुर्योधन सामोरा गेला नाहीं, हें तात्पर्य; अंदुक (आंधळें करणारा–गर्व–झाला.) ४ घोडे. ५ हे शब्द आश्चर्यवाचक आहेत. कृष्णमूर्ति चांगली सर्वांच्या दृष्टीस पडावी म्हणून घोडे हळू चालत होते हें तात्पर्य. ६ धृतराष्ट्राचा भाऊ (विदुर). ७ हें विदुराचें भाषण. ८ संधि करावयास. ९ शरीर. १० सहा महिने–पुष्कळ दिवस हा अर्थ. ११ सर्व हितचिंतकांमध्यें श्रेष्ठ (श्रीकृष्ण) कोठें सर्वासराजकुंतीतें असें एक पद आढळतें, तसें केल्यास, सर्व आप्त (इष्टमंडळी) ह्यांत प्रमुख कुंतीला, असा अर्थ घ्यावा व भेटे ह्याचा कर्ता कृष्ण अध्याहृत घ्यावा. १२ भाला धारण करणारा. १३ निर्विकार अशा ईश्वरालाही. १४ दुःखितास. १५ देहाचा नाश. १६ (बहिः+चर+असु) बाहेर संचार करणारा प्राणच. १७ पुत्रवियोग झाला असता माता (आई) तेरा पळेंही वांचावयाची नाहीं; परंतु मी १३ वर्षें वांचलें आहें, म्हणून मला माता हें नांव शोभत नाहीं, हें तात्पर्य.

प्रभु अश्रु पुसोनि म्हणे जें संकल्पित घडेल सत्वर तें ॥
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्त्व-रतें ॥ ५३ ॥
मच्चित्त कौरवांचे चिंतूनि [1]अ-साधु-वाद तळमळतें.॥
असतों मी तैं तरि न व्यसन-मळें धर्म-पाद-तळ मळतें ॥ ५४ ॥
आहेत स-दार सुखी देवि नमस्कार हे तुला सा[2] जे ॥
ऐसें सांगुनि वंदी, तें त्या श्रित[3]-शर्म-हेतुला साजे ॥ ५५ ॥
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना अ-सेव्याही ॥
कीं [4]तो [5]स्व-सुता [6]स्व-सुता देउनियां जाहला असे व्याही ॥ ५६ ॥
लघु[7] म्हणति जे सु-योधन-दुःशासन-शकुनि-कर्ण वेनातें[7] ॥
परिरंभ-पात्र केले प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ॥ ५७ ॥
पूजुनि घे प्रभु, होइल जल-निधिला तृप्ति-दायक विहीर ॥
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कवि-हीर ॥ ५८ ॥
भोजन करा म्हणे शठ, देव म्हणे मज कशास होकरितां ॥
जेवा तुम्हीच, दाटुनि आदर आग्रह कशास हो करितां ॥ ५९ ॥
असतों जरि अन्नार्थी प्रथमाचि म्हणतों अवश्य मी तुजला ॥
प्रेमार्थी पांडव-सख हा अन्नाकारणें नसे सुजला ॥ ६० ॥
प्रभुला म्हणे सु-योधन तिकडे[8] हिकडेहि[8] सम असे नातें ॥
ज्याकारणें करावा अस्मदनादर[9] तुवां असेना तें ॥ ६१ ॥
देव म्हणे केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव ॥
मान्य जसे अक्रूरोद्धव-बळ-भद्रोग्रसेन-वसुदेव ॥ ६२ ॥
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया ॥
द्विषदन्नें[10] न सेवावें म्यां येऊंही नये अगारा या ॥ ६३ ॥
खोटा सु-योधन म्हणुनि विदुर-गृहा जाय देव नच खोटा ॥
गोपोच्छिष्टा[11] वळला वळता कां वासुदेव न चखोटा ॥ ६४ ॥

---

१ दुर्भाषणें. २ सह्या. ३ आश्रितांचें अल्याण करण्याचा ज्याचा हेतु आहे अशा कृष्णाला. ४ दुर्योधन. ५ आपली कन्या (लक्ष्मणा). ६ आपल्या पुत्रास (सांबास). ७ ह्या नांवाचा राजा महापातकी व दुष्ट होता; त्यालाही जे सुयोधनादि लघु (लहान) (तो काय आमच्या पुढें ?) असें म्हणतिं. ८ पांडवांकडे व आम्हांकडे. ९ आमचा अपमान. १० द्विषत्+अन्न-शत्रूचें अन्न. ११ गोपाळांच्या उष्ट्या अन्नाला.

[1]दुः-संग-नक्र-दत्त क्लेश निवारूनि सर्व [2]विदुर-गजा ॥
मुक्त करी हरि, लाजे गातां गुण-कीर्ति [3]सर्व-विदुरग जा ॥ ६५ ॥
शत-संख्य वाजवी ज्यां जेववितां माय देवकी चिटक्यां[4] ॥
तो नित्य-तृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ॥ ६६ ॥
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाळ, मारिले फुरके ॥
उरके सर्वांमागुनि अशन परि न ताट चाटणें उरके ॥ ६७ ॥
ज्याच्या चरणें स्व-रजा-करवीं प्र-णतासि मोक्ष देवविला ॥
देव [5]विलास-मनु-ज-तनु विदुर-प्रेमें यथेष्ट जेवविला ॥ ६८ ॥
मग रात्रौ एकांतीं सर्व-ज्ञालाहि साधु-राय कवी ॥
पाय रगडितां दुर्जन-दुर्योधन-दुर्मतासि आयकवी ॥ ६९ ॥
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रि-रज निसरे ॥
त्या दीन-बंधुची ती चिंता न सरे परंतु रजनि सरे ॥ ७० ॥
प्रातःकाळीं स-शकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला ॥
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञांबका[6] पहायाला ॥ ७१ ॥
[7]जन-दृष्टि-चातकी जी तूर्य-रवेंकरुनि देत ओ तीतें ॥
प्रभु-मेघ दर्शनामृत दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें ॥ ७२ ॥
मग जी जल-द-श्यामा करुणा[8] बसली नवासनावरि ती ॥
जीच्या उपासक-जनां-प्रति विषयाच्या न वासना वरिती ॥ ७३ ॥
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमेंकरूनि [9]मा-पानें ॥
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडायेवढ्याहि मापानें ॥ ७४ ॥
टकमक पाहत होते प्रभु-मुख-चंद्राकडेचि चातकसे[10] ॥
नसतील जोडिले श्रवणांहिं बसाया मनासि हात कसे ॥ ७५ ॥

१ दुःसंग हाच नक्र ह्यानें दिलेले. २ विदुररूप गजेंद्रास. ३ ( सर्व+वित् + उरग ) सर्वज्ञ शेष. ४ चुटक्या. ५ लीलेनें मनुष्यदेह ज्यानें धारण केला आहे असा. ६ प्रज्ञा ( बुद्धि ) हेंच आहे अंबक ( नेत्र ) ज्याचें अशाला म्हणजे अंध धृतराष्ट्राला. ७ जन-दृष्टि जी चातकी तीतें प्रभु-मेघ तूर्यरवेंकरुनि ओ देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती. ८ करुणेची मूर्तीच जो कृष्ण. ९ लक्ष्मीपतीनें. १० एथें चंद्राच्या संबंधानें चकोर-पद पाहिजे; परंतु प्रास साधण्याच्या व्यवधानांत चातकपद योजण्याचा प्रमाद कवीच्या हातून झाला असावा.

सम्य [1]श्रुति-वदनातें पसरिति सेवावया भगवदुक्ती ॥
प्राश वयासि जेविं स्वच्छ स्वात्यंबुला[2] जलधि-शुक्ती ॥ ७६ ॥
देव म्हणे धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी ॥
पद त्रियांचें तूं, परि परिस, मज बळेंचि आस-ता वदवी ॥ ७७ ॥
जें मेळविलें चंदन-सम झिजवुनि पर-सुखार्थ आंगातें ॥
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविसि बळेंचि कां गा तें ॥ ७८ ॥
दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति, असी कुळ-रीति तुम्हीं कधीं न मोडावी ॥ ७९ ॥
वाढिव धर्म प्रेमें वाढवि मज जेविं नंद नवनीतें ॥
सत्पुत्रांनीं भवनीं सुर-तरुंनीं न सुख नंदन-वनीं तें ॥ ८० ॥
म्हणतो युधिष्ठिर नको पायें लोटूं मला अव-नतातें ॥
[3]वचन-करापत्याचें न करावें काय हो अवन तातें ॥ ८१ ॥
क्रमिले तसेचि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे ॥
धन्य म्हणत होते जे लावितिल तुलाचि शब्द ते राजे ॥ ८२ ॥
सुख-संतति-सु-कृतर्द्धि-प्रीति-श्री-पुण्य-कीर्ति या लाभें- ॥
साम करीं साधूंसीं नाहींतरि पावलेंचि यांला[4] भें ॥ ८३ ॥
बहु सत्य बहु प्रिय बहु हित बहु मत बहु दुराप[5] बहु रुचिर ॥
शुचि-रम्य-[6]क्षीरधिजानन-चंद्र-चकोर बोलिला सु-चिर ॥ ८४ ॥

## आर्या—भीष्म-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

(म० भा० अ० २३ व १३६; मोरोपंत अ० १—१०).

युद्धारंभीं श्रीकृष्णानें सांगितल्यावरून विजयानें (अर्जुनानें) रथाखालीं उतरून आपल्यास विजय मिळावा म्हणून श्रीदुर्गेचें स्तवन केलें. त्यानंतर देवी प्रगट होऊन तिनें "तुला जय प्राप्त होईल" असा आशीर्वाद दिला व ती गुप्त झाली. मग आपल्या समोर सर्व आप्तमंडळी उभी राहिलेली पाहून त्यांच्यावर बाण कसे टाकावे म्हणून अर्जुनाला भीति

१ कान हीच वदनें त्यांतें. २ स्वातिनक्षत्राच्या उदकास. ३ (वचन+कर+अपत्य) आज्ञेंत राहाणाऱ्या मुलांचें. ४ सुखादिकांला. ५ (दुर्+आप) ऐकायाला मिळणें कठिण. ६ लक्ष्मीच्या मुखचंद्राविषयीं चकोरासारखा कृष्ण.

उत्पन्न झाली असें पाहून श्रीकृष्णानें अठरा अध्याय गीतेचा अर्जुनास उपदेश केल्यानंतर तो भीष्मांशीं युद्ध करूं लागला. त्यांत भीष्माचे बाण अर्जुनास लागून तो घायाळ होऊन रथांत पडला. तें पाहून श्रीकृष्ण रथांवरून खालीं उडी टाकून भीष्मास मारण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेला व त्यानें भीष्माचा पराभव केला ही कथा या आख्यानांत आहे.

युद्धारंभीं यदु-पति वदला विजया रथातळीं उतर ॥
दुर्गेसि हात जोडीं होइल खल-बल-समुद्र हा सु-तर ॥ १ ॥
त्रि-भुवन इच्या प्रसादें जेविं वसंततुनें समस्त वन- ॥
शोभे, म्हणुनि करावें त्वां केवळ दुर्बला-सम स्तवन ॥ २ ॥
स्व-रथाखालें उतरुनि नमुनि म्हणे विजय वि-जय दे दुर्गे ॥
त्वत्पद-भजनीं बहु सुख म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला दुर्गे[1] (दुर गे) ॥३॥
[2]वासर-मणि-कोटि-रुचे [3]हास-रस-वशीकृत-स्मराराते ॥
[4]कासर-नगासने हा दास रणीं वि-जय-पात्र हो माते ॥ ४ ॥
त्वदुदारता जसी तसि न [5]सुरांच्या बहु-मता अ-गा साभो ॥
ऐसें स्तवितांचि शिवा दर्शन देउनि म्हणे अगा साधो ॥ ५ ॥
द्याया मज यश, लोकां सुख, गृध्रां तो लुलाय[6] मास मरे ॥
मरतिल तसेचि तव रिपु मानुनि समरीं तुला यमासम रे ॥ ६ ॥
देउनि विजय-वर असा झाली अंतर्हिता भवानी ती ॥
सदवन असदनवन[7] या नित्य जिच्या बहु-मता भवा नीती ॥ ७ ॥
युद्धारंभीं [8]भीष्म-द्रोण-प्रमुखाखिलास-वध-भीता ॥
[9]शक्र-सुता त्रि-जगद्गुरु-कृष्णें उपदेशिली स्वयें गीता ॥ ८ ॥
त्या योगानें अर्जुनाचा मोह दूर होऊन तो युद्धास तयार झाला तेव्हां—
बहु-विध-वाद्य-रव अ-मर-नाथादि-विमान दाटले खांत ॥
वर्णिति [10]नर-नारायण कोण तयांचे न भाट लेखांत ॥ ९ ॥

१ गे दूर हो. २ कोटि सूर्यांप्रमाणें आहे तेज जिचें. ३ आपल्या सुंदर हास्यानें स्वाधीन केला आहे मदनाचा शत्रु ( शिव ) जिनें. ४ महिषासुर व विंध्याचल ह्यांवर बसणारी. ५ कल्पवृक्षास. ६ महिषासुर. ७ असत्+अन्+अवन—दुष्टांचें रक्षण न करणें. ८ भीष्म, द्रोण आदिकरून संपूर्ण आप्तांचा वध होईल म्हणून भ्यालेला जो त्याला. ९ इंद्राचा मुलगा अर्जुन, त्यास. १० अर्जुन व कृष्ण ( वर्णिति ह्यांचे कर्म ).

भीष्म पुढें करुनि उठे प्रथम सु-योधन करावया कदन ॥
भीम पुढें करुनि उठे धर्म प्रभु जो सु-कीर्तिचें सदन ॥ १० ॥
भीमाचा सिंह-ध्वनि कोणासहि आयकों न दे वाद्यें ॥
सोडुनि समाधि मस्तक डोलविलें आयकोन देवाद्यें[1] ॥ ११ ॥
वृद्ध-तरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखर्षि तयांतें जाणुनि तद्भुज-पराक्रमीं रमले ॥ १२ ॥
सूं सणणण सणणणणण वाजति शर-निकर [2]काय-हानि-कर ॥
वदले सुर मुनि करितो नर-रूपें रुद्र काय हा निकर ॥ १३ ॥
शर-धी जल-धी फुटले कीं दैवें पाश एकदां तुटले ॥
कीं [3]काल-व्याल, [4]करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले ॥ १४ ॥
कवि योजुनि उपमा [5]गज-हर-नर-शर-ततिस वाहुटळ लाजो ॥
अ-तुल-बल न कां गर[6] गल-कलहींहि न [7]विजय-बाहु टळला जो ॥ १५ ॥
देवासुराहव न बहु त्या कौरव-पांडवाहवाहून ॥
शोणित-नदींत गेले [8]स-भट-रथ-द्वि-रद-वाह वाहून ॥ १६ ॥
तिसरे दिवशीं राया[9] भीमानें [10]अतितरोग्र-कोपानें ॥
दुर्योधन नृप मूर्छित केला भेदुनि उरांत रोपानें ॥ १७ ॥
सावध होउनि राजा भीष्मासि म्हणे अहो पितामहजी ॥
[11]झाली [12]भवत्-प्रतिज्ञा काय जनां दे सुधा पितां मह जी ॥ १८ ॥
असतां तुम्हीं [13]पति पृथा-पुत्र मथिति या मदीय पृतनेतें ॥
नवल [14]ज्वलदनलाचें सर्वस्वें बळ हरोनि धृत नेतें ॥ १९ ॥

---

१ महादेवानें. २ शरिरांचा नाश करणारे. ३ कृष्णसर्प. ४ हत्ती, घोडे, व योद्धे हेच कोणी बेडूक त्यांस गिळावयास. ५ हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या बाणसमुदायास उपमा वाहुटळ योजून कवि लाजो. ६ विष आहे कंठांत ज्याच्या अशा शिवाबरोबर युद्ध करण्यांत. ७ अर्जुनाचा बाहु. ८ योद्ध्यांसह रथ, हत्ती व घोडे. ९ हे धृतराष्ट्रा. १० अति+तर+उग्र+कोप–फारच भयंकर कोप. ११ अन्वय–जी भवत्प्रतिज्ञा सुधा (आपली प्रतिज्ञारूप सुधा) पितां (प्राशन केली असतां) जनां (लोकांला) मह (आनंद, उत्सव) दे (देत असे) [ती] काय झाली? ती आपली प्रतिज्ञा व्यर्थ झाली काय? मी पांडवांस जिंकीन किंवा ते मला जिंकितील, अशी भीष्माची प्रतिज्ञा होती. (कां. सं. महाभा. भीष्मपर्व, पृ. ६५). १२ पांडवांस मी जिंकीन किंवा ते मला जिंकितील अशी (भार० भीष्म-प० अ० ८१). १३ सेनापति. १४ (ज्वलत्+अनल) पेटलेल्या अग्नीचें

जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें ॥
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य[1] थानातें ॥ २० ॥
राया भलतें वदसी पथ्य[2] हित स्व-गुरु-वचन आइकसी ॥
अन्य असोत, वदेल स्व-सुताप्रति अ-हित वचन आइ कसी ॥ २१ ॥
कैसा जिंकावा हो करुनि बळें आहवा युवा[3] [4]जीनें ॥
बा जिंकिला कधीं तरि जवनें तरुणेंहि वायु वाजीनें ॥ २२ ॥
मी आजि [5]साग्रजानु-ज शक्र-सुताचें करीन वारण गा ॥
बहु हेंहि पदभरिहि जरि सारील अ-नव करी नवा रण-गा[6] ॥ २३ ॥
असि करुनियां प्रतिज्ञा [7]विष्णु-पदी-नंदनें अति-त्वरितें ॥
पांडव-चमू-पतीचें मथुनि चमू पाडिलें पति-त्व रितें ॥ २४ ॥
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महा-जवन तो बा ॥
बहु हाय हाय म्हणती प्राकृत, बुध हंत हा, यवन तोबा ॥ २५ ॥
गरुडहि अहीस न तसा न करि-कुळालाहि तेविं हरि खपवी ॥
दुर्योधनासि जैसा दे भीष्म न [8]हरिस तेविं हरिख पवी ॥ २६ ॥
धर्म-कटक खांडव-वन, भीष्म विजय[9], विजय तोचि हरि[10] गमला ॥
शर दव, रक्त ज्वाला, रूपक याहूनि होय बहु न मला ॥ २७ ॥
पडतांचि गांठ झाले समर-चमत्कार फार न वदवती ॥
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत-कलश-सदृश नव दवती ॥ २८ ॥
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे जीव न स्थविर[11] तात ॥
दिसले शरांत ते [12]न-ग [13]कल्पांबुधि-जीवन-स्थ विरतात ॥ २९ ॥
शांतनव सिंह गमला पळतां नर-रथ हि तो पळ ससाच ॥
[14]स-सख प्रभुहि वसंतीं बहु फुलला होय हो पळस साच ॥ ३० ॥

---

१ दुसरें मूल. २ नीतीस अनुसरून असणारें. ३ तरुण—अर्जुन. ४ म्हातारा जो मी त्यानें. ५ वडील व धाकट्या भावांसह. ६ रणांत आलेल्या. ७ गंगा सुतानें (भीष्मानें). ८ इंद्राला. ९ अर्जुन. १० इंद्र. अर्जुनानें अग्नीस खांडव—वन जाळावयास दिलें, तेव्हां इंद्राचें व अर्जुनाचें युद्ध झालें अशी कथा आहे. ११ वृद्ध—भीष्म. १२ कृष्णार्जुन. १३ कल्प+अंबुधि +जीवन+स्थ—प्रलयकालच्या समुद्राच्या पाण्यांतील. १४ अर्जुन व कृष्ण त्यांस भीष्माचे पुष्कळ बाण लागून त्यांच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें असतां ते फुललेल्या पळसासारखे दिसूं लागले.

जों जों हाणी खर शर तो [1]रिपु-यवस-दव तारकोपाया[2] ॥
तों तों लागे हळुहळु [3]कमला-धव-सद्‌वतार कोपाया ॥ ३१ ॥
जो मातृ-स्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली[4] ॥
तो भीष्मावरि कोपे [5]स्व-मधु-हरा-उपरि जेविं सरघाली[6] ॥ ३२ ॥
चक्र करीं धरुनि रथा-खालें टाकुनि उडीस जंव धावे ॥
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे ॥ ३३ ॥
धांवुनि यत्नें धरि परि वोढुनि ने देव त्यासि[7] वोढक-सा ॥
जाणों म्हणे भुज-बळें पाहूं जरि वोढितोसि वोढ कसा ॥ ३४ ॥
कर जोडुनि भीष्म म्हणे येतां मारावयासि या हो या ॥
हा सत्य-संध केला मुक्तहि साधूंसि गावया होया ॥ ३५ ॥
केला उभा सितार्थे चरणीं घालुनि मिठी पदीं[8] दशमीं[8] ॥
प्रभु तत्त्व असें कळवी कीं प्रेम-बळेंचि पद-नता वश मी ॥ ३६ ॥
पाय धरुनि पार्थ म्हणे त्यागुनि धन काय जींप्रति ज्ञाते- ॥
बहु जपले तद्गुरुंनीं त्यागावी काय जी प्रतिज्ञा ते ॥ ३७ ॥
या दासाकरवींच क्षिप्र तुम्ही या यशास करवाल ॥
नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल ॥ ३८ ॥
यापरि हित प्रिय पृथा-पुत्रोक्ति अ-मान्य कां करील हरी ॥
सन्मित्रोक्ति करी जें अमृत-रसाची न तें करी लहरी ॥ ३९ ॥
बहु काय वदों राया तिसऱ्या दिवसाचिया चरमयामीं ॥
भूमि-तळा मांस-मया देखत होतों नभा शर-मया मी ॥ ४० ॥
भीष्मासि म्हणे राजा व्हावी ऐसी रणांत मदवस्था ॥
झाला मला सु-दुः-सह हा ऐसा होय ताप न [9]दव-स्था ॥ ४१ ॥
शिरला भीम व्यूहीं जेविं अज-कुळांत लांडगा शिरतो ॥
दैवेंचि रक्षिलें मज कापित होताचि दांडगा शिर तो ॥ ४२ ॥
या तुमच्या पावाव्या दुर्बल-सेनां-समान वध सेना ॥

१ शत्रुरूप तृणास वणवाच. २ तारणारा उपायच जो ( कृष्ण ) त्यास. ३ लक्ष्मीचा पति जो विष्णु त्याचा पूर्ण लक्षणाचा अवतार—विष्णूचा कृष्ण पूर्ण अवतार मानिला आहे. ४ पाडतो. ५ आपला मध हरण करणाऱ्यावर. ६ मधमाशांचा थवा. ( सरघा+आली ). ७ अर्जुनास. ८ दहाव्या पावलीं. ९ वणव्यांत सांपडलेला.

हें झाल्या कां स्वर्गी जोडुनि एनास मानव घसेना ॥ ४३ ॥
झालीं युद्धें शत-शः सर्व-प्रेक्षक-मनो-हरें स-रसें ॥
होय [1]रणांगण [1]रक्तोत्पल-वन-चित-पद्मराग-भू-सर-सें ॥ ४४ ॥
भीष्म ग्रीष्म-तरणि-सा अर्जुन हेमंत-तरणि-सा गमला ॥
देव म्हणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ ४५ ॥
हो[2] शूर दूर ओसर म्हणणार महा-प्रभाव हा रविला ॥
हार विलासि-जनेंसा येणें कैसा प्र-भाव हारविला[2] ॥ ४६ ॥
झाला धीर परि परि-म्लान सखा जाति-पुष्प-गुच्छक-सा ॥
तुच्छ कसा हा प्र-वया चिरडिल भलता अहींद्र-पुच्छ कसा ॥ ४७ ॥
हा पांडवांसि भस्मचि करिल उपेक्षा करूं नये याची ॥
पदरीं अ-कीर्ति [3]आश्रित-सुहृदनवन-पथ करून[3] येयाची[4] ॥ ४८ ॥
आणुनि मनीं असें ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास- ॥
भीष्म वधाया धांवे हरि हस्तें कवळुनि प्रतोदास ॥ ४९ ॥
देव रथातें सोडुनि धांवे देवापगा-विलापार्थे[5] ॥
कीं दुस्तरारि-सागरिं[6] न वुडो कांसेसि लाविला पार्थ ॥ ५० ॥
पार्था-प्रति प्रयत्नें तो बळ कारुण्य-सिंधु राखाया ॥
क्रोधें गर्जत धांवे सिंह जसा मत्त-सिंधुरा खाया ॥ ५१ ॥
"एह्येहि[7] देव-देव श्री-कृष्ण नमोऽस्तु ते[7]" असें बोले ॥
बोले गळा प्राज्य-प्रेमाश्रु-भरें करूनियां डोळे ॥ ५२ ॥
भीष्म म्हणे त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत[8] नवसा जो- ॥

१ तांबड्या कमलांच्या समुदायानें युक्त व माणकांची ज्यास जमीन आहे अशा सरोवरासारखें सर्व रणभूमीवर रक्ताचे प्रवाह वाहूं लागले, व त्यांत मनुष्यांचीं मस्तकें ( तोडिलेलीं ) तरंगत होतीं, हें तात्पर्य. २ हा शूर ( व ) महाप्रभाव ( अर्जुन ) हो दूर, ओसर ( असें ) रविला म्हणणार, ( त्या ) येणें ( या अर्जुनानें ) विलासिजनें हारसा. प्रभाव कैसा हारविला; हा अन्वय. ३ आश्रित व मित्र यांचें संरक्षण न करण्याचा मार्ग स्वीकारून. ४ यावयाची. ५ ( देव+आपगा+विलाप+अर्थ ) गंगेला पुत्राच्या मरणानें विलाप करावयास लावावें म्हणून. ६ (दुस्तर+अरि+सागरिं)-तरण्यास कठीण अशा शत्रुरूप समुद्रांत. ७ एहि एहि ( ये ये ) ते नमः अस्तु ( तुला नमस्कार असो ). ८ भूत.

होता करीत, तो हा जेविं [1]हरि-हतेभ शांतनव साजो ॥ ५३ ॥
जरि मारिसील मज गति-लाभ, तुजहि कीर्ति-लाभ गुरु तर तो ॥
विश्व-गुरो प्राकृतही तारुनि शरणागतासि गुरु तरतो ॥ ५४ ॥
तूं हरि-सा हरि साचा हरिणीं सुर-सिंधु मीहि पाडस-सा ॥
पाडें, स-साध्वस हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ॥ ५५ ॥
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या [2]दर-रक्त-चक्षुच्या पातें ॥
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दावुनि प्र-तापातें ॥ ५६ ॥
झालों धन्य त्रि-जगीं भास पळ प्राकृतास मारक-सा ॥
त्या प्रभुनें[4] हो केला भस्म स्वातिक्रमेच्छु[5] मार कसा ॥ ५७ ॥
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या मा-धवासि बाहूंनीं ॥
मग दृढ चरणींच मिठी घाली पहिलीच रीति पाहूनी ॥ ५८ ॥
दूर उसळला तेव्हां कोपावेशें मुकुंद कंदुक-सा ॥
राहे उभा प्रभु गमे इभ-सा धृत-चरण भक्त अंदुक-सा ॥ ५९ ॥
पार्थ म्हणे श्री-धर्मा-वरि धरितिल जे असि-प्रति ज्ञाती- ॥
मरतील, त्यजसी कां आयुध न धरिन असि प्रतिज्ञा ती ॥ ६० ॥
मारिन भीष्मातें मी इतरांतेंही भवद्दयाधारें[6] ॥
बा त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रही[7] तया धारें ॥ ६१ ॥
कुरु-कुंजरासि गेला होता यदु-सिंह तो खरा खाया ॥
परते पर तेथूनि प्राण-प्रिय-मित्र-तोख राखाया ॥ ६२ ॥
कृष्ण स्व-रथीं चढतां समर-चमत्कार मग नवा तातें- ॥
दाखविला, वाहों दे न शर-व्रज पूर्ण गगन वातातें ॥ ६३ ॥
भीष्म-शर-व्रज-दावचि पांडव-भट-निकर तो गमे घास ॥
क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायु-वेग मेघास ॥ ६४ ॥
जेविं महा-वात करी अभ्रांचा न लगतां पळ विसकट ॥
[8]स्वतात-शर-व्रात ध्वंसुनि सर्वांसही पळवि सकट ॥ ६५ ॥

१ (हरि+हत+इभ) सिंहानें मारिलेला हत्ती. २ मार. ३ किंचित डोळे लाल करून पाहिलें असतां. ४ महादेवानें. ५ आपली अमर्यादा करण्यास इच्छिणारा. ६ (भवत्+दया+आधारें) तुझ्या कृपेच्या आश्रयानें. ७ (मेरु+अग्र) मेरु—पर्वताचें शिखरही. ८ हे धृतराष्ट्रा तुझा जो तात (बापासारखा) त्याच्या बाणांचा समुदाय. (भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता होता).

बहु वधिले उरले जे ते केले [1]बाहु-ज-प पराभूत ॥
पाहों शकले न जसे श्री-मर-हरि-मंत्र-जप परा भूत ॥ ६६ ॥
तों मावळला दिन-कर होय बहु प्राप्त साध्वस, मग तिहीं- ॥
केला अवहार[2] परि-श्रांतांहीं [3]लंघिताध्व-सम-गतिंहीं ॥ ६७ ॥

---

## द्रोण-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

( म० भा० अ० १६–८४; मोरोपंत अ० १–१० ).

भीष्म शरपंजरीं पडल्यावर **दुर्योधनानें द्रोणाचार्यास** सेनापति केलें. त्यानें **धृष्टद्युम्न** आपल्यास मारण्याकरितांच उत्पन्न केला आहे असें जाणून त्याला मात्र मी मारणार नाहीं असें दुर्योधनाजवळ कबूल केलें होतें. द्रोणाचार्यांचें व पांडवांचें युद्ध चाललें असतां **चक्रव्यूह** नांवाचा व्यूह द्रोणानें रचिला. त्या व्यूहाचा भेद करण्याकरितां अर्जुनाचा मुलगा **अभिमन्यु** हा झटत होता. त्यानें पुष्कळ पराक्रम केला; परंतु शेवटीं **दुःशासनाच्या** मुलानें त्याच्या मस्तकावर तो सावध नसतां गदा घालून त्यास मारून टाकिलें. पुढें **धृष्टद्युम्नानेंही** द्रोणास अन्यायानेंच मारिलें. इत्यादि कथा या आख्यानांत आहे.

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ॥
नसतां धुरंधर वृषभ बाळ-वृष भरें करूनि आ वांके ॥ १ ॥
रवि-रुचिचें तीमागें संपादे स्वल्प काज वातीस ॥
विसरविल काय ? तेज प्रकट करुनि अल्प काजवा तीस[4] ॥ २ ॥
कुरु-राज म्हणे गुरुजी सेना-पति [5]शत्रु-बळ-विरामा व्हा ॥
तुमची आम्हा पळवू अ-हित-मदा जेविं पळवि रामा व्हा ॥ ३ ॥
द्रोण म्हणे सेना-पति होतों, म्हणतोस जरि ; परि स्पष्ट- ॥
धृष्टद्युम्नासि[6] न मी वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट ॥ ४ ॥
मी समर पांडवांसीं करिन हरिन [7]अरि-नराधि-पति-कटकें ॥

---

१ क्षत्रियश्रेष्ठ. २ पसरलेल्या सैन्याचें एकीकरण. ३ लांबून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें ज्यांची ( मंद ) गति आहे अशा. ४ सूर्याच्या कांतीला. ५ शत्रूच्या सैन्याच्या नाशाकरितां अथवा (नाश करणाऱ्या) हें संबोधन समजावें. ६ धृष्टद्युम्न हा आपल्या वधार्थ उत्पन्न झाला आहे, असें द्रोणास माहीत होतें. ( भार. द्रो. प. अ. ७ ). ७ शत्रूकडील राजाचीं सैन्यें.

भट केविं टिकेल इतर गरुड निरखिजेल काय गा चटकें ॥ ५ ॥
गुरु-रथ-वेग अ-सह्यचि झाला त्या [1]विष्णु-पत्र-रथ-वेगा ॥
केला पांच दिवस बहु युद्ध-चमत्कार तो न कथवे गा ॥ ६ ॥
धृष्टद्युम्नें वधिला अ-न्यायें, सकळ सैन्य हळहळतें ॥
गुरु-मरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य [2]हळहळ तें ॥ ७ ॥
धृतराष्ट्र विलाप करी बहु आपण आपणासि निंदुनि घे ॥
स्मृति हरपे, [3]करपेचि न तन्नयनांतूनि अश्रु-बिंदु निघे ॥ ८ ॥
बहु जन बुडवुनि शोकीं दुष्टा दुर्योधना बुडालास ॥
[4]मकरालय लंघाया मत्ता मशका कसा उडालास ॥ ९ ॥
गज [5]गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें ॥
न शकें सोसाया हें वधिला तो केसरी कसा शशकें ॥ १० ॥
[6]मी [6]माझें हें घातक लागो या आजि आग मोहाला ॥
न मनांत [7]अहं-ममताभ्यधिका लोकांचिया गमो हाला ॥ ११ ॥
सांग रण-कथा, काडिल नसतां मनिं मोह काय बाप रडें ॥
वांकेल ताजव्याचें भारावांचोनि काय बा परडें ॥ १२ ॥
संजय म्हणे नृपा मन लावूनि [8]अ-नश्वरीं [8]सुखीं न रडें ॥
हो सावध काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें ॥ १३ ॥
पुत्रास-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा परि सराया- ॥
मोह श्रोत्यांचा मी कथिन [9]गुरु-वरें कथा, परिस राया ॥ १४ ॥
आम्हां अर्जुन-पालित-धर्म-नृप-बलाकडे पहावेना ॥
त्या पांडवांहि कुरु-गुरु रक्षित-कटक-प्र-भा सहावेना ॥ १५ ॥
भट गांठिती भटांतें अहि अहितें जेविं पतग पतगातें ॥
कीं हरि हरितें अत्यद्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत गा तें ॥ १६ ॥
करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ-सिंह-दैत्य-दानवसे ॥

---

१ विष्णूच्या पक्ष्याच्या ( गरुडाच्या ) वेगास. २ विष. ३ ह्याचा कर्ता अश्रुबिंदु. ४ ( मकर+आलय ) समुद्र. ५ गायीच्या उमटलेल्या पावलाच्या पाण्यांत. ६ अहंता व ममता. ७ ( अहं+मम+ता+अभि+अधिका ) अहंता व ममता ह्यांपेक्षां अधिक (मोहक). ८ अक्षय सुखाकडे मन लावून म्हणजे मोक्षसुख प्राप्त करून देणाऱ्या मार्गाकडे मन वळवून. ९ व्यासाच्या प्रसादानें.

मानवसें गमलें न स्नेह कणहि तन्मनीं तदा न वसे ॥ १७ ॥
रविला झांकी गगनीं कुरु-गुरु बहु-शर-भरीं [1]तिमिर विखरी ॥
लीलेनें [2]नर-केसरि लक्ष चिरी, शरभ-रीति मिरवि खरी ॥ १८ ॥
धर्माला गांठाया धांवे तो विप्र[3] कटक विसकटुन ॥
वाटे तदेक-विशिखाहुनि [4]सिंधु-ज-गरल-घट कविस कटु न ॥ १९ ॥
रक्त-नदी वाहविली राया त्या [5]शत्रु-सिंह-शरभानें ॥
केवळ [6]कुरु कटकाचीं [6]हरिलीं विखरुनि [6]अनंत-शर भानें ॥ २० ॥
पार्थाचा प्रलय-घनाधिक दारुण देवदत्त दर वाजे ॥
दरवाजे-से डोळे झांकिति आइकति भीति-द रवा जे ॥ २१ ॥
शर्मा रथ धर्मा धनु बाहू भ्राते [7]सु-पूर्व पांच विती ॥
[8]ज्यां त्यांशि [9]पूतनाशी विजय-विशिख-वृष्टि पळ न वांचविती ॥ २२ ॥
वेष्टा[10] धनंजयाला आत्म-यशें [11]सत्यपांड वेष्टाया ॥
चेष्टा करूं न द्याव्या गोपाला सत्य [12]पांडवेष्टा या ॥ २३ ॥
[13]संशप्तकां नर जसा नर-हरि मारी वि-शृंखळ खळांतें ॥
होय असृक्स्रोतः-शत, वाहे समराजिरीं खळखळा तें ॥ २४ ॥
अरि-कदन जसें अर्जुन कुरु-गुरुहि तसेंचि वीर-कदन करी ॥
मिरवी तयापुढें भट जेविं हरिपुढें बलीहि मद न करी ॥ २५ ॥
कौंतेय[14] गांठिला[15] रण-रंगीं नटउनि महा-भट कबंध ॥
जैसा जल-द समीरें तैसा विसकटुनियां कटक-बंध ॥ २६ ॥
धीर धरुनि धर्म-ज्ञें धीरें धर्में धनुष्य चढवीलें ॥

---

१ अंधार पाडी. २ मोठे वीर-हें चिरी याचें कर्म. ३ ब्राह्मण (द्रोण). ४ समुद्रांतून निघालेला विषाचा कलश. ५ (शत्रुरूप सिंहाला शरभाप्रमाणें असणाऱ्यानें) अर्जुनानें. ६ अन्वय-(व त्यानें) अनंतशर विखरुनि कुरुकटकाचीं केवळ भानें हरिलीं. ७ 'सु' आहे आद्यक्षर ज्यांचें असे म्हणजे सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु. ८ ज्या बाणांस. ९ पूतनाराक्षसीप्रमाणें. १० हें संशप्तकांचें भाषण आहे. ११ (सत्य+प+अंड) ब्रह्मांड. १२ (पांडव+इष्ट) पांडवांस इष्ट असणाऱ्या. १३ त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा व त्याचे अनुयायी ह्या सर्वांनीं युद्धांत अर्जुनास मारूं किंवा आपण मरूं, अशी प्रतिज्ञा केली होती, म्हणून त्यांस एथें संशप्तक ही संज्ञा दिली आहे. १४ कुंतीचा मुलगा-धर्म. गांठिला याचा कर्ता होणारें (अध्याहृत).

दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें ॥ २७ ॥
भीमावरि न गणुनि शर-वृष्टीची झड करी करी[1] लगट ॥
वाटे जनासि काळाचि तो त्याला झडकरी करील गट ॥ २८ ॥
कुरु-कटका तप्त करी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग जगा ॥
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें[2] काळसा मतंगज गा ॥ २९ ॥
देव गजासि[3] म्हणे रे गर्व अयः[4]-स्तंभ-सम-रदा न[5] वहा ॥
हा[6] मत्सख नर सिंहचि वज्रे[7]-धरासह्य-समर दानव-हा[8] ॥ ३० ॥
होय पुढेंचि न मागें पार्थ-शराहतहि[9] शतं-मख-सख[10] सरे ॥
मुनि म्हणति अर्जुनीं तव शक्ति जसी सागरांत खसखस रे ॥ ३१ ॥
प्रकट करूं दे समरीं श्री-देवी जेविं सैरिभास[11] कला[12] ॥
तेविं विजय-चापें[13]-लता मग दवडी दूर वैरि-भा[14] सकला ॥ ३२ ॥
विजयें-विशिखार्त[15] होतां पूर्वी दुष्करहि आयकोन करी[16] ॥
भगदत्तांचें कथिलें अ-धनाचें जेविं बायको न करी ॥ ३३ ॥
तिसरे दिवशीं चक्र-व्यूह सु-दुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥
जो धीर-वीर-हीर-प्रवर-प्रकरें करोनियां खचिला ॥ ३४ ॥
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनीं[17] ॥
परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेविं रत्न-सानु[18] जनीं ॥ ३५ ॥
सौभद्र[19] म्हणे शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, वा ॥
हरि-पोत दंति-यूथीं, कीं दहनीं करुनियां पतंग जवा ॥ ३६ ॥
भीमादि स-बळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया ॥
इकडुनि कौरव-कटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया ॥ ३७ ॥

---

१ भगदत्तानें भीमाच्या अंगावर घातलेला सुप्रतीक नांवाचा हत्ती. २ कौरवांकडील एक योद्धा (राजा). ३ ( भगदत्ताच्या ) हत्तीला. ४ लोखंडाच्या खांबासारखे आहेत दांत ज्याचे असा. ५ वाहूं नको, ( त्याचें कर्म गर्व ). ६ हा अर्जुन. ७ इंद्राला ( ही ) असह्य आहे युद्ध ज्याचें असा, म्हणजे इंद्रापेक्षां बलिष्ठ. ८ दानवांस मारणारा. ९ अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध. १० इंद्राचा सखा ( भगदत्त ). ११ महिषासुरास. १२ युद्धचातुर्य. १३ अर्जुनाचें धनुष्य. १४ शत्रूंचें तेज. १५ अर्जुनाच्या बाणांनीं पीडित. १६ भगदत्ताचा हत्ती भगदत्तानें सांगितलेली दुर्घटही गोष्ट पूर्वी ऐकत होता; परंतु दरिद्र्याची बायको जशी त्याची आज्ञा मानीत नाहीं, तसा जखमी झाल्यावर तो त्यानें सांगितलेलें ऐकेनासा झाला. १७ आपल्या धाकट्या भावांसह. १८ मेरुपर्वत. १९ सुभद्रेचा मुलगा - अभिमन्यु.

रथ थडकले, गडकले हय, शस्त्र-ज वन्हि धडकले वरते ॥
अन्योन्य द्वयंगुलही[1] राहों देती न धड कलेवर ते ॥ ३८ ॥
गावत असतां दोन्ही करुनि सु-तुमुलाहवास[2] वध सेना ॥
व्यूहीं सौभद्र[3] शिरे चिरे हि जयंत वासव प्रसेना ॥ ३९ ॥
प्रभुचा[3] मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा[4] ॥
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा ॥ ४० ॥
अंध म्हणे रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ॥
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ॥ ४१ ॥
न पवे सु-नीतिचें परमार्थाची वाट लेंकरूं[4] काय ! ॥
सत्याचि कथिशी परि हें मज लटिकें वाटलें करूं काय ॥ ४२ ॥
संजय म्हणे म्हण अ-नृत भीष्माचा एकला पणतु मुलगा ॥
कांता झाला गुह-सा बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥ ४३ ॥
कुरु-सैन्यांत गमे ज्यापरि रंभा-काननांत वारा हो ॥
त्या[6] विजय-श्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो[6] ॥ ४४ ॥
अ-क्षत-धनु तांवरि हें वीरशिरो-रत्न नावरायाचें ॥
यास्तव सर्वहि रक्षूं आजि करुनि यत्न नांव रायाचें ॥ ४५ ॥
कर्ण करी चर्माचे श्रित-विघ्नाचे जसे गणं-प टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर वि-शस्त्राहि त्या रण-पटु-कडे ॥ ४६ ॥
त्या सौभद्रावरि बळ-सागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासन-सुत धांवे निज-भुज-भुज-ग-प्रताप मिरवीत ॥ ४७ ॥
युद्ध-चमत्कार रुचिर सु-चिर प्रकटुनि[9] महा-गद[10] आते[11] ॥
अन्योन्य-कृताघातें बा मूर्छा पावले [12]अ-दभ्रा ते ॥ ४८ ॥
आधीं उठोनि उठतां सौभद्र शिरीं [13]प्रभो गदा घाली ॥

---

१ दोन बोटें. २ अत्यंत दारुण युद्धाला. ३ श्रीकृष्णाचा भाचा अभिमन्यु. ४ सुनीति नांवाच्या स्त्रीचा मुलगा ध्रुव. ५ केळींच्या वनांत. ६ त्या नातवा ( अभिमन्यूला ) विजयश्री परिरंभा देउनि कां न राहो ? म्हणजे त्यास जय कां नाहीं मिळणार ? ७ गण-पति. ८ आपल्या बाहूंची सर्पाप्रमाणें चपलता दाखवीत. ९ हा शब्द एथें 'प्रकटवून' याबद्दल घातला आहे. १० गदायुद्धांत प्रवीण. ११ दुःशासनाचा पुत्र व अभिमन्यु. १२ पुष्कळ वेळ असणारी–मोठी. १३ हे धृतराष्ट्रा.

वि-वश[1] करी ती दुष्परि-हार्या जेविं [2]प्र-भोग-दाघाली ॥ ४९ ॥
पडली जशी कराया प्रेक्षक सुर वि-रस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्र-तनुहि ओकुंनि स-रुधिर समस्त कोप रिती ॥ ५० ॥
धर्म म्हणे हा हा म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला ॥
बहु-वीर-सुत दिसल्या अधिक सुभद्रा उमा रमा [3]रविला ॥ ५१ ॥
तुज उत्तरे मुलि दिला म्यां कापायास मान विश्वास ॥
[4]कलि-काल काय बुडविल मज बहु-पापा-समान विश्वास[4] ॥ ५२ ॥
संशप्तक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि म्हणे कां कांपे मन कांपविले जरि स्वयें पर ते ॥ ५३ ॥
कंठ गहिंवरें भरला, शिरली हृदयांत केशवा धडकी ॥
येतें रडें वृथा कां बा माझी प्रकृति काय गा रडकी ॥ ५४ ॥
अ-तुल प्र-ताप लोकीं ज्या [5]खल-बल-जलधि-वाडवाभाचा ॥
तो कृष्णा आज [5]तुझा मज आला कां न आडवा भाचा ॥ ५५ ॥
शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधो-वदन ॥
तें पुत्र-रत्न एकचि न निरखिलें [6]सद्गुणर्द्धिचें मदन ॥ ५६ ॥
[7]मृदुल-प्रकृति न साहे सुत-शोका जेविं न रविला पाला ॥
शिबिरीं करी परोपरि नारायण-मित्र नर विलापाला ॥ ५७ ॥
ज्याचा शस्त्रीं शास्त्रीं व्यवहारीं वासुदेव-वत् समज ॥
काय तुम्हीं केला हो आणुनि तो भेटवाचि वत्सा मज ॥ ५८ ॥
बहुधा तुम्हीं धरुनि [8]गुरु-कृत-चक्र-व्यूह-भेद-कामातें ॥
केलाचि पुढें नाहीं तरि करिता स्पर्श खेद कां मातें ॥ ५९ ॥
तुमच्या भुज-शस्त्रांतें धिक् हा निः-सार[9] हो खटाटोप ॥

१ मूर्छित. २ ( प्र+भोग+द+अघ+आली ) अतिशय दुःख देणारी पातकपंक्ति ३ सूर्य हा जगच्चक्षु आहे, म्हणून त्यास दिसल्या, म्हणजे सर्व जगास दिसल्या हें तात्पर्य. ४ अन्वय–कलिकाल ( कलियुग ) ( अधर्मप्रवृत्तीनें जगताचा मोठा नाश करणारा आहे, तरी तो ) मज बहुपापासमान ( मी जो परम पापी हा जितका बुडवील तितका ) विश्वास (जगतास) बुडवील काय ? ५. शत्रु सैन्यरूप समुद्राला वडवाग्निसारखें तेज आहे ज्याचें अशाचा. ६ उत्तम गुणांच्या समृद्धीचें म्हणजे पुष्कळ उत्तम गुणांचें, ७ कोंवळ्या मनाचा, ८ द्रोणानें रचलेला चक्रव्यूह फोडण्याच्या इच्छेनें. ९ व्यर्थ

शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा लोप ॥ ६० ॥
कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन दुर्दर्श उत्तरा-सदन ॥ ६१ ॥
कां माझें उर न उले कवि पवि कीं म्हणति तोक-शोकाला ॥
लोका लाजे मन कीं जावें यश हारवूनि ओकाला ॥ ६२ ॥
हा वत्सा रक्ताक्षा झाले स्वरसु-गुण आजि घातक-से ॥
बा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ॥ ६३ ॥
मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं विशिख-जाल वितत रणीं ॥
हें न घडतां जळेन ज्वलनीं होतांचि [1]अस्तमित तरणी ॥ ६४ ॥
कृष्णोत्तरा-सुभद्रा-धेनूंच्या मथुनि मोह-यवनातें ॥
भवनातें येउनि तो प्रभु विजयाच्या [2]करी समवनातें [3] ॥ ६५ ॥
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न पळहि निज लागे ॥
चित्तीं चिंतेशि म्हणे त्वां [4]वरिला कोण जडहि निजला [5] गे ॥ ६६ ॥
धर्म म्हणे जें झालें तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या ॥
म्यां व्यूहीं द्वार करीं ऐशी केली स्वयेंचि आज्ञा त्या ॥ ६७ ॥
द्वार करी, शिरतां भी न व्यूहा जेविं सागरा मकर ॥
तुरवी कुमार पर-मद लवहि जसा धरुनि राग राम-कर ॥ ६८ ॥
होय जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास ॥
त्यास न निवारवे बा जेविं प्र-बलास अंतरायास ॥ ६९ ॥
आम्हां त्या क्षुद्र-वरें [6]रुद्र-वरें करुनि वारिलें वाटे ॥
प्रभुनें सौभद्रासि न पांचांसहि आजि मारिलें वाटे ॥ ७० ॥
देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणवुनी ॥
त्यासी वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणवुनी ॥ ७१ ॥
भक्तीं जसा महात्मा देहींहि तसा न दारुका रमला ॥
या [5]विजय-वेद-रचना व्हावा लागे सदा रुकार मला ॥ ७२ ॥

१ अस्त पावलेला. २ (सम्+अवन)–उत्तम रक्षण. ३ अर्जुनानें प्रतिज्ञा घेतल्यावरून त्याचें रक्षण कसें होतें ह्याचा विचार करूं लागला, हें तात्पर्य. ४ ह्या पुस्तकांतील वामनकृत द्रौपदीहरण: पृष्ठ २८५।८६ आर्या ६९।७० पहा. ५ वेदवाक्य जसें उल्लंघितां येत नाहीं तसें अर्जुन जें म्हणतो तें मला मोडतां येत नाहीं, हा आशय.

निज-रक्षणाधिक ध्वज-रक्षण राजासि दारुका पडतें ॥
मोलें राज-शिराहुनि बहु असतें काय दारु कापड[1] तें ॥ ७३ ॥
देव म्हणे अर्जुनजी व्हा सिद्ध रथ-स्थ तपन-कोपार्थें[2] ॥
तें कां न म्हणेल मनीं ब्रह्मपदाद्यर्थें[3] तप नको पार्थें ॥ ७४ ॥
करुनि प्रदक्षिणा द्विज-वृंदासि रथासि तो कविनयानें- ॥
मग वेंघोनि [4]अधिष्ठी, जनकांकीं जेविं तोक वि-नयानें ॥ ७५ ॥
झाला निज-दासाचा ज्या स्तविति सु-धीर विप्र तो दास ॥
श्री-नलिनीचा[5] चक्र त्यजुनि धरि सुधी रवि[5] प्रतोदास ॥ ७६ ॥
पांसु-निकरहि प्रभुच्या हेतु बहु-प्रीतिचा बुकासा च ॥
वाटे न कौस्तुभाला जपला जगदीश चाबुका साच ॥ ७७ ॥
कृष्ण रथीं चढले मग तोहि चढे पुत्र सत्यकाचा[6] हो ॥
जेविं हर-रथीं विधि हरि दुसरा दृष्टांत सत्य काचा हो ॥ ७८ ॥
द्रोणें रचिला सैंधव[7]-रक्षार्थें[8] व्यूह-नायक व्यूह ॥
‘परमार्थ-रक्षण-क्षम [9]अ-परा-जित जेविं काय कव्यूह[10] ॥ ७९ ॥
सेनाग्रीं वाजविती नर-नारायण सखे दर-वरा जे ॥
ते मोर-से, भुजग-से ऐकति होउनि स-खेद रव राजे ॥ ८० ॥
रोमांच-कंचुकाला[11] कडकडतां कृष्ण-कंबु कपि[12] ल्याला ॥
पर सोडी भानाला सिंह-रवें जेविं जंबुक पिल्याला ॥ ८१ ॥
हांसोनि द्रोण म्हणे पार्था मजला न जिंकितां आजी ॥
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे मज-सवें करीं आजी[13] ॥ ८२ ॥
ऐसें वदोनि मार्गण-वृष्टि तयावरि महा-तपा सोडी ॥
जैसी आटोपाया मत्त-गज-शिरीं महात पासोडी ॥ ८३ ॥
मारुति सात्यकि धृष्टद्युम्न तसे कुरु-बळासि तुडवीती ॥
कु-नृपति-राष्ट्रांसि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती ॥ ८४ ॥

---

१ ध्वजाचें लाकूड व वस्त्र. २ सूर्यास राग आणावा म्हणून; म्हणजे तूं सूर्यापेक्षां तेजस्वी दिसलास म्हणजे त्यास राग येईल. ३ (ब्रह्म+पद+आदि+अर्थ) सत्यलोकादिकांच्या प्राप्त्यर्थ. ४ बसे. ५ श्री (लक्ष्मी) हीच कमलिनी, तिला रविच (कृष्ण). ६ सात्यकि. ७ सिंधु देशाचा राजा (जयद्रथ). ८ सुरस अर्थ अथवा मोक्ष ह्यास राखण्याविषयीं समर्थ. ९ अबाध—सर्वांस मान्य. १० (कवि+ऊह) कवींची कल्पना. ११ अंगी, बिलखत. १२ मारुति. १३ युद्ध.

द्रोण न थारे[1] क्षण पर-कटकांत जसा न रुद्र थारावा ॥
तच्चाप-रवा पांडव भीति जसे अहि गरुद्रथारावा[2] ॥ ८५ ॥
इषुंनीं झांकुनि घेती ते करुनि छत्र-केतु विध्वस्त ॥
तो [3]अ-प्रकाश त्यांचा आस कुमुद-खेद-हेतु विध्वस्त[3] ॥ ८६ ॥
अरि एक कोश पुढें लक्षुनि[4] ज्या ज्या शरा विजय सोडी- ॥
कोश पुढें गेल्यावरि मागें तो तो तदीय शिर तोडी ॥ ८७ ॥
श्वश्रू-कर जेविं शिरे गेहिं जरी न म्हणती सुना सीर ॥
व्यूहीं तेविं कुरु-चमु धिक्कारुनि तो धरा-सुनासीर[5] ॥ ८८ ॥
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं ॥
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ॥ ८९ ॥
त्या समयीं पार्थ म्हणे देवा [6]संश्रित-शुभाकरा वाजी- ॥
श्रमले कीं श्रम-शमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी ॥ ९० ॥
उतरे रथावरुनि नर पळवी कुरु-कटक कृत-पराभव तें ॥
करि निर्गजुप्य मंडल तो एक कोश आपणा-भवतें ॥ ९१ ॥
स्वस्थ-त्यांसें क्रीडे कुरु-बळ-पंक-ज-वनांत पार्थ-करी ॥
मंत्र-बळें सु-सरोवर निर्मुनि शर-गृह [7]अनातपार्थ करी ॥ ९२ ॥
शर जेविं किरण भवतें जें कौरव-कटक तोचि परि-वेष ॥
रविच कवि-मतें अर्जुन तेजें रूपेंहि, भिन्न परि वेष ॥ ९३ ॥
निः-शंक कुरु-बळीं नर जेविं हरि-शतावृतींहि शरभ वनीं ॥
पवीं शिवालयींसा शिरला देवर्षि शीघ्र [8]शर-भवनीं ॥ ९४ ॥
प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनियां हळूच कौशल्यें ॥
निज-बोधें[9] श्रित-हृद्गत-दुःखेशीं सकळ काढिलीं शल्यें ॥ ९५ ॥

१ स्थिर झाला नाहीं म्हणजे शत्रुसैन्यास अत्यंत दुःसह झाला; हें तात्पर्य. २ (गरुद्रथ+आरावा) गरुडाच्या शब्दास. ३ बाणांनीं झांकल्यामुळें त्यांचें अदर्शन, हें भासरूप कुमुदांच्या खेदास कारणीभूत. (विधु+अस्त)-चंद्रास्तच झाला. ४ अर्जुनाच्या रथाचा वेग इतका होता कीं, शत्रु एक कोसभर दूर असतां त्याला मारण्याकरितां अर्जुन जो बाण सोडी तो त्या शत्रूचें शिर तोडीत आहे तोंच तो रथ त्या शत्रूच्यापुढें एक कोसभर जाई. ५ पृथ्वीवरील इंद्रच (अर्जुन). ६ (संश्रित+शुभ+आकरा) आश्रितांच्या कल्याणाची खाणच-अशा देवा. ७ (अन्+आतप+अर्थ) ऊन न लागावें म्हणून. बाणांच्या गृहांत ९ परमात्मस्वरूपज्ञानानें.

अश्व पर-शरांहीं भव-तापांहीं जेविं दास पोळविले ॥
ते देवें भक्ति-रसें जाणों स्व-चरण-रजांत लोळविले ॥ ९६ ॥
देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे हा सु-योधना कुटिला ॥
भक्ति-बळेंचि पहां हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ ९७ ॥
ज्याचें पद-नख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो- ॥
भगवान् स्वयें अहा या विजय हयां [1]सत्पदांस तेविं [1]धुतो ॥ ९८ ॥
ज्याच्या श्री-पद-दास्यें पावे तोखा सदा रमा-जाया ॥
हरितो मना नराचा [2]होउनि तो खासदार माजा या ॥ ९९ ॥
पुरुषार्थ-द ते केले [3]दास-हय-हितोदया कर खरा रे ॥
झालासि दास-दास प्रभुही तूं बा दया-कर खरा रे ॥ १०० ॥
प्रेमें माता बाळा न्हाणी कीं भक्त शंभुच्या लिंगा ॥
तैसाचि नर-हयां हरि कवि हो याचेचि पाय आलिंगा ॥ १०१ ॥
औषध सु-चणक कल्पी [4]पीत-पट पसाहि तोबरा माप ॥
श्रित-साहित्य कराया न बरा मंदार[5] तो बरा [6]मा-प ॥ १०२ ॥
हरि हरित-तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्र-ताप दुर्वार ॥
[7]हरि [7]हरि तई करिति पद देउनि गणपति-शिरीं हि दुर्वा र[8] ॥ १०३ ॥
तोक-तृषा-शमना कीं क्षालाया तात तोक-मल पाणी- ॥
प्यायाचें ही वेंची, करि न पिउनि तेंचि तो [9]कमल-पाणी ॥ १०४ ॥
उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न नीच तुरगांनीं ॥
ज्यां पूजी तो ज्याचें यश [10]नंदन-काननीं चतुर-गानीं ॥ १०५ ॥
योजुनि तुरग-वर रथीं आपण कुरु-बळ पहात देव रिघे ॥
मग वि-जयातें मर्दुनि रडवाया [11]खळ-प हात दे, वरि घे ॥ १०६ ॥

१ तो ( कृष्ण ) साधूंचे पाय धुवावे त्याप्रमाणें. २ नराचा ( अर्जुनाचा ) खासदार होऊन या माजा ( माझ्या ) मना हरितो ( हें नारदाचें म्हणणें आहे ). ३ ( आपल्या ) दासाच्या घोड्यांच्या ( हित+उदय ) कल्याणासाठीं. ४ पीतपट ( पीतांबर ) हाच तोबरा, व पसा हेंच माप. ५ कल्पवृक्ष. ६ लक्ष्मीपति. ७ हे उद्गारबोधक शब्द. ८ र ( रडुन ). ९ कृष्ण. १० ज्या कृष्णाचें, यश नंदनवनांत चतुरगानीं ( चतुरांच्या गायनांत ) आहे तो ( कृष्ण ) ज्यां पूजी ( ज्यांची सेवा करितो ) त्या तुरगांनीं इत्यादि. ११ गड्डावुळ.

## कर्ण-पर्वांतील कर्णार्जुन-युद्धाच्या आर्या.

( म० भा० अ० ३१-९१ मोरोपंत अ० २०-४९ )

**द्रोणाचार्य** मरण पावल्यावर **कर्ण** हा कौरवांच्या सैन्याचा सेनापति झाला. नंतर कर्णानें **दुर्योधनास** सांगितलें कीं जर **मद्र** देशाचा राजा **शल्य** हा माझें सारथ्य करील तर मी अर्जुनाचा समाचार घेईन. आज युद्धांत तो मला मारील किंवा मी त्याला मारीन. हें ऐकून दुर्योधन राजा शल्याच्या शिबिरांत गेला व कर्णाचा सारथि होण्याविषयीं त्यानें त्याची प्रार्थना केली. तें ऐकून शल्यास फार राग आला. परंतु दुर्योधनानें फारच विनवणी केल्यामुळें अखेरीस त्यानें मी कर्णाचें सारथ्य करितों असें कबूल केलें. परंतु माझी अट अशी आहे कीं मी कर्णास युद्धाच्या प्रसंगीं हवें तें बोलेन त्याचा राग त्यानें मानूं नये. अशा अटीलाही कर्ण व दुर्योधन हे दोघे कबूल झाले. शल्यानें रथ तयार करून आणल्यावर त्यांत कर्ण बसून युद्धास गेला. युद्धाचे वेळीं शल्यानें कर्णाची फार निर्भर्त्सना करून त्याचा उत्साह-भंग केला तरीही त्यानें मोठें शौर्य केलें. सरतेशेवटीं रथाचें चाक पृथ्वींत गेलेलें वर उचलीत असतां अर्जुनानें त्यास मारिलें अशी कथा या आख्यानांत दिलेली आहे.

**कर्ण म्हणे कुरु-नाथा, पार्थाशीं संगरांगणामाजी ॥**
**घालीन गांठि त्यातें मी कीं मारील तो मला आजी ॥ १ ॥**
**कार्य-बहु-त्वा-साठीं गांठि न पडली तया-सवें मागें ॥**
**त्वां आम्हा दोघांचीं आजि पहावीं बळें महा-भागें ॥ २ ॥**
**मी जिष्णुतें न वधितां आजि न मागें फिरेन हे वाचा- ॥**
**साची असो, असावा निश्चयचि तुझा मनुष्य-देवाचा ॥ ३ ॥**
**अश्वाच्या हृदयाचा ज्ञाता कृष्णा-समान कौशल्य ॥**
**जाणतसे जरि माझें सारथ्य करील आजि हा शल्य ॥ ४ ॥**
**तरि मी धनंजयाधिक होइन तुज जय घडेल अ-भ्रांत ॥**
**मग मज [1]पार्थांत सु-कर जैसा क्षुब्धानिळासि [2]अभ्रांत ॥ ५ ॥**
**तेव्हां म्हणे सु-योधन हें आहे सर्व सिद्ध मी आंगें- ॥**
**चालेन तुझ्या मागें मज भक्ताला अभीष्ट तें सांगें ॥ ६ ॥**

१ ( पार्थ+अंत ) अर्जुनाचा वध. २ ( अभ्र+अंत ) मेघांचा नाश-ढग उडवून टाकणें.

ऐसें बदोनि गेला वि-नयें शल्या-समीप मग राजा ॥
प्रणयेंकरूनि त्यातें प्रार्थी साधावया महा-काजा ॥ ७ ॥
सत्य-व्रता समर्था मद्राधीशा[1] महा-रथा साधो ॥
वंदूनि विनवितों बा तुझ्या प्रसादेंचि कार्य हें साधो ॥ ८ ॥
पदर पसरिला तुजला रिपु-गज-पंचानना नृपां-माजी ॥
व्हावें प्रसन्न मजला द्यावा वर एक याचका आजी ॥ ९ ॥
वर-दा त्वां कर्ण-वचन केलेंचि श्रवण सु-प्र-बुद्धा तें ॥
स-फळ करीं पार्थाशीं व्हावा अंगेंद्र[2] योग्य युद्धातें ॥ १० ॥
बा वासुदेव-सम तूं जाणसि सारथ्य-कर्म नर-नाथा ॥
तुजसम पटु अन्य नसे म्हणवुनि मी ठेवितों पदीं माथा ॥ ११ ॥
ब्रह्मा[3] महेश्वराचा[3] झाला कीं जेविं कृष्ण त्रि-जयाचा ॥
सारथि तूं कर्णाचा हो वर-दा हेतु मुख्य वि-जयाचा ॥ १२ ॥
तो कृष्ण संकटीं त्या पार्थातें रक्षितो यथा राया ॥
तूं कर्णातें रक्षीं हो सेतु स्व-यश-तोय थाराया ॥ १३ ॥
बल अल्प पांडवांचें परि त्यांहीं फार मर्दिलें सैन्य ॥
आतां निज-पक्षींचे दोघे योद्धे तुम्ही हरा दैन्य ॥ १४ ॥
अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा, ॥
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्य-बळ-पयो-निधिचा ॥ १५ ॥
शल्य सु-योधन-वाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे- ॥
आ-रक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे ॥ १६ ॥
मग कुरु-राजासि म्हणे राया अव-मानितोसि बाहूनी ॥
म्हणसी सोडुनि धनु शर, धरिं हय-रश्मि प्रतोद बाहूंनीं ॥ १७ ॥
करिशी बहु प्रशंसा या नर-वर-मंडळांत कर्णाची ॥
सांगसि सारथ्याची पदवी मजलागिं हीन-वर्णाची ॥ १८ ॥
सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच ॥
इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच ॥ १९ ॥
युद्धीं दुर्बळ मी हें गमलें तुज म्हणवुनीच भू-पा हें- ॥

---

१ (मद्र+अधीश) मद्रदेशाच्या राजा (शल्या). २ अंगदेशचा स्वामी-कर्ण.
३ शंकरानें जेव्हां त्रिपुरासुर मारिला, तेव्हां ब्रह्मदेव त्याचा सारथि झाला होता, अशी कथा आहे.

सारथ्य योजिलें तरि दे दावुनि भाग[1], शक्ति तूं पाहें ॥ २० ॥
सांग मला भाग तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा ॥
अथवा एकचि मी रिपु-बळ मर्दिन दे मला रणादेशा ॥ २१ ॥
हे दास, सूत, बंदी यांहीं आम्हां नृपांसि वानावें ॥
सारथि होउनि उच्चें जो नीच रथी तदुक्त मानावें ? ॥ २२ ॥
हो म्हणसी सूताचा सुत भला गा भला मला पदवी- ॥
देसी, हे सीमा तव सु-ज्ञ-पणाचीच हें असें वदवी ॥ २३ ॥
जातों गृहासि झालों कृत-कृत्य प्राप्तमोक्ष-सम यज्ञ ॥
प्रेक्षुनि धालों कीं तूं धृतराष्ट्र-सुता गुण-ज्ञ समय-ज्ञ ॥ २४ ॥
ऐसें वदोनि मग नृ-प वीर-समाज त्यजूनि करि गमन ॥
आटोपेना त्याचें त्यासहि [2]अप-मान-कोप-करि-ग मन ॥ २५ ॥
तेव्हां धांवे कुरु-वर दीर्घ दृढ प्रेम-बाहु-पाशातें ॥
पसरोनि शीघ्र कवळी नमुनि म्हणे न करिं वंध्य आशातें ॥ २६ ॥
शत्रूंच्या हृदयीं तूं शल्य म्हणुनि शल्य म्हणति तुज राया ॥
कुब्जसि कृष्ण-सा तूं पटु मज्जय-सिद्धि-लागिं उजराया[3] ॥ २७ ॥
बहु वि-क्रम कर्णाचा न्यून परा-क्रम तुझा असें न मनीं ॥
असतें जरि तरि माझें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं ? ॥ २८ ॥
कर्णाहुनि मजहुनि तूं अधिक अधिक यादवाधिपाहूनी ॥
व्हावें प्रभो वर-प्र-द मज आजि [4]परा-भवाधि पाहूनी ॥ २९ ॥
हय-हृदय कृष्ण जाणे त्याहुनि तूं द्वि-गुण जाणसी माम्या ॥
भुज-युद्धीं हि परिसिली न बळाची तुझिच आण सीमा म्यां ॥ ३० ॥
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं म्हणूनि सारथि-ता ॥
स्व-गुण न लोपीं[5] प्रगटीं, वरिली विधिनें हि शंभु-सारथि-ता ॥ ३१ ॥
शल्य म्हणे राया मज राज-समूहांत हात जोडोनी- ॥
म्हणसी कृष्णाधिक हें दुर्लभ यश जात नाहिं सोडोनी ॥ ३२ ॥
झालों प्रसन्न तुज, मी वर देतों घे करीन सारथ्य ॥
पथ्य अ-पथ्य न म्हणतां परि सोसावें मदुक्त हें तथ्य ॥ ३३ ॥

१ नेमून दिलेलें काम  २ अपमानामुळें आलेला राग हाच हत्ती त्यावर बसलेलें. ३ चांगल्या प्रकाशाला आणण्याला. ४ (पराभव+आधि) पराभवापासून होणारें मनाचें दुःख. ५ हें एथें लोपवीं ह्या अर्थी योजिलें आहे.

सारथि होतों परि मी प्रभु सूतातें[1] म्हणेन कां हां जी ॥
गांजीन तरि सहावें, म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी ॥ ३४ ॥
कर्ण सु-योधन म्हणती केलें मान्य त्वदुक्त बापा हें ॥
अंगी-कृत कार्याच्या निर्वाहीं सु-यश तूंहि घा पाहें ॥ ३५ ॥
शल्यें सारथ्याचा केला स्वीकार तेधवां यास- ॥
कुरु-पति कथि इतिहास त्रि-पुराचा चित्त हृष्टवायास[2] ॥ ३६ ॥
सूत-कुळांत न झाला मज वाटे देव-पुत्र हा कर्ण ॥
क्षत्र-कुळींच उपजला हें याचा स्पष्ट सूचवी वर्ण ॥ ३७ ॥
लोकांत प्रगट न हो कुल-कारण एक हेंचि सत्य जिला ॥
झाला तिनें उपजतां बाळपणीं करुनि साहस त्यजिला ॥ ३८ ॥
हा दीर्घ-भुज स-कुंडल कवच उपजतांचि बाळ-भास्कर-सा ॥
प्रसवे न यासि राधा प्रसवेल सुधाकरासि काय रसा ॥ ३९ ॥
अजि सिंधु-शुक्ति-गर्भीं मौक्तिक उपजे, नदींतही असती- ॥
पुष्कळ शिंपा तरि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसती ॥ ४० ॥
राधा धात्रीच गमे कर्णाच्या न जननी शरीरा या ॥
सांगा जी व्याघ्रासि प्रसवेल मृगी कधीं तरी राया ॥ ४१ ॥
हा प्राकृत पुरुष नव्हे सांगावें काय म्यां तुला कविला ॥
कर्णाच्या तेजें बहु वीरां-करवीं स्व-गर्व टाकविला ॥ ४२ ॥
सारथि होय पितामह रुद्राचा जेविं तूंहि कर्णाचा ॥
लाजो तुला सु-रथ-हय-गुण धरितां बंधुही[3] सु-पर्णाचा ॥ ४३ ॥
सारथि अधिक रथीहुनि असतांचि घडे जय प्रजा-पाळा ॥
पाळा कर्णासि तुम्ही घालू कंठांत कीर्ति मणि-माळा ॥ ४४ ॥
पार्थातें कृष्ण तसा कर्णातें तूंहि संगरीं रक्षीं ॥
त्वां मारुतें करावा कर्ण-बळाग्नि प्रदीप्त रिपु[4]-कक्षीं ॥ ४५ ॥
शल्य अवश्य म्हणे तों कर्ण म्हणे तूं यथोक्त रथ कल्पीं ॥
मद्र-पते निजवूं[5] दे सत्वर भीमानुजासि शर-तल्पीं ॥ ४६ ॥
शास्त्र-प्रोक्त-विधानें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें ॥
जेविं मनोरथ साक्षात् केला दैवोंचि सिद्ध वात्सल्यें ॥ ४७ ॥

१ सारथ्याच्या कुळांत झालेल्या कर्णास. २ आनंदित करण्याकरितां. ३ गरुडाचा भाऊ-अरुण. ४ शत्रुरूप तृणांत. ५ बाणांच्या अंथरुणावर निजवूं दे म्हणजे मारूं दे.

शल्य बसे मग बैसे वैकर्तन[1] निज-रथीं जसा तरणी ॥
पाहुनि शोभा मानिति जन कीं केलाचि पार्थ-घात रणीं ॥ ४८ ॥
धर्म धरावा किंवा मारावा पार्थ वर मला दे हा ॥
अथवा पांचहि मारी वि-[2]जय-श्री-शुद्ध-कीर्तिच्या गेहा[2] ॥ ४९ ॥
ऐसें वदे जयार्थी नृप त्यासि म्हणे अवश्य तो कर्ण ॥
झाला सिद्ध महात्मा वाराया सर्व आर्त-लोकर्ण[3] ॥ ५० ॥
हर्षे शल्यासि म्हणे मद्राधीशा वर-प्र-तापा हूं ॥
प्रेरीं वाजी आजी त्वद्दर्शित यान-शीघ्र-ता पाहूं ॥ ५१ ॥
मारीन पांडव रणीं शल्या निश्चयचि जाण तें जित कीं ॥
शस्त्रें धरितिल खंडिन माझे अति-तीव्र बाण तेजित[4] कीं ॥ ५२ ॥
शर-वृष्टिनें धनंजय शांतीतें पाववीन मी थोर ॥
घन-वृष्टि-रसीं सादर आजि रणीं या करोन कुरु-मोर ॥ ५३ ॥
शल्य म्हणे सूत-सुता कां गा अव-मानिशी सु-भव्य जना ॥
वंश-जहि शूर्प न गुणें लंघी सभ्यादृता शुभ व्यजना ॥ ५४ ॥
न विलोकिला धनंजय म्हणवुनि ऐसें यथेष्ट बोलवतें ॥
न लवे वेतस-शिर परि येतां गुरु-पूर तें किं हो लवतें ॥ ५५ ॥
मद-भूत ग्रस्ता तुज धर्मात्मा सिद्ध-मंत्र पाहील ॥
साधुपुढें मोह तसा क्षणभरिहि न हा प्र-लाप राहील ॥ ५६ ॥
कर्ण अनादरुनि वचनें शल्यासि म्हणे सु-शीघ्र हय हाकीं ॥
आकर्षिला कृतांतें चुंबक-मणिनेंच जेविं अय[5] हा[6] कीं ॥ ५७ ॥
कर्ण म्हणे शल्या गति भीष्माची शत्रुंनीं तशी केली ॥
गुरुहि अ-धर्मे वधिला विजय-श्री ओढुनी बळें नेली ॥ ५८ ॥
पार्थ-प्र-ताप साहे आहे मजवेगळा असा कोण ॥
गंगा-सुत वृद्ध भला तो ब्राह्मणही पुरातन द्रोण ॥ ५९ ॥
माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्र-सुतें तदर्थ साधीन ॥
त्याविषयीं प्रिय-भोगासह जीवित करिन अंत-काधीन ॥ ६० ॥
इत्यादि आत्म-वि-क्रम जेव्हां स्व-मुखें यथेष्ट कर्ण वदे ॥

१ विकर्तन म्हणजे सूर्य त्याचा मुलगा—कर्ण. २ विजयलक्ष्मीपासून होणारी जी निर्मळ कीर्ति तिचें स्थानभूत अशा कर्णा. ३ ( आर्त+लोक+ऋण ) आर्तांचें ऋण. ४ तेजस्वी, प्रखर. ५ लोहचुंबकानें. ६ कर्ण.

शल्य तया उत्तर दे उग्र जसें विष हरासि अर्णव दे ॥ ६१ ॥
नर-वर अर्जुन कोठें पुरुषाधम सूत-पुत्र तूं कोठें ॥
वाचाळा नाचावें, सत्स्तवनीं न स्व-वर्णनीं ओठें ॥ ६२ ॥
तुज नित्य [1]घोष-यात्रा-स्मरण असावें परंतु हा मद तों ॥
आहेचि वि-स्मृतीचें बीज म्हणुनि लेशमात्र मी वदतों ॥ ६३ ॥
तूं प्रथम पळालासि प्राण-क्षय-भय धरूनि मनिं मागें ॥
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन [2]ख-चर-नायकें रागें ॥ ६४ ॥
बद्ध-वि-मुक्त सु-योधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला ? ॥
राधेय अन्य तूं तो अन्यचि जाणों पळोनि जो गेला ॥ ६५ ॥
त्या गो-ग्रह-प्रसंगीं भीष्म-द्रोणादि सर्व एकानें ॥
केले भग्न दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें ॥ ६६ ॥
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया कां न जिंकिला शस्त्रें ? ॥
अस्त्रें गेलीं होतीं कोठें नेलीं हिरोनि जैं वस्त्रें ॥ ६७ ॥
झालें युद्ध उप-स्थित आजि पळेनासि जरि तुला पार्थ- ॥
मारील निश्चयें हें कर्म करिशि निज-वधू-विलापार्थ ॥ ६८ ॥
ऐसें सज्जन-संमत हित, सत्य, श्लाघ्य, जें वदे शल्य- ॥
कर्णाच्या कर्णा दे दुःख तसें तसही न दे शल्य ॥ ६९ ॥
कर्ण म्हणे गा शल्या मागील कथा कशास जरि आजी- ॥
मज जिंकील तरि खरें तव [3]कत्थन. शीघ्र चालवीं वाजी ॥ ७० ॥
शल्य म्हणे बहु बरवें पार्थाशीं गांठि घालितों तूर्ण ॥
ईश्वर-वरानुकूलें दैवें होतात कामना पूर्ण ॥ ७१ ॥
यापरि बोलत जातां पांडव-पृतना विलोकिली दूर ॥
कोठें अर्जुन ऐसें सादर ज्या त्यासि तो पुसे शूर ॥ ७२ ॥

---

१ घोष-गौळवाडा त्याप्रत यात्रा-गमन. पांडव द्वैतवनांत असतां त्यांस आपलें वैभव दाखवावें म्हणून दुर्योधन हा, कर्ण, शकुनि वगैरे मंडळी व चतुरंग सैन्य बरोबर घेऊन, तेथें असणाऱ्या आपल्या गायी पाहण्याच्या मिषानें त्या वनांत गेला. तेथें क्रीडा करण्याकरितां चित्रसेन गंधर्व आला होता. त्याचें व दुर्योधनाचें कांहीं कारणावरून युद्ध झालें, त्यांत कर्ण पळाला व चित्रसेन दुर्योधनाला बांधून स्वर्गलोकीं नेऊं लागला असतां अर्जुनानें त्यास सोडविलें. या सर्व प्रकरणास घोषयात्रा असें म्हणतात.
२ चित्रसेन गंधर्वानें. ३ बडबड.

कर्ण म्हणे सुखवाया भू-प-सखा करुनि शत्रुचें निधन ॥
सांगेल पार्थ मज जो देइन मागेल जें तयासि धन ॥ ७३ ॥
शल्य म्हणे राधेया वांटिशि धन कां कुबेरसा अ-ज्ञा ॥
पार्थ पहाशील सुखें व्यय-वेत्ते वित्त वंचिती यज्ञा ॥ ७४ ॥
कंठीं बांधोनि शिळा बाहु-बळें जेंवि सागरीं तरण ॥
कीं [1]भृगु-पतन तसें हें जें तूं करणार त्या अरींत रण ॥ ७५ ॥
व्यूह रचोनि सकळ नृ-प बंधु सुत सु-योधनादिकांसहित ॥
पार्थाशीं युद्ध करीं जरि म्हणसी स्व-जय हो न हो अ-हित ॥ ७६ ॥
कर्ण म्हणे शल्या मी स्व-भुज-बळें प्रार्थितों रणीं पार्था ॥
हे[2] प्रभु सहाय असतां साधीना कर्ण कोणत्या स्वार्था ॥ ७७ ॥
तूं निश्चित हित-शत्रु स्तविशी पडिपडि स-धर्म-भीमातें ॥
साच्युत-धनंजयातें तूं देऊं पाहतोसि भी मातें ॥ ७८ ॥
य: दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ॥
मर्त्यांची काय कथा प्राकृतरा काय कर्ण हा गमला ? ॥ ७९ ॥
शल्य म्हणे राधेया जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मांतें ॥
अर्जुन तीव्र शरांनीं समरीं भेदील सर्व मर्मांतें- ॥ ८० ॥
तव्हां पश्चात्तापा बापा तूं पावशिल पापानें ॥
सापानं धरिला प्लव[3] ग जगे बडबडसि तूं जसा पानें[4] ॥ ८१ ॥
तूं विजयासि वधाया वांछिसि हें कोण जाणता साहे ॥
[5]अंबांक-स्थित शिशु शशि-मंडळ कवळावया जसा पाहे ॥ ८२ ॥
शव-मांस-मत्त जंबुक तूं [6]गज-मुक्ताश सिंह तो जिष्णु ॥
तूं शशक, पार्थ गज-पति, कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु ॥ ८३ ॥
स्व-बिल-स्थ कृष्ण-सर्पा काष्ठें टोंचोनि खवळिशी कां गा ॥
तीव्र त्रिशूळ-वदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा ॥ ८४ ॥
पार्थ-पयो-धर गर्जे स्पर्धा मंडूक तूं वृथा धरिशी ॥
त्याच्यापुढें टुरुटुरू टरोंटरों शब्द हे किती करिशी ॥ ८५ ॥
श्वान स्व-पोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे ॥

१ पर्वताच्या कड्यावरून पडणें. २ हे माझे समर्थ (बाहु). ३ मंडूक. ४ मद्यप्राशनानें. ५ (अंबा+अंक+स्थित) आईच्या मांडीवर बसलेला. ६ (गज+मुक्ता+आश) हत्तीच्या गंडस्थळांतील मोत्यें खाणारा.

जिकडे धनांत गर्जे शार्दूल तथा दिशेकडे पाहे ॥ ८६ ॥
भुंके बळें यथेष्ट व्यथित करी [1]निकट-वर्ति-जन-कर्णा ॥
अर्जुन दृष्टि न पडला तोंचि तसा भुंकतोसि तूं कर्णा ॥ ८७ ॥
शश-मंडळांत कोल्हा म्हणतो मी सिंह वल्गना करितो ॥
जोंवरि न पाहिला गज-मुक्ता-फळ-कवळ भक्षिता हरि तो ॥ ८८ ॥
कर्ण म्हणे गुणवद्गुण जाणे गुणवंत अ-गुण नेणेची ॥
प्रसवे[2] तीच अभिज्ञा शल्या तैसी न वांझ वेणेची[3] ॥ ८९ ॥
मी आपणासि जाणें जाणें त्या जिष्णुलाहि तत्त्वानें ॥
तैसें न जाणिजे त्वां इतरें बा [3]सत्त्व-हीन सत्त्वानें ॥ ९० ॥
पार्थ-वधाचें साधन आहे तें सांगतों तुला जेणें- ॥
आज [4]द्वैरथ-युद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें ॥ ९१ ॥
आहे [5]अहि-मय सायक मृदु-चंदन-चूर्ण-पूर्ण भात्यांत ॥
त्यावांचुनि शर दुसरा नाहींच क्षोणि-वल्लभा त्यांत ॥ ९२ ॥
तो [6]आहेय शरोत्तम सोडुनि मी मेरुतेंहि फोडीन ॥
कवचाची काय कथा पार्थी कीं केशवींच सोडीन ॥ ९३ ॥
तूं झालासि कु-दर्शी संगर-पांडित्य काय तुज ठावें ॥
शल्या, कल्याण-गुणा पात्र जगीं पुण्य-संग्रहें व्हावें ॥ ९४ ॥
भ्यालासि मूढ-बुद्धे बडबडसी फार वानिसी अरिला ॥
भाव तुझा मज कळला धीर तुझा मृत्युच्या भयें हरिला ॥ ९५ ॥
ते मारितील मज कीं त्यांला मारीन मी स्व-बळ जाणें ॥
कृष्णांला कर्ण न भी तनु टाकुनि एकदां असे जाणें ॥ ९६ ॥
दोघांची काय कथा जरि कृष्णार्जुन सहस्र येतील ॥
तरि माझे शर त्यांच्या प्राण-धनातें हिरोनि घेतील ॥ ९७ ॥
तुज भेदिलें परांनीं स्पष्ट म्हणुनि बोलसी असें खोटें ॥
सर्वा पापांमध्यें हें मित्र-द्रोह-पाप मज मोठें ॥ ९८ ॥

---

१ जवळ असणाऱ्या मनुष्यांच्या कानाला. २ प्रसववेदनेची ( बाळंतीण होण्याच्या वेळच्या दुःखाची ) जाणणारी. ३ बुद्धिरहित प्राण्यानें. ४ रथ्यांच्या द्वंद्वयुद्धांत. ५ सर्परूप—अग्नीनें अर्जुनाच्या मदतीनें खांडववन जाळलें त्यावेळीं त्यानें सर्व तक्षककुळ जाळलें. फक्त तक्षकाचा पुत्र अश्वसेन हा वांचला. तो ह्या वेळीं अर्जुनाला मारावें ह्या हेतूनें कर्णाच्या भात्यांत बाणरूपानें येऊन राहिला होता, अशी कथा आहे. ६ सर्पांचा.

मज युद्धाभिप्रायापासुनि मार्गें बळेंचि फिरवील- ॥
ऐसें भूत नसेचि त्रि-जगीं जें ह्या यशास मिरवील ॥ ९९ ॥
भ्याडासि भेडसावीं मी भ्याया उपजलों नसें कांहीं ॥
वि-क्रम-यश साधाया झालेंसें चाल पथ पुढें पाहीं" ॥ १०० ॥
शल्य म्हणे रे सूता बडबड करितोसि फार मद्य-प-सा ॥
गुरु-सागर बहु गर्जे परि मुनिचा एकही भरे न पसा ॥ १०१ ॥
तेव्हां दुर्योधन नृ-प निज-कार्याचा न व्हावया घात- ॥
कर्णास मित्र-भावें वारी शल्यासि जोडुनी हात ॥ १०२ ॥
नृप-बहु-मानें झाले अति वाद त्यजुनि उप-रमा वरिते ॥
मग [१]हरिवर करि-वरसे गेले दोघे [२]नरोत्तमावरि ते ॥ १०३ ॥
कर्ण [३]त्रि-दश-गुरु-मतें रचुनि महा-व्यूह तन्मुखीं ठाके ॥
बार्हस्पत्य-व्यूहा पाहुनि बहु धर्म तो मनीं धाके ॥ १०४ ॥
भू-प म्हणे तूंचि करीं कर्णाशीं युद्ध उद्धरीं कांटा ॥
भांडो सु-योधनाशीं भीम, तयाचाचि तो असे वांटा ॥ १०५ ॥
अमृत-रसाची धारा धर्माची श्वेत-वाह[४] आज्ञा पी ॥
होय पुढें, सैन्यातें ऐसें वर्तो म्हणोनि आज्ञापी ॥ १०६ ॥
शल्य म्हणे राधेया तो येतो जिष्णु विष्णु-सम-शील ॥
गरुडीं कालीय तसा ज्यावरि तूं कोप-गरळ वमशील ॥ १०७ ॥
कर्णा पुससी ज्याला आला तो पार्थ दाव-पावक-सा ॥
वधितो मृगांसि हरि-सा सोसेल परांसि तत्प्रभाव कसा ॥ १०८ ॥
तुजशीं धनंजयाशीं गांठि पडाया नकोचि बहु वेळ ॥
पाहीन मी तयाचा आणि तुझाही रणांगणीं खेळ ॥ १०९ ॥
वधिशील जिष्णुला तरि कर्णा होशील आमुचा राजा ॥
परि हें दुर्घट इंद्रा जरि काय सहाय आणिला आजा[५] ॥ ११० ॥
कर्ण म्हणे मद्रेशा नीट पहा पार्थ-केतुचा शेंडा ॥
संशप्तकांत झाला मग्न जसा सागरोदरीं भेंडा[६] ॥ १११ ॥
शल्य म्हणे वरुणातें कोण समुद्रोदकांत बुडवील ॥
विझवील तृणें दहना अनिळाला करुनि बद्ध तुडवील ॥ ११२ ॥

१ सिंहावर. २ अर्जुनावर. ३ देवांचा गुरु-बृहस्पति त्याच्या मताप्रमाणें. ४ अर्जुन. ५ ब्रह्मदेव. ६ मार्ताचा गोळा.

ऐसें जों कर्णाशीं शल्य वदे तोंचि शिघ्र त्या सेना ॥
मिळती, मारण-मरणाहूनि, दुजें अधिक ज्यांसि भासेना ॥ ११३ ॥
कुरु-पांडव-सेनांसीं होतां संग्राम [1]राम-शिष्य-मणी ॥
गजयूथावरि हरि-सा धांवे मारी अनेक वीर-मणी ॥ ११४ ॥
अरि एक बाण हाणी तों हाणी कर्ण शर तया ति-पट ॥
निपट प्रत्युपकृति-पटु झांकी रिपु पसरुनि स्व-हेति-पट ॥ ११५ ॥
काढी जोडी ओढी सोडी शर कर्ण लाघवास्तव तें- ॥
न दिसे, दिसे शरासन-मंडळ हत शत्रु-बळहि त्या-भवतें ॥ ११६ ॥
हत-नर-तुर-ग-गजांच्या रक्तांची गुरु-तरंगिणी वाहे ॥
साक्षात् सरस्वती ती स्वर्ग जन जिच्या नि-मज्जनें लाहे ॥ ११७ ॥
रक्त-नदीच्या स्नानें, पानें गंधेंहि वीर ते भुलले ॥
दिसती वसंत-समयीं [2]किंशुक-तरु कटक-काननीं फुलले ॥ ११८ ॥
शल्य म्हणे आला रे आला काळानळ-प्र-बळ भीम ॥
भी मन काळाचेंही यास प्रति-मल्ल एक बळ-भीम ॥ ११९ ॥
बहु-काळ-[4]संचितोग्र-क्रोध-गरळ तुजवरीच ओकाया ॥
हा भीम-भुज-ग आला सावध हो देख तेज[5]-ओका या ॥ १२० ॥
कर्ण म्हणे मद्रेशा सत्यचि वदतोसि भीम हा साचा ॥
घेईल सूड समरीं आम्हीं केल्या महोपहासाचा ॥ १२१ ॥
हा वीर धीर कोपी प्र-बळ नसे यासि चाड देहाची ॥
चौघांहुनी शत-गुण प्रीति द्रुपदात्मजेशि दे हाची ॥ १२२ ॥
याला वधीन किंवा विरथ तरी मी करीन कोपार्थ ॥
याच्या कैवारें तरि मजशीं घालील गांठि तो पार्थ ॥ १२३ ॥
शल्य म्हणे न वदें बहु आधीं भीमासि चाल वाराया ॥
कर्ण म्हणे तुज सागर भासे मज भीम कालवा राया ॥ १२४ ॥
भीमातें [6]नाराचें ताडी कर्ण स्तनांतरीं आधीं ॥
मग बुडवि शर-समुद्रीं कपि गिरितें जेविं दुस्तरागाधीं ॥ १२५ ॥
भीमहि झांकी कर्णा बाण-पटें तत्तनूंत नव [7]रोप- ॥
खोंवी तो वीर-मणी स्व-मनीं तेव्हां धरी अ-मित कोप ॥ १२६ ॥

१ परशुरामाच्या शिष्यांमध्यें श्रेष्ठ असा—कर्ण. २ पळसाचीं झाडें. ३ हनूमान. ४ सांचत आलेला भयंकर क्रोध हेंच विष. ५ पराक्रमाचें स्थान. ६ बाणानें. ७ बाण.

लोक म्हणति दारुण रण नेणों होईल आजि काय कसें ॥
दोघेही प्र-बळ हटी दिसतें हें युद्ध भीति-दायक-सें ॥ १२७ ॥
हांसे भीम मनिं, म्हणे जरि नसता कर्ण जिष्णुचा वांटा ॥
कां टाकितों सु-यश कां गुरु-हृदयांतिल न काढितों कांटा ॥ १२८ ॥
कौसुंभ-रक्त-रंजित वस्त्रानें शोभते जशी महिला ॥
हत-कटक-रक्त-रंगें आली शोभा तशी रणीं महिला ॥ १२९ ॥
भीमें कुरु-बळ मथिलें जरि केलें गुरु-सुतादिकीं जतन ॥
हत-नष्ट रुद्र-रोषें होय जसें [1]दक्ष-मख-महायतन ॥ १३० ॥
पार्थ मुकुंदासि म्हणे संशसक मारिले पहा कृष्णा ॥
कृष्णा-देवीची जशि तशि पुरवाया स्व-भूमिची तृष्णा ॥ १३१ ॥
कर्णाचा [2]गज-कक्ष ध्वज दिसतो आमुच्या बळांतचि तो ॥
पुरुष-व्याघ्र प्राया वीरांचे राशि संगरीं रचितो ॥ १३२ ॥
चाल सरळ्या हरि स-त्वर तेथें ने तन्निवारणार्थ मला ॥
यम लाजो तव दासा वाटे वृष काळ पांडवां गमला ॥ १३३ ॥
कर्णातें साहसा न दुजा मजवेगळा तुला कळतें ॥
अद्भुत तेज तयाचें भस्मचि केलें असेल गा बळ तें ॥ १३४ ॥
जा सारथि सुख-धामा तुज-सम शूरहि नवांबु-द-श्यामा- ॥
आला अरिच्या कामा तो राजा शल्य आमुचा मामा ॥ १३५ ॥
ने रथ तेथें जेथें कर्ण करितसे मदीय-बल-दमना ॥
[3]स्मरत असेल [3]वृष-दहन-दग्धाच्या [3]कृष्ण-मित्र-जल-द मना ॥ १३६ ॥
हरि हर्षें हरि हांकी तैं हरिणाचाचि न हरिती सर्व- ॥
ते ऐसे जवन लव न [4]पवन-कुमारींहि उरविती गर्व ॥ १३७ ॥
शल्य कपि-ध्वज पाहुनि कर्णासि म्हणे पहा महा-बाहो- ॥
आला अर्जुन सावध आतां युद्धार्थ शीघ्र तूं बा हो ॥ १३८ ॥
कर्ण म्हणे सत्य वदसि धैर्याची धरुनि घट्ट कांस रहा ॥
वदलासि यथार्थ नृपा मज झाला प्राप्त धन्य वासर हा ॥ १३९ ॥

---

१ (दक्ष+मख+महा+आयतन) दक्षप्रजापतीच्या यज्ञाचें स्थान (यज्ञमंडप). २ हत्ती ज्याच्या पदरावर काढिला आहे असा. ३ कर्णरूप अग्नीनें जळणाऱ्या (माझ्या) लोकांस कृष्णाचा मित्र जो अर्जुन हाच मेघ, तो आठवत असेल म्हणजे माझे लोक अशा संकटसमयीं माझी आठवण करीत असतील, ४ वायुपुत्र हनुमान् त्याच्या अंगीं.

मी शुद्ध युद्ध यासीं निर्भय-चित्तें करीन, काम रणीं- ॥
होतो पूर्ण, पहावा धर्म-ज्ञ-जनें हि दोष का मरणीं ॥ १४० ॥
भीष्म-द्रोण-चरित्राहुनि कोणाचें चरित्र सन्महित ॥
परि तेंहि विसरवीन स्व चरित्रें मी करीन जन्म-हित ॥ १४१ ॥
कृष्ण म्हणे पार्था हा आला क्रोधांध कर्ण-अंत-कसा ॥
मृत्युं-जय-वर-पात्रा तूं याचा न करिशिल अंत कसा ॥ १४२ ॥
याच्या शरासि साहे ऐसा त्रि-जगांत तूंचि एक रणीं ॥
वीर उदंड असति परि त्यांला पार्था तुझी न ये करणी ॥ १४३ ॥
कर्णातें जिंकाया तूं शक्त तव प्र-ताप मी जाणें ॥
झाला प्रसन्न तुज तो जो जाळी त्रि-पुर एकले बाणें ॥ १४४ ॥
मारीं हर-प्रसादें कर्णा वृत्रा जसा सुनाशीर ॥
राधे-सह ताडूत व्याकुळ-चित्ता तिच्या सुना शीर ॥ १४५ ॥
पार्थ म्हणे कृष्णा मज जय घडतो आजि निश्चयें हा कीं ॥
बा सर्व-लोक-गुरु तूं आहेसि बहु प्रसन्न हय हाकीं ॥ १४६ ॥
आजि पहाशील सख्या [1]मच्छर-शकलीकृतांग कर्णातें ॥
[2]तदसृक्कण-सिक्तातें आकाशातें हि शोण-वर्णातें ॥ १४७ ॥
मी त्याचें कीं माझें तो आजि करील निश्चयें हनन ॥
मन न व्यग्र तुझें हो रणिं जय-मरणार्थ आमुचें जनन ॥ १४८ ॥
जिष्णुसि हरि ने धर्म-स्वांतींचें उद्धरावया शल्य ॥
कर्ण रथासह आणी स-त्वर समरांगणांत तो शल्य ॥ १४९ ॥
उत्साह तेज विद्या शिक्षा बळ धैर्य शौर्य दोघांचें ॥
तुल्यचि ज्यापरि गंगा-यमुनांच्या पावन-त्व ओघांचें ॥ १५० ॥
इंद्र म्हणे कर्ण-वधें हो पार्थ स्तोत्र-पात्र अ-मरांत ॥
सूर्य म्हणे पार्थ-वधें संपादू वि-जय कर्ण समरांत ॥ १५१ ॥
कर्ण म्हणे शल्या जरि मजला मारील आजि पार्थ कसें- ॥
करिशील सांग एकों मैत्रीचें होय ज्यांत सार्थक सें ॥ १५२ ॥
शल्य म्हणे कर्णातें न घडो दैवें घडेल ही जरि तें ॥

१ (मत्+शर+शकलीकृत+अंग) माझ्या बाणांनी छिन्नविच्छिन्न केलें आहे अंग ज्याचें अशा. २ (तत्+असृक्+कण+सिक्तातें) त्याच्या रक्तबिंदूंचा सडा ज्यावर झाला आहे अशा.

तरि मी स्वदर्थ युद्धीं मारीन रणांत जिष्णुतें हरितें ॥ १५३ ॥
पार्थहि हरिस म्हणे जरि [1]अरि मज मारील काय करिशील ॥
न पुसावें परि पुसतों कीं तूं संशय समस्त हरिशील ॥ १५४ ॥
ऐकोनि कृष्ण शिव शिव ऐसें आधीं म्हणोनि मग हांसे ॥
कीं कर्ण काय, न बळी काळाचे ही [1]स्व-सेवकीं [1]फांसे ॥ १५५ ॥
शुष्क उदधि, शीत अनळ, जरि होईल प्रभा-करा पात- ॥
तरि ह्या कर्णापासुनि नाहीं होणार बा तुझा घात ॥ १५६ ॥
जरि विपरीतचि होइल तेंहीं स्मर-हर-वर-प्र-दान मृषा ॥
तरि मी निज-भुज-तेजें भस्म करिन मद्र-पति-समेत वृषा ॥ १५७ ॥
ऐसा निश्चय केला पार्थें कर्णेंहि मांडिलें समर ॥
कौतुक पाहति कौरव-पांडव-पक्ष-स्थ आणखी अ-मर ॥ १५८ ॥
पार्थांकडील कटकें कर्णें, कर्णाकडील त्या पार्थें ॥
केलीं तीव्र-शरांहीं भग्नें भग्नें भयीं [2]हत-स्वार्थें ॥ १५९ ॥
वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे ॥
[3]पुरुहूत-दूत-वात-द्युमणिकरां शर-गृहांत रीघ नसे ॥ १६० ॥
तों आला वध-समय [4]द्विज-शापहि भू-मुखेंचि तो डावें- ॥
गिळवी रथ-चक्र म्हणे [5]रामास्त्रा प्रेम तूंहि सोडावें ॥ १६१ ॥
चक्र क्षितिनें गिळितां न स्मरतां भार्गवास्त्र रवि-जाला— ॥
स्पर्शे विषाद, म्हणती बळ-तेजो-नाश-हेतु कवि जाला ॥ १६२ ॥
व्यसनीं पडतां क्षात्रीं धर्मीं होऊनि तो वि-रस हाय ॥
कर्ण म्हणे धर्मासहि मानी कीं हा नव्हे चिर सहाय ॥ १६३ ॥
विधि फिरतां जरि दिधला व्यसनें त्या फार कंप दात्यातें ॥
परि परि-रंभण देउनि होती शुचि-सत्त्व-संपदा त्यातें ॥ १६४ ॥

१ माझ्या भक्ताला (बांधण्याला). २ ज्यांचा स्वार्थ (जयाशा) नाहींसा झाला आहे असीं. ३ इन्द्र. ४ कोणी एका वेळीं कर्ण मृगयेस गेला असतां त्याच्या बाणानें एका ब्राह्मणाची गाय मेली; तेव्हां त्या ब्राह्मणानें "ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चक्र गिळील" असा शाप दिला होता. ५ परशुरामानें दिलेल्या अस्त्रा. परशुरामाचा भीष्माशिवाय इतर क्षत्रियांस विद्या न सांगण्याचा नियम होता. तेव्हां कर्ण ब्राह्मणाचा वेष घेऊन त्याजपासून कपटानें विद्या शिकला. पुढें हा क्षत्रिय आहे असें परशुरामास कळल्यावर मजपासून मिळविलेली विद्या प्रसंगीं तुला उपयोगीं पडणार नाहीं असा त्यानें शाप दिला होता.

तो वृष [1]भूमि-ग्रस्त-स्यंदन-चक्रासि उद्धरायातें ॥
उतरे स्व-रथाखालें करुनि असें अ-तुल युद्ध राया तें ॥ १६५ ॥
उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांनीं धरूनि चक्राचें ॥
परि पृथ्वी सोडीना जाणों व्रत घेतलेंचि नक्राचें ॥ १६६ ॥
सप्त-द्वीपा पृथ्वी वृष उचली चार अंगुळें करि ती ॥
बडिशासि जशी मत्स्यी [2]नुगळी चक्रासि कांपली परि ती ॥ १६७ ॥
[3]सद्रसना नामातें कीं सोडी [4]बंधु-ता न [5]दायातें ॥
तैशी क्षिति चक्रातें, श्रम झाला फारसा तदा यातें ॥ १६८ ॥
त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रासि वृष म्हणे हाय ॥
काय करील, न [6]साहे ते बहु मर्मीहि साहिले घाय ॥ १६९ ॥
स्व-वधोद्यतार्जुनातें कर्ण म्हणे बळ तुझें अनंत रहा- ॥
स्वस्थ मुहूर्तभरि रण-श्रद्धा पुरवील गा अनंतर हा ॥ १७० ॥
रथ-चक्र उद्धरूं दे श्रुति-शास्त्र-ज्ञा महा-रथा कुल-जा ॥
साधु न हाणिति अरिला पाहति अ-धृतायुध व्यथाकुल जा(ज्या)॥ १७१ ॥
तूं स्व-रथीं, क्षितिवरि मी, तूं सायुध, मी अ-शस्त्र-कवच रणीं ॥
न वधावें मज जों मी रथ-चरणीं लाग तूंहि [7]भव-चरणीं ॥ १७२ ॥
भ्यालों न तुज हरीसहि जो न तुला त्रि-मुख काय कातर तो ॥
कथितों यास्तव कीं जन धर्में भव-सिंधु-नायका तरतो ॥ १७३ ॥
रक्षावा धर्म बुधें कुशळाचा धर्म हा निर्धी, राहें- ॥
स्थिर जें करिसि निरायुध-मथन करिल धर्म-हानि धीरा हें ॥ १७४ ॥
कृष्ण म्हणे राधेया भला बरा आजि स्मरसि धर्मातें ॥
नीच-व्यसनीं बुडतां निंदिसि दैवास न स्व-कर्मातें ॥ १७५ ॥
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एक-मति झालां ॥
कैसें कपट-द्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां ॥ १७६ ॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता तुझा धर्म ॥ १७७ ॥
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग ॥
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा सांग ॥ १७८ ॥

---

१ जमिनींत रुपलेलें रथाचें चाक त्याला. २ न सोडी. ३ साधूंची जिव्हा. ४ भाऊबंद. ५ विभाग ( हिस्सा ). ६ सहन न होतील असे. ७ शिवपदीं.

चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले असें नृपें खोटें- ॥
कर्म करवितां कर्णा होता तव धर्म तेधवां कोठें ॥ १७९ ॥
केले दग्ध जतु-गृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां- ॥
गेला होता कोठें धर्म तुझा सूत-नंदना तेव्हां ॥ १८० ॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता तुझा धर्म ॥ १८१ ॥
पूर्वी धर्म न रुचला त्यजिला निपटूनि जो जसा कुचला ॥
आतांचि वरा सुचला काळ-गृहा सर्व व्हा पराशु चला ॥ १८२ ॥
मागेंचि तुम्ही भजतां धर्माला तरि तुम्हांस वांचविता ॥
आतां मरा, न वांचे दीप्त-गृहीं जो न तोय सांचविता ॥ १८३ ॥
मागेंचि धर्म करितां जरि देतां राज्य धर्म वांचविता ॥
न जगे जो दुर्भिक्ष-व्यसनापूर्वी न धान्य सांचविता ॥ १८४ ॥
आतां रक्षील कसा धर्म तुम्हीं वित्त-मद्य-मत्तांनीं- ॥
जो लोटिला दहादां स्व-हितहि मानूनि अ-हित लत्तांनीं ॥ १८५ ॥
रक्षावा धर्म असा करिशी उप-देश तरि असे मान्य ॥
रक्षितसों [1]धर्मातें आम्हांला धर्म ठाउका नान्य ॥ १८६ ॥
आ-श्रित-जनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें ॥
निश्वास वृषें लज्जावनत-मुखें सोडिला जसा नागें ॥ १८७ ॥
न वदे कांहींच रथीं वेंचे घे सूर्य-सूनु चापातें ॥
सोडी बाण कराया मूर्छित शक्रासि सूनुचा ( च्या ) पातें ॥ १८८ ॥
तेव्हां [2]पर-पुरुष म्हणे पार्था दिव्यास्त्र-वात सोडावा ॥
झोडावा मोडावा वैर-द्रुम कर्ण बाण जोडावा ॥ १८९ ॥
कर्णावरि बहु कोपे पार्थ जई तेधवां [3]अनळसाचा- ॥
देह ज्वाला-माली भासे त्या रण-मखीं अनळ साचा ॥ १९० ॥
शर सोडिला रवि-सुतें धीर जनेंहि स्व-धीर यामागें ॥
जो सोडिलाचि नव्हता व्यसनांत कधींहि मणि जसा नागें ॥ १९१ ॥
तो शर [4]गर-धर-वर-सा पवि-सा रवि-सा स्मरारि-सायक-सा ॥
पार्थ-भुजांतरिं शिरला, वल्मीकामाजि नाग-नायक-सा ॥ १९२ ॥

---

१ धर्मराजाला. २ परमात्मा ( कृष्ण ). ३ ( अन्+अळसाचा ) ज्याला आळस नाहीं अशाचा. ४ विष धारण करणारा शंकर.

त्यां खर-शर-प्र-हारें विव्हळ झाला महेंद्र-सुत राया ॥
जरि होता निकट कुशल मंत्री प्रभु बाण-सर्प उतराया ॥ १९३ ॥
ऐसा निज-भुज-वि-क्रम दावुनि सर्वां भटांसि शुद्ध रणीं ॥
उतरे वृष दावाया भू-ग्रस्त-रथांघ्रिच्याहि उद्धरणीं ॥ १९४ ॥
बहु यत्न करी प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा ॥
द्विज-शाप मान्य पति-सा गुरु कर्ण न मान्य तीस चाकर-सा ॥ १९५ ॥
देव म्हणे पहिलें गुरु-नाम मग स्व-धनु बाण बरवें घे ॥
खंडीं शिर रिपु पुनरपि जों रथ-रथाचिया न वर वेंघे ॥ १९६ ॥
प्रभुची आज्ञा होतां पार्थ प्र-खरेषु सोडुनी त्वरित- ॥
रण-दक्षा स्व-वि-पक्षा करि कक्षा[1] केतु खंडुनी ज्वरित ॥ १९७ ॥
तुटला ध्वजचि न केवळ वि-जयाचा भरंवसाहि तुटला हो ॥
सुहृदश्रुबिंदुसह तो पडला बळ-धैर्य-सेतु फुटला हो ॥ १९८ ॥
केतु च्छेदुनि पार्थ द्यु-मणि-सुताचे हरावया प्राण ॥
जोडी गांडीव-गुणीं शत्रु-हर हरायुधा[2] असा[2] बाण ॥ १९९ ॥
योजुनि महास्त्र-मंत्रित शर विजय म्हणे " जरि स्व-गुरु सर्व- ॥
तोषविले असतील, ज्ञान-बळाचा नसेल तिळ गर्व,- ॥ २०० ॥
विधिनें[3] जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा- ॥
तरि या शरें वृष मरो, हरिचीच पुरो पुरो न तपनाशा " ॥ २०१ ॥
ऐसें वदोनि पार्थे ओढुनियां स-गुण-बाण कर्णांतं ॥
पाठविला काळें निज-दूत तसा व्हावयासि कर्णांत ॥ २०२ ॥
[4]नयनाग्नि-कील [4]नील-ग्रीवाचा [4]मीनकेतुवरि जैसा ॥
अरिवरि सायक-नायक जाय कराया क्षय त्वरित तैसा ॥ २०३ ॥
तो शर [5]कृत्यानळसा दुर्घट [6]चक्रोद्धृति-क्रिया-नळसा- ॥
गांठी [7]कुरु-बळ-विजय-प्रासादाच्या [7]रवि-प्रभा कळसा ॥ २०४ ॥

१ ध्वजवस्त्राचा पदर. २ शंकराचें आयुध पाशुपतास्त्र त्यासारिखा. ३ अन्वय—जरि विधिनें तप जोडुनि (तें) कीर्तनें (मुखानें उच्चारिल्यानें) नाशा न नेलें असेल तरि इ०. ४ शंकराच्या (तृतीय) नेत्रांतील अग्नीची ज्वाला मदनावर जशी पडली. ५ (कृत्या+अनळ+सा) शत्रूचा घात व्हावा म्हणून जो होम करावयाचा त्याच्या अग्नीसारखा. ६ (चक्र+उद्धृति+क्रिया+अनलस) रथाचें चाक उपटून काढण्याच्या व्यापारांत आळस न करणाऱ्या अशा कर्णास. ७ रविप्रभा कुरुबळविजयप्रासादाच्या कळसा गांठी, असा अन्वय म्हणजे कौरवांच्या पराजयाची वेळ आली.

[1]शाण-निशित-मुख-बाण [2]प्राणभृदीड्यार्क-सूनुच्या अमळा- ॥
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा शिरः--कमळा ॥ २०५ ॥
[3]सास्राश्रु शिर नृपाचें प्रथम क्षोणी-तळीं गळालें हो ॥
मग [4]स-कुसुम-वृष्टि तनु [5]स-धर्म-भय शत्रु-बळ पळालें हो ॥ २०६ ॥
कर्ण--शरीरापासुनि तेज निघालें दिवा-करीं शिरलें ॥
[6]गुरु-हृच्छोक-तमावरि जाणों सत्पुत्र-रत्न तें फिरलें ॥ २०७॥
ऐसा केला असतां कृष्ण-कृपेनेंचि कर्ण-नाश तदा ॥
पांडव पांचाळ करिति विजयाच्या वीर्य-वर्णना शत-दा ॥ २०८ ॥
बहु-सिंह-नाद वाद्य-ध्वनि जय-जय-कार करिति [7]धर्म-बळें ॥
म्हणति तरला युधिष्ठिर दुस्तर कर्णार्णवासि धर्म-बळें ॥ २०९ ॥
भग्न-रथें शल्य पळे क्षितिस म्हणे क्षोभलीस तूं कां गे ॥
दुर्योधनासि भेटे स्व-मुखें कर्णांत-वृत्त तें सांगे ॥ २१० ॥
भू-प म्हणे हा हा अशि कशि झाली आजि अंग-राज-गती ॥
स्वर्ग-श्री साधावी मग, आधीं करुनि संगरा जगतीं ॥ २११ ॥
तें वि-परीत कसें त्वां केलें कर्णा सख्या अगा, धार्मी- ॥
सुख काय, तरीं कैसा ह्या त्वद्विरहार्णवा अ-गाधा मी ॥ २१२ ॥

## आर्या; सन्मणि-मालेंतील.

" सत् म्हणजे साधु हींच रत्नें ह्यांची माला. " ह्या आर्यांपैकीं प्रत्येकींत एकेका साधूचें वर्णन केलें आहे, म्हणून ह्या प्रकरणास सन्मणिमाला म्हटलें आहे.

जो [8]ज्ञान-राज भगवान् श्रवणें सु-ज्ञान दे, वदे वाचा ॥
अव-तार गमे अकरा-वा कां सु-ज्ञां न देव-देवाचा ॥ १ ॥

---

१ साणेवर तीक्ष्ण केलेलें आहे मुख ज्याचें. २ जीवांना स्तुत्य असा जो सूर्य त्याच्या पुत्राच्या, म्हणजे कर्णाच्या (प्राणभृत्+ईड्य+अर्क+सूनु). ३ (स+आप्त+अश्रु) इष्टमित्रांच्या अश्रूंसहवर्तमान. ४ देवांनीं केलेल्या पुष्पवृष्टीसह. ५ धर्मराजाच्या मनांतील भयासुद्धां. ६ आपल्या बापाच्या हृदयांतील शोकरूप अंधारावर. ७ धर्मराजाकडील सैन्यें. ८ ज्ञानदेव.

नमिला शमि-लास्य-प्र-द[1] शांति-जल-धि एकनाथ[2] तो भावें ॥
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देव-वृंद लोभावें ॥ २ ॥
कर जोडून करिन मी न नृ-सिंहसरस्वतीस[2] कां नमन ॥
सज्जन सेविति ज्यांचें सद्यश व्हाया सु-तृप्त कान मन ॥ ३ ॥
स्वर्वल्लि-सुरभि-सुर-सरिदधिका[3] श्रित-सर्व-कान-दा साची ॥
श्री-रामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥ ४ ॥
नमिला साष्टांग श्री-पति-भक्ति-रस-ज्ञ[4] वामन-स्वामी ॥
[5]रस-भवना तत्कवना[7] मानीं या तेविं वाम[6] न स्वा[7] मीं[8] ॥ ५ ॥
वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंद-राजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सत्कीर्ति सु-युक्ति सुंदरा[9] जाला ॥ ६ ॥
वंदावा मजला तो ब्राह्मण बहिरा[10] तथा पिसा मान्य ॥
जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य ॥ ७ ॥
हरि-विजय ग्रंथातें आधिं मग श्री-धरासि वंदीन ॥
शिव-वंदन-कामांहीं वंदावा[11] प्रथम देव, नंदी न ? ॥ ८ ॥
श्री-मुक्तेश्वर कवि-वर यातें कोण न शुभेच्छु वंदील ॥
बंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेविं मंदील ॥ ९ ॥
कीर्तन-सुखार्थ झाला अव-ताराचि अमृतराय जीवाचा[12] ॥
भलत्या मुखांतुनि अशी सु-रस-खनि निघेल काय जी वाचा ॥ १० ॥
कर जोडितों सुटाया तनु-रूपा ताप-हेतु कारा मी ॥
कीं स-तनु-मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ॥ ११ ॥
माया हे सं-सृतिची जाळूनि स-शोक तो कवी रमला ॥
राम-पदाब्जीं अलि-सा, बहु-मत[13] सु-मुदोक तो कबीर मला ॥ १२ ॥
साधु[14] म्हणावे म्हणती नर माधवदास साधु याला जे[14] ॥
अति-सारीं पट ज्याचे न रमा-धव दास-सा धुया लाजे ॥ १३ ॥

---

१ शांतिप्रधान अशा जनाला लास्य ( नृत्य ) लक्षणेनें आनंद देणारा. २ ह्या नांवाच्या साधूस. ३ कल्पलता, कामधेनु व ( सुर+सरित् ) भागीरथी ह्यांच्या ( कीर्तीपेक्षां ) अधिक. ४ (कवि) वामन पंडित. ५ शृंगारादि रसांचें गृह. ६ सुंदर. ७ स्वकीय कवनास. ८ मी मोरोपंत. ९ सुंदर स्त्रिया. १० ह्या नांवाचा. ११ " वंदावा " ह्याबद्दल " लंघावा " असा पाठ रा. पांगारकर यांनीं आपल्या " मोरोपंती वेंचे " पृ. ४३ यांत दिला आहे; व तो बरा दिसतो. १२ बृहस्पतीचा. १३ ( सु+मुद्+ओक )–उत्तम आनंदाचें स्थान. १४ जे नर माधवदास याला साधु म्हणती (ते) साधु म्हणावे, असा अन्वय.

[1]नरहरि-नामा पावे संत न सोनार दास-मान कसा ॥
तरला करुनि भवाचा अंत नसों नारदा-समान कसा[1] ? ॥ १४ ॥

## आर्या; धर्मोपदेश-प्रकरणीं.

सत्यातें जोडावें सु-ज्ञें धर्मासि पळ न सोडावें ॥
[2]पाशातें तोडावें धीरें न कदापि पाप जोडावें ॥ १ ॥
बा गा धर्माच्या तों कोणीं सोडूं नयेचि कासेतें ॥
निष्फल[3] होतीं मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें[3] ॥ २ ॥
अंभो-दास पहाती जैशीं पसरूनि[4] नित्य आ[4] शेतें ॥
धर्मासि तशीं भूतें करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें ॥ ३ ॥
निज-हित-कर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं ॥
[5]यापरि पोषण पालन लालन करिजे न अन्य जनकांहीं ॥ ४ ॥
साधु म्हणति[7] जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा[7] त्या- ॥
रक्षीं व्यसनीं, तदितर जन उदकीं लोष्ट-सा विरो, धात्या ॥ ५ ॥
म्हणऊनि अनुसरावें सु-ज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता ॥
पतनार्थ कां अहं-ता पोषावी गा तशीच कां मम-ता ॥ ६ ॥

## संशय-रत्न-माला.

**संसारसागरांत बुडत** असतां परमेश्वरानें आपणास तारावें **म्हणून मोरोपंतानें** त्याचा धावा केला. भक्ताविषयीं अत्यंत प्रेमळ असा ईश्वर भक्ताच्या हाकेसरसा धांवत यावयाचा, असें असून त्याला यावयास उशीर लागला; हें पाहून मोरोपंत अनेक प्रकारचे संशय घेत आहे, ते पुढील आर्यांत वर्णिले आहेत, म्हणून ह्या प्रकरणास **संशय-रत्न-माला** ( संशयरूप रत्नांची माला ) असें नांव दिलें आहे.

१ अन्वय-( जो ) भवाचा अंत करुनि तरला, ( तो ) सोनार ( जातीचा ) **नरहरिनामा** संत दासमान ( भगवद्भक्तांची योग्यता ) कसा न पावे ? ( आणि ) **कसा** (कसोटीस लाविला असतां) नारदासमान नसो ( काय ? ). २ मायापाशांस. ३ पिकाला आलेलीं हीं शेतें ( जर ) मेघ त्यजिलीं ( तर ) निष्फळ होतात. ४ आ पसरून=मोठ्या उत्कंठेनें. ५ ह्या शब्द पाहोत ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ६ धर्माप्रमाणें. ७ साधु म्हणति हे धात्या ( ईश्वरा ), जो धर्माशीं ( व ) नीतिशीं विरोधा न करी इत्यादि.

रटतां बहु स्वरेनें ' कोठें जातां ' असें तुम्हां देवी ॥
पुसतां झाली जाणों, पुसतां[1] ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलापीत[2] स्वकीय[3] सच्चरितें. ॥
प्रेमळ गीत तुम्हांला हरि[4] हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ॥
शरणागत-भय-शमना[5] यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभ-दैव-समीरें[6] त्यावरि करुणा-घन प्रभू वळला ॥ ४ ॥
अथवा येतां[7] झालां तन्मय शिव-तांडवांत कैलासीं[7] ॥
केला[8] असेल गरुडें गर्व पुन्हा काय त्याच कैलासीं[8] ॥ ५ ॥
बहुधा बळिचें द्वार क्षणभरिही सोडितां नये देवा ॥
न चुकावी छल[9]-पाप-प्रायश्चित्तार्थ साधुची सेवा ॥ ६ ॥
प्रायः सु-मुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ ॥
होय महत्[10] कार्य परि प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ ॥ ७ ॥
कीं मी भागवतांचा[11] भाग असें आणिलें मनीं स्वामी ॥
हें सत्यचि परि कैंचा हा भेद प्रभु-वरा तुझ्या धामीं ॥ ८ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे[12] आले[12] ॥
फुटतां सागर सिकता[13] सेतूचें काय त्यापुढें चाले ॥ ९ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ १० ॥

---

१ कोणी कामाकरितां बाहेर जात असतां त्याला कोठें जातां, असें कोणी विचारिलें तर तो अपशकुन समजून त्यानें बाहेर जाऊं नये असें आहे; ह्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. २ गात गात. ३ तुमचीं स्वतःचीं. ४ अहो हरि. ५ शरण आलेल्याचें भय नाहींसें करणाऱ्या. ६ त्याचें शुभकारक दैव हाच समीर म्हणजे वायु, त्यानें. ७ येत असतां ( वाटेंत ) कैलासपर्वतावर शिवाच्या नृत्यांत तर तुम्ही तल्लीन झालां नाहीं ना ? ८ एकदां विष्णु कैलासीं शिवदर्शनार्थ गेला असतां, त्याचें वाहन गरुड ह्यानें बळाच्या गर्वानें नंदीच्या नाकांत बोटें घालून त्याचा उपहास केला; तेव्हां त्यास मोटा क्रोध येऊन त्यानें गरुडाला श्वासानें नाकांत ओढून घेतलें; अशा रीतीनें त्याच्या गर्वाचा परिहार केला; अशी कथा आहे. ९ वामनावतारीं ( बळीचा ) छळ केल्यामुळें जें पाप लागलें त्याच्या प्रायश्चित्ताकरितां. १० मजसारख्या मोठ्या पातक्यास तारणें हें महत्कृत्य खरेंच. ११ मी ( ईश्वर ) भक्तांच्या मात्र वांट्यास येणारा म्हणजे त्यांसच प्राप्त होणारा. १२ ( युद्धाकरितां ) आडवे आले. १३ वाळूच्या बांधाचें.

किंवा चुकलें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता बससी ॥
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोष-ज्ञ ही तसा नससी ॥ ११ ॥
कीं कळवाया कर्में धर्में तुज दाविली असेल वही[1] ॥
स्वदृष्टि-पुढें राहे ऐसा पापांत त्या नसे लव ही ॥ १२ ॥
कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक, हा कसा तर्क ॥
करि गुरु-जनीं सतींची[2] शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क[3] ॥ १३ ॥
अथवा स्वस्थचि असती कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्र-वळहि बळें[4] दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १४ ॥
कीं भीतो भ्रांत वृथा मृग-जळ-मग्नासि काय तारावें ॥
सत्यचि हें, परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ १५ ॥
कीं कांहीं व्रत-नियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीन-रक्षणाहुनि अधिक-फळ-व्रत[5] कधीं मना आलें ॥ १६ ॥
कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे ॥
वाटे या[6] दुःशील-ग्रीष्मीं तव नव दयीं-नदी[7] आटे ॥ १७ ॥
कीं पावावें समयीं स-दय मनांतून योजिलें जरि तें ॥
तरि जेविं रुक्मिणीचे चित्ता माझें अ-धीर मन करितें ॥ १८ ॥[8]
किंवा पुराण-पुरुषा[9] संप्रति बहु भागलासि या कामीं[10] ॥
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हाका मी ॥ १९ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करां ॥
तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा [11]प्र-यास करा ॥ २० ॥
कीं घाडिलें पुढें निज-नाम करो सर्व सिद्ध-ता आर्धी ॥

---

१ यम हा प्राणिमात्राचीं सर्व कर्में जींत लिहून ठेवीत असतो ती. अशा महापातकी मनुष्यास तारणें योग्य नाहीं, असें म्हणून यमानें तुला माझीं पातकें दाखविलीं असतील.– असा संशय. २ पतिव्रता द्रौपदी हिची. ३ ( असत् + अर्क ) खलदुःशासनरूप सूर्य. ४ सैन्य. ५ (दीनरक्षणापेक्षां) अधिक आहे फल ज्याचें असें व्रत. ६ हा मी (मोरोपंत) जो अत्यंत दुष्टस्वभावाचा हाच ग्रीष्मऋतु त्यांत ( हे ईश्वरा ) तुझी. ७ दयारूप नदी आटे ( आटली ). ८ तुम्हीं जरी मला प्रसंगीं पावावयाचा संकेत केला असेल, तरी तुम्ही अतिप्रिय व दुर्मिळ असल्यामुळें विवाहाच्यापूर्वी रुक्मिणीचें मन जसें तुम्हांविषयीं अधीर झालें होतें तसें माझें मन अधीर झालें आहे. असा भाव. ९ म्हातारा. पक्षीं अनादि. १० दीनांचा उद्धार करण्याच्या कामांत. ११ हाताला श्रम ( मात्र होईल).

ऐसें प्रभो म्हणावें तरि तुमचीं चरण-सारसें सार्धीं[1] ॥ २१ ॥
कीं आर्जविला[2] नाम-प्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैर ॥
न पुसे, न भी, न ऐके यास्तव दोषांत[3] लागलें वैर ॥ २२ ॥
कीं संप्रति अ-भय दिलें कलिला चालवया बरें राज्य ॥
परि कोण प्राणि स-दय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ २३ ॥
किंवा म्हणसि समर्थोऽहं कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं[4] ॥
दीनावनाविणें[5] क्षण देइल दयिता[6] दया[6] कशी वर्तुं[7] ॥ २४ ॥
कीं [8]अक्ष-क्रीडेनें हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी[9] ॥
तरि [10]बद्ध-मूळ एकचि [11]भजदवन-व्यसन वर्णिती सु-कवी ॥ २५ ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे नसावेंची ॥
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां, धनवंत कण कसा वेंची[12] ॥ २६ ॥
कीं बहु काळ विसरला फारचि संकोचला सखा लाजे ॥
येत असेल हळु हळु म्हणुनचि एकहि न पादुका वाजे ॥ २७ ॥
कीं नाम स्पर्श-मणि स्पर्शे परि काय करिल खापर मी ॥
स-दयहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमी ॥ २८ ॥
कीं प्रथम मदपराधें तारूं ना म्हणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रति-ज्ञा, [13]भारत-रण-वृत्त तें मनीं आणा ॥ २९ ॥
कीं याचकांसि देतां सरले चारीहि[14] [14]मुक्ति-धन-राशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशी ॥ ३० ॥
कीं जरि म्हणाल असतां [15]जन्म-शुचि स्व-पद-नीर-जा मिळतो ॥
तरि झकवितां मला अजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो ? ॥ ३१ ॥
कीं वाटलें खळाला मुक्ति न द्यावी जशी सुधा सर्पा ॥

१ ज्यांना डामडौल आवडत नाहीं अशीं. २ नाम हा तुझा प्रतिनिधि याचें (कोणीं) आर्जव केलें असतां तो यथेच्छ मोक्ष देतो; व तुम्हांला पुसत नाहीं इत्यादि. ३ तुम्हा दोघांत. ४ समर्थः (समर्थ) अहं (मी) कर्तुं (कोणतीही गोष्ट करावयास). अकर्तुं (को० गो० न करावयास). अन्यथा कर्तुं ( को० गो० उलट करावयास ). ५ दीनांच्या रक्षणावांचून. ६ तुमची आवडती दया. ७ वागावयास. ८ सोंगटी खेळण्यानें. ९ (कार्य करण्यांत) विघ्न आणितें. १० दृढ झालेलें. ११ भक्तांचें रक्षण हेंच व्यसन. (छंद) ( भजत् + अवन ). १२ वेंचतो (सांचवून ठेवतो). १३ कृष्णानें ' मी शस्त्र धरणार नाहीं ' ही प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां मोडिली. ह्या कथेस अनुलक्षून हें लिहिलें आहे. १४ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्य असे मुक्तीचे चार प्रकार आहेत. १५ जन्मापासून पवित्र.

तरि ती अर्घोदिकांला द्या, सु-वरा भक्ति मात्र मज अर्पा ॥ ३२ ॥
कीं अ-कृपा[2] नावडती आवडती स्त्री कृपा तिचें प्राज्य ॥
लोक-त्रयांत देवा [3]पहिलीचें काय एक मीं राज्य[3] ॥ ३३ ॥
कीं गमलें जरि आधीं[4] म्हणतों दावा[5] स्व-पाद या[5] लोकीं ॥
जो जो वांछिल जें जें तें द्यावें हें मुधा दयालो कीं ? ॥३४ ॥
कीं आज काल ज्याचा तेणें अधिकार घेतला रागें ॥
तरि हें [6]अ-श्रद्धेय [7]प्रभ्वंतर ऐकिलें नसे मागें ॥ ३५ ॥
कीं भेटि बहुदिसां भय भेटाया दीन-बंधुला वाटे ॥
[8]तरि भेटावें विधिनें गेले जाताति साधु ज्या वाटे[8] ॥ ३६ ॥
कीं [9]स्त्री-पूर्व-शिखंडी त्यातें समरांत भीष्म पाहेना ॥
मीही[10] पहिला पापी तैसें करितां[10] सु-कीर्ति राहेना ॥ ३७ ॥
कीं भीशी मज एका उद्धरितां लागतील फार झटें ॥
तरि कोणाहि न कळतां न्यावा झांकूनि दास पीत-पटें ॥ ३८ ॥
कीं लक्ष-भोजनापरि केला संकल्प संपला देवा ॥
तरि दाते क्षुद्विकला[11] मग न म्हणति काय या बसा जेवा ॥ ३९ ॥
कीं मीच एक उरलों पापी, हें वीज ठेविलें जतन ॥
[12]वतन स्वकीय मज कां [13]करितें त्वन्नाम मंगलायतन[14] ॥ ४० ॥
कीं कार्य-बहु-त्वें तुज फावेना यावया जगत्पाळा ॥
तरि रूप घ्या दुजें, ती विद्या कंठीं वसे जशी माळा ॥ ४१ ॥
कीं मागें गुप्त उभा असिसि प्रेमें उभारुनी [15]बाहे ॥
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा हे ॥ ४२ ॥

१ पृष्ठ २२२ हरिविजय (श्रीधर) ह्यावरील टीप पाहा. २ अकृपेचें. ३ अधिकार चालविण्याचें स्थान. ४ योग्यता येण्याच्या पूर्वी. ५ मृत्युलोकीं आपलें दर्शन (मला) द्या असा अर्थ. ६ विश्वास न ठेवण्याजोगें. ७ (प्रभु+अंतर) दुसरा ईश्वर. ८ बारा वर्षांनंतर आप्ताची भेट घेणें झाल्यास सांवाळ्या देवालयांत भेट घ्यावी, असा कांहीं विधि आहे; त्या विधीनें. ९ (पूर्वी स्त्री असून पुढें पुरुष झालेला) शिखंडी—कौरवपांडवांच्या युद्धांत भीष्म आटोपेना, तेव्हां पांडवांनीं शिखंडीला पुढें करून मागून अर्जुनानें बाण मारावे, असें योजिलें. ह्यांत उद्देश हा कीं, भीष्म स्त्रीवर कधीं बाण सोडणार नाहीं. ह्या गोष्टीस लक्षून हें लिहिलें आहे. १० मी पूर्वीचा पापी म्हणून मला न पाहणें असें कराल तर. ११ भुकेनें व्याकुल झालेल्यास. १२ हक्काची जागा. १३ तुझें परम मंगलकारक नांव मुखीं येत असतां मी खचीत तरल्यावांचून राहणार नाहीं हा भाव. १४ कल्याणाची जागा. १५ हात.

## केकावली. परमेश्वर-प्रार्थना.

केका म्हणजे मोराचा शब्द आणि आवली म्हणजे पंक्ति. **मोरोपंतानें** आपणास मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना **केकावली** अशी संज्ञा दिली आहे.

### पृथ्वी-छंद.

तुझ्या बहुत [1]शोधिले अघ-निधीं[2] पदाच्या रजें ॥
न तें अनृत वर्णिती बुध[3] जनीं सदाचार जें ॥
असें ( से ) सतत ऐकते सतत बोलते मीच [4]ते- ॥
[5]प्रमाण न म्हणों जरी उचित गाझिया [6]नीचतें ॥ १ ॥ ( ३ )
तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय, [7]कीं- ॥
कृपाचि सरली, असें हि न घडे जगन्नायकीं ॥
नसेन दिसलों कसा, नयन सर्व-साक्षी रवी, ॥
विषाद धरिला म्हणों, न सुरभी[8] विष क्षीर वी ॥ २ ॥ ( ४ )
मला निरखितां [9]भवच्चरण-कन्यका आपगा ॥
म्हणे अगइ[10] ऐकिलेंहि न कधीं असें पाप गा ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला[10] ॥
न घालिन भिडेस मी जरिहि कार्य-लोभी तिला ॥ ३ ॥ ( १० )
सदैव नमितां जरी पद[11] ललाट केलें[11] किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें[12] ॥
नता करुनि मुक्तही म्हणसि मी बुडालों रिणें ॥
अशा तुज न जो भजे मनु-ज, धिक् तयाचें जिणें ॥ ४ ॥ ( ११ )

---

१ शुद्ध केले. २ पापाचे राशीच ( असे लोक ). ३ जनीं सदाचार ( चांगलें आचरण करणारे ) बुध ( ज्ञानी पुरुष) जें (प्रथमचरणांतलें) वर्णिती तें अनृत (खोटें) न (नाहीं). ४ ऐकणारे व बोलणारे ( लोक ). ५ ते प्रमाण न ( ते खरे नाहींत ) असें मी जर म्हणेन तर. ६ हलकेपणास. ७ अथवा. ८ सुरभि ( कामधेनु ) जरी कोपली तरी विष कधींही विणार ( देत ) नाहीं क्षीर (दूधच) देते. ९ तुमच्या पायांची कन्या ( पायांपासून उत्पन्न झालेली ) नदी ( भागीरथी . १० या पद्यांत 'स्वभावोक्ति' नामक अलंकार आहे. ११ ललाट ( कपाळ ) किणें ( घट्टयानें ) पद ( स्थान ) केलें. किंवा ' सदैव पद नमितां जरी ललाट किणें केलें'-कपाळास जरी घट्टे पडले असा अर्थ. १२ आपल्या चरणकमलावांचून.

सदैव अप-राध हे रचितसें असे कोटि गा ॥
स्वयें हि कथितों नसे तिळ हि लाज मी कोटिगा ॥
अजांड-शत कोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा ( वां ) ॥
न त्यांत अघ-काश या, स्थळ दिलें तदा कां दवा[1] ॥ ५ ॥ ( १७ )
दयाब्द वळसील तूं तरि न चातकां सेवकां ॥
उणें किमपि भाविकां उबगशील तूं देव कां ॥
[2]अनन्य-गतिका जना [3]निरखितांचि सोपद्रवा[3] ॥
तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा[4] ॥ ६ ॥ ( २० )
कळी करि सु-निर्मळीं परम उग्र दावा नळीं[5] ॥
तयांत[6] [7]अ-वि-शुद्ध मी शलभ जेविं दावानळीं ॥
व्रणार्त[8] ( र्थ ) पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे- ॥
[9]स्मरादि-रिपु मन्मनीं, अहि न काळ[10] भेका कसे ॥ ७ ॥ ( २१ )
धना परि-जना घरीं तुमचिया उणें कायसें ॥
न लाभ [11]मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या आयसें ॥
परि प्रभुहि सं-ग्रहीं सकल वस्तुला ठेविती ॥
गुणा न म्हणतां उणा[12] अधिक[12] आदरें सेविती ॥ ८ ॥ ( २३ )
अ-तर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा हे विधी ॥
श्रुति-झहि म्हणे सदा, स्तविल आमची केविं धी ॥
तरी जन यथा-मति स्तवुनि जाहले सन्मती ॥
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ॥ ९ ॥ ( २७ )
निज-स्तुति तुम्हां रुचे स्तविति त्यां बरें ( वरें ) तर्पितां ॥
नमस्कृति-परां बरें स्व-धन सर्वहा अर्पितां ॥
स्व-भाव तुमचा असा विदित जाहला याचकां ॥
करूं स्तव जसातसा फळ नव्हे जना याच कां ॥ १० ॥ ( २८ )

१ श्रीधर–हरिविजय पृष्ठ ३५० ओवी ६० ही वरील टीप पाहा. २ नाहीं (आपणावांचून) दुसरा थारा ज्याला. ३ पीडलेले असे पाहतांच. ४ कळवळ्यास. ५ नळराजाविषयीं. ६ त्या कळीच्या झपाट्यांत. ७ अत्यंत अपवित्र ( सांपडलों आहें ). ८ जखमेनें पीडलेल्या. ९ कामादि शत्रु. १० अहि ( सर्प ) भेका ( बेडकाला ) काळ कसे न ( होतील ) ? ११ आयसें मणि–हेम-भू–पतिस जोडिल्या लाभ न, असा अन्वय. १२ गुणानें कमी किंवा जास्त असें न म्हणतां त्यास आदरानें सेवितात.

तुम्ही परम चांगले बहु-समर्थ दाते असे ॥
सु-दीन जन मी तुम्हां शरण आजि आलों असें ॥
पुन्हांहि कथितों बरें श्रवण हें करा या स्तव ॥
समक्ष[1] किति आपुला सकळ-लोक-राया स्तव ॥ ११ ॥ (२९)
किती[2] श्रवण झांकिती प्रभुहि, काय ते पोळती ॥
पुसाल जरि कोण ते, पद-रजीं तुझ्या लोळती ॥
बरें तुजचि सोसवे स्तवन, कृत्ति-वासा गरा- ॥
न[3] पी, तरि कसें घडे हित-करा दया-सागरा ॥ १२ ॥ (३०)
गमो मधुर हें विष स्तवन, सेवितां माजवी ॥
करी मलिन सद्यशो-मुख, हलाहला लाजवी ॥
हरापरिस[5] तूं बरा प्रभु-वरा सदा जो पिशी ॥
असा रस समर्पि त्या अ-मृत आपुलें ओपिशी[6] ॥ १३ ॥ (३१)
प्रभो शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे ॥
म्हणोनि इतुकेंचि हें स्व-हित कृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें ॥
घनांबु[7] न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें ॥ १४ ॥ (४०)
शिवे न तुझिया पदा अ-दयताख्य[8] दोष क्षण ॥
प्रभो चुकतसों तरी करिशि तूंचि सं-रक्षण ॥
नसेचि[9] शरणागती घडलि सत्य अद्यापि ती ॥
रुचे विषयें, ज्यां मिळे अ-मृत ते न मद्या पिती ॥ १५ ॥ (४१)

---

१ तुमच्या तोंडावर. २ कित्येक प्रभुही, ( समर्थ, स्तुतिपात्र असेही लोक ) कोणी आपली स्तुति समक्ष करूं लागलें असतां जसें काय पोळतात व ( आपले ) हात कानावर ठेवितात. ३ ( जर ) महादेव विष न पिता तर ( लोकांची ) कशी अवस्था झाली असती? म्हणून भक्तांकरितां स्तवनरूप विष तुम्हांला सोसणें अवश्य आहे हें तात्पर्य. ४ चांगली कीर्ति हेंच मुख. ५ महादेवापेक्षां तूं बरा; कारण तो एकदांच विष प्याला आणि तूं ( स्तुतिरूप विष ) नित्य पितोस. ६ देतोस. ७ चातकपक्ष्यानें तोंड उघडल्याखेरीज पर्जन्याचें पाणी त्याच्या तोंडांत पडत नाहीं, तद्वत् तुम्हांस शरण आल्याशिवाय तुमचा प्रसाद व्हावयाचा नाहीं. हा सारांश. ८ अदयता ( निर्दयपणा ) ह्या नांवाचा. ९ अद्यापि ( माझी ) ती शरणागती ( शरण येणें ) सत्य घडली नसेचि; ( कारण कीं मला अद्यापि ) विषय रुचे; असा अन्वय.

म्हणा[1] मज उताविळा गुणचि घेतलो, घावरें- ॥
असो मन असेंचि वा [2]भजक-वर्हि-मेघा बरें (मेघांबरें) ॥
दिसे क्षणिक सर्व [3]हें, भरंवसा धर्डावा कसें- ॥
धरील, मन आधिनें बहु परि-भ्रमे चाकसें ॥ १६ ॥ (४५)
[4]कृतांत-कटकामल-ध्वज जरा[4] दिसों लागली ॥
[5]पुरः-सर-गदांसवें झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ॥
न हों जरि उताविळा [6]स्व-रिपु कापितो हा गळा ॥ १७ ॥ (४६)
[7]कथा-सुरभि या भल्या स्व-जननीहुनी वाटती ॥
शिशूंस जरठांसही निरखितां रसें[8] दाटती ॥
दुहोत भलते सदा तरि न लेश ही आटती ॥
[9]स्व-वत्स-मल भक्षिती परि न सर्वथा बाटती ॥ १८ ॥ (५८)
असो वरि कसा तरी वि-मल भाव ज्याचा करां- ॥
तयावरि दया, पचे वर असाचि द्या चाकरा ॥
वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे ॥
पुसोनि अधि-कार द्या, सु-कर तें सदा साजिरें ॥ १९ ॥ (६७)
तुझ्या समचि हें गुणें अणु उणें नसे नाम, हों- ॥
दिसे अधिक [10]हीं तसा गुण तुला असेना महा ॥
सदैव भलत्यासही[11] सु-लभ, आणखी गायका- ॥
छळी न, न [12]अधो-गति क्षणहि दे, जगन्नायका ॥ २० ॥ (७५)
छळाल कृपणासि कां अजि दया-निधे, कापिती- ॥
भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु, अहो शरण्या [13]तमीं- ॥

१ उतावळेपणा हा तुम्हीं माझा गुणच घेतला, ( दोष नव्हे असें मी समजतों ). २ भक्तरूप मोरांस मेघासारखा. ३ हें जग. ४ जरा (म्हातारपण) हाच यमाच्या सैन्याचा पांढरा ध्वज. ५ अग्रभागीं येणाऱ्या रोगांबरोबर. ६ आपला शत्रु—मृत्यु. ७ कथारूप कामधेनु. ८ त्यांस पान्हा फुटतो. ९ आपल्या वत्सांचा मल म्हणजे पुरीष, पक्षीं—पातक. १० तिसऱ्या व चौथ्या चरणांत सांगितलेला गुण. ११ अनधिकाऱ्यासही. १२ विष्णूनें वामनावतारीं बळीशीं कपट केलें व त्यास अधोगति दिली म्हणजे पाताळांत घातलें ही गोष्ट सुचवून कवीनें ईश्वरापेक्षां नामाचें महत्त्व वर्णिलें आहे. १३ अज्ञानांधकारांत.

बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत[1] मी ॥ २१ ॥ ( ७९ )
तयीं[2] प्रभु-वरा तसे स-दय, कां असे[3] आज हो- ॥
विचारुनि पहा बरें निज-मनीं महा-राजहो ॥
वनोवनिं फिरां पिशापरि म्हणां अहो-रात्र हा[4] ॥
नसे कुशल भाषणीं परि असे कृपा-पात्र हा ॥ २२ ॥ ( ८१ )
न जें प्रिय स-दोष तें प्रिय स-दोषही चांगलें ॥
स्व-तोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें ॥
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ॥
जरी मळविशी [5]रजो-मलिन-काय तूं अंबरें[6] ॥ २३ ॥ ( ८५ )
प्र-सिद्ध तुमचे महा-स-दय पाय, जीवांकडे- ॥
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे ॥
न निष्ठुर[7] पिता म्हणे मनिं न हो प्रजा टोणपी ॥
[8]अ-पथ्य-रुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ॥ २४ ॥ ( ८९ )
अ-संख्य खळ संगरीं निज-करीं तुवां मारिले ॥
न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले ॥
जगज्जनक तूं मुलें सकळ जीव, यां भातुकें ॥
दटावुनिहि देशि बा अ-मृत नेदिजे घातुकें ॥ २५ ॥ ( ९० )
सदाहि हित नायकों बहु अपाय केले करूं ॥
तरी स-कृप बाप तूं म्हणसि नायके लेंकरूं ॥
कधीं न करिसी प्रभो [9]भजक-बालकोपेक्षण ॥
न तूजवरि ज्यापरी [10]पशु-प-पाळ कोपे क्षण ॥ २६ ॥ ( ९२ )
पिता जरि विटे विटो न जननी कु-पुत्रीं विटे ॥

१ संसाररूप अरण्यांत. २ रामावतारीं सीता रावणानें नेली असतां त्यावेळीं. ३ असे निर्दय. ४ हायहाय. ५ धुळीनें मळलें आहे शरीर ज्याचें. ६ वस्त्रें. ७ पिता ( बाप ) निर्दय नसतो; फक्त त्याच्या मनांत इतकेंच असतें कीं, आपली संतति मूर्ख न व्हावी, म्हणून तो तीस शासन करितो. ८ प्रकृतीस न मानणाऱ्या पदार्थांविषयीं ज्याला आवड आहे असा—आम्हांला विषयाची गोडी असल्यामुळें पहिल्यानें कठीण वाटणारा असा जो सन्मार्ग तो कसा गोड लागेल? हा अर्थ एथें विवक्षित आहे. ९ भक्तरूप ( बालक + उपेक्षण ) लेंकराची उपेक्षा. १० गवळ्यांचा नायक—नंद.

[1]दयामृत-रसार्द्र-धी न [2]कुल-कज्जलें त्या किटे[3] ॥
[4]प्रसाद-पट झांकिती परि परा[5] गुरूचे[6] थिटे ॥
म्हणूनि म्हणती भले न ऋण जन्म-देच्चें फिटे ॥ २७ ॥ (९५)
अशी तरि कृत-ज्ञ-ता हरि तुझ्याच ठायीं अगा ॥
सख्या अणुचि मानिसी करुनि सु-प्रसादा [6]अ-गा ॥
भुले [7]सु-कवि-वाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा ॥
म्हणेल जन कोण कीं यश पुनःपुन्हा तें न[8] गा ॥ २८ ॥ (९९)
करा श्रवण एवढें अ-पटु लोक हांसो मला ॥
अहो जरि गिळावया प्रिय कुमार घे सोमला ॥
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी ॥
तिला स्व-शिशु-वंचनें अ-दय-ता शिवे काय जी ॥ २९ ॥ (१०६)
सु-सं-गति सदा घडो सु-जन-वाक्य कानीं पडो ॥
कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो ॥
[9]सदंघ्रि-कमळीं दडो मुरडितां हटानें अडो ॥
वि-योग घडतां रडो मन[10] भवच्चरित्रीं जडो ॥ ३० ॥ (११८)
न निश्चय कधीं ढळो कु-जन-विघ्न-बाधा टळो ॥
न चित्त भजनीं चळो मति सदुक्त-मार्गीं वळो ॥
स्व-तत्त्व हृदया कळो दुरभिमान सारा गळो ॥
पुन्हा न मन हें मळो दुरित आत्म-बोधें जळो ॥ ३१ ॥ (११९)
मुखीं हरि वसो तुझी [11]कुशल-धाम नामावली ॥
क्षणांत पुरवील जी सकळ कामना मावली ॥
कृपा करिशि तूं जगत्रय-नि-वास दासांवरी ॥
तशी प्र-कट हे[12] निजाश्रितजना सदा सांवरी ॥ ३२ ॥ (१२०)
दयामृत-घना अहो हरि वळा मयूराकडे ॥
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥

१ दयारूप अमृतरसानें स्निग्ध आहे अंतःकरण जिचें अशी. २ कुलाला कलंक लावणारा जो पुत्र त्याच्या योगानें. ३ मळत नाहीं, म्हणजे तिची त्याच्यावरची ममता कमी होत नाहीं. ४ प्रसादरूप वस्त्रें. ५ श्रेष्ठ बापाचें. ६ पर्वतप्राय. ७ सुकवींची वाणी हीच उपवर कन्या. ८ नको गाऊं. ९ साधूंच्या चरणकमलीं सक्त होवो. १० हा शब्द दडो इत्यादि क्रियापदांचा कर्ता. ११ कल्याणाचें केवळ स्थानच अशी. १२ नामावली.

असा अ-तिथि [1]धार्मिक-स्तुत-पदा कदा सांपडे ॥
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ ३३ ॥ ( १२१ )

## अंबरीषाख्यान.

( श्रीमद्भागवत स्कंध ९ अ० ४ व ५ ).

मागें **सूर्यवंशांत अंबरीष** या नांवाचा राजा होऊन गेला. तो परम विष्णुभक्त असल्यामुळें एकादशीव्रत करीत असे. एके दिवशी साधन-द्वादशीचा काल अगदीं थोडा असतां त्याजकडे **दुर्वास** ऋषि गेला. राजानें ऋषीचा सत्कार करून त्यास भोजनास बोलाविलें. तें ऐकून ऋषि **कालिंदीवर** स्नानास गेला. तिकडून यावयास त्यास उशीर लागला असें पाहून व भोजनास उशीर केला असतां साधनद्वादशीचा काल निघून जाईल म्हणून राजानें तीर्थप्राशन केलें. आपणास टाकून आधीं राजानें पारणा केली म्हणून दुर्वासास फार राग आला. त्यानें आपल्या जटेंतून एक कृत्या उत्पन्न करून तिला राजाचा छल करण्यास सांगितलें. **श्रीविष्णूनें** राजाच्या रक्षणाकरितां सुदर्शनचक्र मागेंच दिलें होतें, त्यानें तिच्यावर एकदम चाल केली. तेव्हां ऋषि तेथून भिऊन पळाला. चक्र त्याच्या मागें लागलें. ऋषि **ब्रह्मलोक, कैलास** इत्यादि लोक फिरला परंतु त्यास आश्रय कोठें मिळेना. शेवटीं तो **वैकुंठीं** विष्णूस शरण गेला व चक्रापासून रक्षण करण्याविषयीं त्याची प्रार्थना करूं लागला. मी भक्ताधीन आहें माझ्या भक्तालाच शरण जा, याशिवाय रक्षणाचें दुसरें साधन नाहीं असें विष्णूनें सांगितल्यावरून **दुर्वास** हा पुनः **अंबरीषाकडे** परत आला व त्यास शरण गेला. त्याची ती स्थिति पाहून राजाला दया आली व त्यानें हात जोडून चक्राची प्रार्थना केली व त्यास मागें फिरविलें. ही कथा एथें वर्णिली आहे.

### श्लोक.

स्रग्धरा. अत्युग्र ब्रह्म-शापादिकहि हरि-जना ताप नेदीच कांहीं ॥
जो कोणी देव-दास-च्छळक खळ तया रक्षिता अन्य[2] नाहीं ॥

---

१ धर्मशील जनांनीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं असा तुला. २ साधूंवांचून इतर.

रक्षी साधूचि येतां शरण निपटुनी त्यागितां उद्धत-त्व ॥
ज्ञाते हें अंबरीष-क्षिति-पति-चरितीं पाहती शुद्ध तत्त्व ॥ १ ॥

शा॰वि॰. दुर्वासा भगवान् करी छळ बळें हें तत्त्व दावी जनीं ॥
कीं माझीहि अशी दशा हरि-जन-द्वेषें धरा हें मनीं ॥
दैवें भागवतीं[1] वि-रोध घडतां त्यांचीं धरा पावलें ॥
सं-सारांत तरा, म्हणाल मजला खोटा म्हणा [2]पावलें ॥ २ ॥

,, पूर्वी भू-पति अंबरीप रविच्या वंशीं महात्मा असे ॥
धर्मे राज्य करी सदैव भगवद्भक्तांत भावें वसे ॥
भासे सिंहचि संगरांत गमती तच्छत्रु राजे ससे ॥
तो शांतांत[3] नितांत[4] शांत कमळा-कांतींच चित्तें वसे ॥ ३ ॥

,, राजा साधु-समागमें समजला सं-सार निः-सार-सा ॥
सेवी श्री-पतिच्या पदा अलि जसा अत्यादरें सारसा ॥
नामाची धरि कास दास करुनी सद्भक्तिचा आसरा ॥
प्राशी निर्मल विष्णुचेंचि यश जें हांसे सुधेच्या सरा ॥ ४ ॥

,, ज्यांमध्यें बहु दाक्षिणा सु-विधिवत् विप्रादि-सं-तर्पण ॥
प्रेमें यज्ञ करूनि सर्व करि ते श्री-विष्णुला अर्पण ॥
आंगें होउनि [5]सत्तपो-हुत-वहीं तो सर्वदा सर्पण ॥
स्वच्छ-त्वें नृ-प ज़ाहला सु-मणिचा जैसा नवा दर्पण ॥ ५ ॥

,, तो भूतीं सम-दृष्टि साधु-भजनीं राबे सदा सांवरी ॥
आंगें [6]दृग्विकळादिकांसि, भर[7] हा टाकी न दासांवरी ॥
सेवेवांचुनि आपुल्या न विषयीं याचें शरीर क्षण ॥
श्रीशें जाणुनि हें सु-दर्शन दिलें त्याचें करी रक्षण ॥ ६ ॥

स्रग्धरा. सोडीना सु-व्रतें तो जसिं जल-धि-जलें तापलें याद[8] शीतें ॥
विष्णु-प्रीत्यर्थ वर्षाऽवधि करुनि करी [9]साधन-द्वादशीतें ॥
गेला निर्विघ्न सिद्धी-प्रति नि-यम [10]नें त्या लागलें शब्दें, सारीं ॥
कीर्ति श्री-माधवाच्या सतत परिसतां संपला अब्द सारा ॥ ७ ॥

---

१ भगवद्भक्तांच्या ठिकाणीं. २ पुरवलें. ३ शांत अंतःकरणाचा. ४ अत्यंत. ५ (सत्+तपस्+हुतवह,) चांगलें तप हाच अग्नि त्यांत. ६ आंधळे वगैरे व्यंग लोकांस. ७ ओझें. ८ जलचर प्राणी. ९ एकादशीचा उपवास करून दुसऱ्या दिवशीं द्वादशी तिथि संपली नाहीं तों पारणा सोडावयाची त्यास साधनद्वादशी म्हणतात. १० दोष लागला नाहीं. ११ श्रेष्ठ.

शा०वि०. गो-दानें शुभ साठि लक्ष नृ-प दे विप्रोत्तमांकारणें ॥
दे वाजी गजही जयांसि हरिच्या[1] गावें हयें वारणें ॥
तर्पी ब्राह्मण-वृंद तृप्ति अ-तुला दावी तयां अन्न ती ॥
देवांलाहि न दे स्वयें अ-मृत तें यातें[2] करी सन्नती ॥ ८ ॥

" स्वाद्वन्नें परमादरें करुनियां विप्रोत्तमां तर्पुनी ॥
त्यांतें कांचन दक्षिणा सु-वसनें सद्भूषणें अर्पुनी ॥
आज्ञा घेउनियां व्रतोक्त-नि-यमा रक्षावयाकारणें ॥
तो राजेंद्र करी उप-क्रम सुखें साधावया पारणें ॥ ९ ॥

" तों जो केवळ सर्व कालहि तपस्येसीं सुखें रातला ॥
ज्याच्या उग्रपणा प्रणाम अ-सकृत् कल्पानलें घातला ॥
जेणें शक्रहि[3] शिक्षिला जइं महा संपन्मदें मातला[3] ॥
दुर्वासा भगवंत तो अ-तिथि त्या काळीं स्वयें पातला ॥ १० ॥

पुष्पिताग्रा. मुनिस निरखितांचि होय दास ॥
प्र-मुदित जेविं मयूर तोय-दास ॥
नमुनि बसविला वरासनींच ॥
स्तवि नृ-प जेवि उमा-वरास नीच[4] ॥ ११ ॥

द्रु०वि०. अ-मृत-सिंधु तुम्हीच विभो जनीं ॥ जरि धरा न तुम्ही चवि भोजनीं ॥
मदुदयार्थ अहो तरि जेमन[5] ॥ प्रभु करूनि सुखी करिजे मन ॥ १२ ॥

व०ति०. ऐसें हळूचि नृ-प जोडुनि हात याची ॥
ती आयकें विनवणी मुनि हा तयाची ॥
स्नानार्थ जाय मग नायक तापसांचा ॥
कृष्णेसि जी नुरवि लेशहि ताप साचा ॥ १३ ॥

हरिणी. प्रथम अमृतीं कालिंदीच्या करी [6]मति-मज्जन- ॥
स्तुत-पद[6] मग ब्रह्म-ध्यानामृतीं अति मज्जन ॥
उठविल कसा सुप्त स्वांकीं महा अहि, साधुनीं ॥
शुचिपण दिलें तीर्थीं गंगादिकांसहि साधुनी ॥ १४ ॥

पृथ्वी. उशीर बहु लागतां नृ-पति पावला आधिला ॥

१ इंद्राच्या. २ अन्नातें. ३ दुर्वास ऋषीनें, इंद्र ऐश्वर्यानें मदोन्मत्त झाला होता म्हणून, त्यास शाप दिला होता कीं तुझी संपत्ति समुद्रांत पडेल. ४ पामर. ५ जेवण. ६ बुद्धिमान् लोक (मतिमत्+जन) यांनीं स्तविले आहेत पाय ज्याचे असा दुर्वास ऋषि. ७ मिळवून.

म्हणे [1]नियम-पारणा-समय पाहिजे साधिला ॥
तपो-व्रत-जप-क्रतु-प्र-मुख-धर्मही साधुनी ॥
मनेंहि न वि-लंघिला अ-तिथि-सत्क्रिया साधुनीं ॥ १५ ॥

द्रु० वि०. परम संकट तें मन घाबरें ॥ करि म्हणोनि तया अनघा बरें ॥
श्रुति-मत द्विज सांगति वारितें-॥ पिउनि हो अघ हें स्थिर वारितें ॥ १६ ॥

मालिनी. अशन न जल-पानें होय पीतांहि पाणी ॥
"[2] अनशनहि नव्हेचि स्पष्ट हे वेद-वाणी ॥
श्रुतिस अनु-सरे जो त्यासि कोणी न दापी ॥
म्हणुनि मुनि-मतें तो तोय राजा तदा पी ॥ १७ ॥

स्रग्धरा. तों दुर्वासा करूनि स्नपन[3] जप[3] बृहद्ध्यान[3] तत्काळ आला ॥
प्याला भूपाळ पाणी त्यजुनि अ-तिथिला यास्तव क्रुद्ध झाला ॥
अत्युष्ण श्वास टाकी अहि खवळविला मांत्रिकें तेवि डोले ॥
तोले[4] कल्पांत-रुद्रास[4] न[4] मग भगवान् तो असें त्यासि बोले ॥ १८ ॥

पृथ्वी. अरे कु-मति दुर्जना गुरु अ-लंघ्य तें पारणें ॥
न मी गुरु अ-लंघ्य हें स्व-मत ह्या[5] जनाकारणें[5] ॥
स्वयेंचि कळवावया प्रथम आदरें वाहिलें ॥
असें मग वि-लंघिलें नवल आजि म्यां पाहिलें ॥ १९ ॥

स्रग्धरा. हा दुर्वासा अ-लंघ्य त्रि-भुवनिं सकळां भू-सुरांमाजि राया ॥
सत्कार प्राप्त झाला बहु बहु दिवसां ब्राह्मणा साजिरा या ॥
आम्ही सेवानु-रूप त्वरितचि फळतों त्या वृथा वाद[6] पांचा ॥
देवांच्या[6] सु-प्र-सिद्धा भजक-जन-तृषा-पूरकां पाद-पांचा[6] ॥ २० ॥

प्रहर्षिणी. कर्माचा तुज परि-पाक चाखवाया ॥
आलों मी निज-पुरुषार्थ दाखवाया ॥
दुर्वासा अव-गणिला तुवांचि शील- ॥
भ्रष्टा न [7]क्षत-सु-कृतायु वांचशील ॥ २१ ॥

स्रग्धरा. ऐसें बोले प्र-बद्धांजलि-नर-पतिला क्षोभ त्या तापसाचा ॥

१ नेमलेली पारण्याची वेळ. २ वेदाला संमत गोष्ट. ३ स्नान, जप व (बृहत्+ध्यान) ब्रह्मचिंतन. ४ प्रळयकाळींच्या शिवादींही ज्याची तुलना करतां येणार नाहीं असा. ५ मला. ६ पांचें कल्पतरूंचा. कल्पतरु हे इच्छिलेलें फळ तत्काळ देतात हें लोकांतील म्हणणें. ७ ज्याचें पुण्य व आयुष्य क्षीण झालें आहे असा तूं.

सांगावा काय भासे निज-मणि-हरणें कोपला साप साचा ॥
दुर्वासा [1]वज्रि-ताप-प्र-द परि अनिळें वृक्षसा कांपवीला ॥
जेणें[2] तो कोप लज्जा [3]जड-भय-द-बळा त्या न दे कां पवीला ॥ २२ ॥

अनुष्टुप्. जटा तोडूनि हुंकार-सु-महा-नाद सोडिला ॥
तोडावें जेविं लीलेनें कंबलाच्या दसोडिला ॥ २३ ॥
सु-लभा भार-भूता जी त्यजिली ते जटा किती ॥
कोपी दुर्लभ कष्टेंही जोडिलें तेज[4] टाकिती ॥ २४ ॥

शालिनी. झाली उग्रा त्या जटेचीच [5]कृत्या ॥ धांवे खाया त्या नृ-पा विष्णु-भृत्या ॥
तों ती दुष्टा देखिली [6]देवं-चक्रें ॥ जैशी [7]व्याळी स्वार्ति-दा [8]पक्षि-शक्रें ॥ २५ ॥

स्रग्धरा. ज्याचें [9]शंभु-स्वयं-भु-प्रभृति-सुर यश प्रार्थिती पूत नाकीं ॥
त्या रामें ताटिका ती जशि ताशि अथवा मा-धवें पूतना कीं ॥
सद्बोधानें अ-विद्या जसि तसिच महा-भीति-दा [10]विप्र-कृत्या ॥
जी उग्रा विष्णु-चक्रें त्वरित निवटिली ती तदा [11]वि-प्र-कृत्या ॥ २६ ॥

प्रहर्षिणी, ऐसा हा बहुताचि वि-प्रकार भारी ॥
योजी जो हरि-जनिं विप्र कारभारी ॥
त्या चक्र त्रि-भुवन-कंप-दास दापी ॥
जें [12]सर्वाहित-बळ-संपदा सदा पी ॥ २७ ॥

स्रग्धरा. जैसें दावानळानें प्र-खरतर बळें काननीं सापिणीचें ॥
चक्रानें भस्म सद्या करुनि उडवितां त्या महा पापिणीचें ॥
दुर्वासा भीति पावे बहुतचि सहसा गर्व त्याचा गळाला ॥
सिंह-त्रस्त-द्विपेंद्रासम मग भगवान् तो महात्मा पळाला ॥ २८ ॥

,, होतां अत्युग्र कृत्या परि करुनि तिचा घात दावी प्र-तापा ॥
जेव्हां तें चक्र, पावे बहुत निरखितां त्या तदा विप्र तापा ॥
प्राण-त्राणार्थ धैर्य त्यजुनि मुनि पळे सत्तप:-संपदतें ॥
वेंची व्यर्थ क्षणांत, [13]प्रभु-जनिं रचिलें वैर तें कंप देतें ॥ २९ ॥

---

१ इंद्राला ताप देणारा. २ ज्या कोपानें. ३ जड जे पर्वत त्यांस भय देणारें आहे सामर्थ्य ज्याचें असा. ४ मोठेपणा, प्रतिष्ठा. ५ राक्षसी. ६ सुदर्शनानें. ७ अत्यंत पीडा देणारी (सु+आर्ति+दा). ८ गरुडानें (पक्षि+शक्र-शक्र म्ह. इन्द्र म्ह. श्रेष्ठ). ९ शंकर, ब्रह्मदेव आदिकरून देव. १० ब्राह्मणानें उत्पन्न केलेली कृत्या (एक अति रूप अकाळविक्राळ व्यक्ति). ११ मोठा नाश करणारी. १२ सकळ शत्रुवधाच्या संपात. १३ भगवद्भक्तांविषयीं.

भु॰प्र॰. पळे विप्र तो चक्र पार्थास लागे ॥ असे सर्व दिङ्-मंडळीं फार भागे ॥
न सोडीच तें जेविं केलें स्वकर्म ॥ असे साधु वैरें न पावेचि शर्म ॥३०॥

मालिनी. मग करुनि विचार ब्रह्म-लोकासि गेला ॥
नमुनि विधि-पदातें हस्त जोडोनि ठेला ॥
व्यसन सकळ सांगे-प्राण-दानासि याची ॥
स-चकित परिसे तो प्रार्थना ती तयाची ॥ ३१ ॥

व॰ ति॰. ब्रह्मा म्हणे [1]भगवदिष्ट-जनीं न घाला ॥
तूं घालितासि करितासि न या अघाला ॥
देतां तुला व्यसन-सागरिं हात पेंचें ॥
क्षिप्र स्वयें नुरवितींच महा-तपेंच ॥ ३२ ॥

,, विश्वांत मुख्य म्हणतां मजला जनांहीं ॥
तें काय गा परिसितां मज लाज नाहीं ॥
ज्याच्या भयें धरितसे [4]मणि-सानु कंप ॥
श्री-कांत तोचि विधिचा धणि सानुकंप ॥ ३३ ॥

स्रग्धरा. आम्हीं ज्याचें धरीतों धरिति मनिं जसें सासवेचें सुनाभें ॥
त्याच्या मूर्त-प्र-तापें सदवन-निपुणें दुष्ट-काळें [5]सु-नामें ॥
जेव्हां हा क्षोभ केला तुजवरि मज हें वाटतें फार भारी ॥
क्रुद्ध झाल्या प्रभूचें मन वळवुं शके कोण गा कारभारी ॥ ३४ ॥

शा॰वि॰. ब्रह्म्यानें शरणागताहि मुनिला नाहीं दिला आसरा ॥
लत्ता मारिल काम-धेनु भगवद्भक्ताहिता वासरा ॥
वाटे [6]सद्रिपुचा न ताप हरिल [7]श्री-शंभुचा [7]सासरा ॥
तान्हेलाचि मरेल पावुनिहि तो जाणो सुधेच्या सरा ॥ ३५ ॥

स्रग्धरा. दुर्वासा ब्रह्म-लोकाहुनिहि परतला तापला विष्णु-चक्रें ॥
गेला मृत्युं-जयाला शरण मग जया सेविती योगि-चक्रें ॥
कैलासीं शं-कराला नमन करि म्हणे ईश्वरा आसरा हो ॥
वांचो त्वच्चिंतनार्थं द्वि-ज निज-भजकांमाजि हा दास राहो ॥ ३६ ॥

,, त्या विप्राला म्हणे तो त्रि-पुर-हर अगा एक गा बा मला जे ॥
प्राणी तापार्थ कोणी स्मरति मनिं न त्यां रक्षिता नाम लाजे ॥

---

१ सुख. २ भगवंताला प्रिय अशा लोकांवर. ३ संकटें. ४ रत्नाचीं आहेत सानु (शिखरें) ज्याचीं असा मेरुपर्वत. ५ चक्रानें. ६ साधूंच्या शत्रूचा. ७ हिमालयपर्वत.

नाशावे [1]ताप-पाप-प्र-कर भुज दहा वाहतों याच काजा ॥
आम्ही निः-शेष वांछा पुरवुनि म्हणतों, आदरें याचका जा ॥ ३७ ॥

शा॰वि॰. रक्षावे शरणागत व्रत असें माझें असे, लक्षिलें ॥
[2]जे काळाकुळ जीव ते सकळही तत्काळ म्यां रक्षिले ॥
मार्कंडेय-कथा तुझ्या श्रुति-पथा आली असावी क्षण ॥
[3]ध्यान-स्तोत्र-परा जना सुखवितें माझें [4]कृपा-वीक्षण ॥ ३८ ॥

स्रग्धरा. या ऐशा रीति नीति श्रवण करुनियां सेवितां मद्यशाला ॥
साधूंला अन्य वार्ता गमति सु-मतिच्या मोहका [5]मद्य-शाला ॥
यासाठीं तूं तपस्वी मुनि शरण महा-संकटीं पातलासी ॥
[6]त्राहि त्राहीश ऐसें म्हणुनि मज नमस्कारही घातलासी ॥ ३९ ॥

स्वागता. भस्म मी करिन गा शत कोटी ॥ काळ-दंडहि किती [7]शत-कोटी ॥
वारणाप्रति जसें [8]हरि-चक्र ॥ स्पष्ट हें मज तसें हरि-चक्र ॥ ४० ॥

मालिनी. परि-हरिन नताचे मी स्वयें ताप सारे ॥
परि गुरु [9]अ-जिताचें शस्त्र हें तापसा रे ॥
मज बळ न असे बा याचिया वारणासी ॥
हरि-वध [10]हरिच्याही होइना वारणासी ॥ ४१ ॥

अनुष्टुप्. करूनि काय जिंकील रविला काजवा रण ॥
करील [11]गज-वक्राचें काय गा काज वारण ॥ ४२ ॥

शा॰वि॰. आम्ही सर्वहि दास त्यास भजतों तच्छासनीं वागतों ॥
रक्षाया स्व-जनांसि शक्ति-धन त्या विश्वं-भरा मागतों ॥
अस्मत्पालन-लालनादि करितो स्नेहार्द्र तो बापसा ॥
त्याची ज्यावरि त्यावरीच करितों आम्ही दया तापसा ॥ ४३ ॥

पृथ्वी. सुतासि गुरुच्या गृहा दवडितो जसा बाप हा ॥
तसा शिव न रक्षणीं पटु जरी तरी बा पहा ॥
उपाय कथितों तुला व्यसन हें सराया, पदा ॥
सु-दर्शन-धराचिया धरिं, हरील तें आपदा ॥ ४४ ॥

---

१ ताप आणि पाप ह्यांचे समुदाय २ मृत्यूनें व्याकूळ केलेले. ३ ध्यान आणि स्तुति यांमध्ये निमग्न. ४ कृपेचें अवलोकन. ५ दारूचे पिंप. ६ रक्षण कर. ७ वज्र. ८ सिंहांचा समुदाय. ९ अपराजित अशा विष्णूचें. १० इंद्राच्याही. ११ हत्तीचें आहे मुख ज्याला अशा गणपतीचें.

शिखरिणी. क्षमस्व [1]श्री-जाने म्हण, शरण जा त्याचि हरिला ॥
उदंडांचा तेणें प्रणति करितां ताप हरिला ॥
दया-पीयूषाब्धि प्रभु-वर [2]जगद्भावन, मनीं ॥
न ठेवी दोषातें [3]क्षमि-तिलक सद्भाव-नमनीं ॥ ४५ ॥

स्रग्धरा. सांगे नाम क्षुधार्ता स-दय जन जसें आदरें अन्न-दाचें ॥
" कीं दावी वर्त्म जैसें परम तृषित जो पांथ त्या सन्नदाचें ॥
वैद्याचें गेह रुग्णा सु-मति कथि तसें या द्विजा शंभु लावी ॥
वैकुंठाच्या पथीं कीं पुनरपि न असी बुद्धि त्याची भुलावी ॥४६॥
दुःख-घ्नी ओषधी जी असि कथि [4]भगवल्लोक-पद्या पिनाकी ॥
श्रद्धेनें सेविती हो पिउनि अ-मृतही जीस अद्यापि नाकी[5] ॥
पावे[6] तीतें वरूनि द्विज, अ-मित पितां [7]दैत्य-चक्रायु धाला ॥
नाहीं कांहींच ज्याचा भुज-भुज-ग तया दिव्य [8]चक्रायुधाला ॥४७॥

अनुष्टुप्. पाहिला प्राशिता दैत्य-चक्रायु धरणी-तळीं ॥
भरिता रक्त-पूरें जो चक्रायुध रणीं तळीं ॥ ४८ ॥
" गेला शरण वैकुंठीं हरितें परि तें तया ॥
चक्र दे वक्र देवाच्या भक्तीं म्हणुनियां भया ॥ ४९ ॥
" क्षिप्र तो क्षिप्र तोयासी मीनसा प्रभुच्या पदा ॥
कवळी जवळी प्रेमें ज्याच्या श्री [9]मधु-पी सदा ॥ ५० ॥
" म्हणे करूनि स्वद्भक्तीं अप-राध परा-भवा ॥
पावलों मज या ऐशा [10]अ-क्षमा रक्ष मा-भवा ॥ ५१ ॥
" [11]अ-मळा-कमळा-केलि-भवना भव-नाशना ॥
पावना पाव नाशीं या [12]व्यसनास सनातना ॥ ५२ ॥

शा॰वि॰. दुष्टाही शरणागता अ-भय दे पाहे न तोटा [13]कवी ॥
स्वत्पादाब्ज-पराग दुर्गुण असे जो सर्व तो टाकवी ॥
तीर्थांची कुळ-देवता त्रि-भुवन-ख्याताहि गंगा सती ॥

---

१ हे विष्णो (लक्ष्मी आहे जाया ज्याची). २ जगदुल्लासकर्ता. ३ सहनशील पुरुषांमध्ये श्रेष्ठ. ४ विष्णुलोकाचा मार्ग. ५ स्वर्गलोकांत राहणारे देव. ६ येऊन पोहोंचला. ७ दैत्यांच्या समुदायाचें आयुष्य. ८ परम तेजस्वी जें चक्र तें आहे आयुध ज्याचें अशा विष्णूला. ९ भ्रमरी. १० आह्लादकारी जो मी त्या मला. ११ पवित्र आहे जी लक्ष्मी तिचें क्रीडास्थान अशा. १२ संकटास. १३ ज्ञाता.

जी विकार करील काय शिवतां रथ्यांबु[1] अंगास ती ॥ ५३ ॥

शिखरिणी. जरी साधु-द्वेष्टा द्वि-ज सकळ-लोकीं अधम हा ॥
तरी सत्कीर्तीचा क्षय-करचि याचा वध महा ॥
क्षमा-शीला देवां वद न कवणा मोह चुकवी ॥
असें जो जाणोनि प्रभु करि कृपा तोचि सु-कवी ॥ ५४ ॥

अनुष्टुप्. येती शरण जे त्यांचें करिती संत रक्षण ॥
जाणते न पडों देती या व्रतीं अंतर क्षण ॥ ५५ ॥

शा॰वि॰. वारावें निज-चक्र हें बहु मला देवा पहा भाजितें ॥
जें ब्रह्मण्य[2] शरण्य[3] हें यश तुझें रक्षीं प्रभो आजि तें ॥
चित्तीं आणुनि दोष रोष न धरीं विप्रास या वांचवीं ॥
भीताला अ-भय-प्र-दान करुनी सत्कीर्तिला सांचवीं ॥ ५६ ॥

शिखरिणी. जयाच्याठायींच स्थिर करुनियां संतत रती ॥
अ-सारा संसाराप्रति बहु-सुखें संत तरती ॥
मुकुंदाचे तो ते[4] सुर-तरु-गुरू-पाय नमुनी ॥
असें चक्र-त्रासें करुनि वदला काय न मुनी ॥ ५७ ॥

अनुष्टुप्. भक्ताभिमानी भगवान् वदला तेंचि आयका ॥
करूनि नमन प्रेमें त्याचि[5] लोकैक-नायका ॥ ५८ ॥

स्रग्धर. मी भक्ताधीन, भक्त प्रिय मज न तसें आवडे अन्य, काय ॥
श्री, जेथें सान वाटे[6] तदधिक मजला आपुला धन्य काय ॥
माझी सेवाचि मोक्षाहुनिहि बहु-मता ज्यांसि जे अंतराय ॥
ध्यानीं होऊं न देती क्षणहि बहु मला मान्य ते संत-राय ॥ ५९ ॥

मालिनी. त्यजुनि धन-सुत-स्त्री-देह-गेहादि काम ॥
स्मरति मजचि गाती नित्य माझेंचि नाम ॥
भजति भजन-कामें जे मला त्यांसमान ॥
प्रिय इतर न, देऊं मी न कां त्यांस मान ॥ ६० ॥

शा॰वि॰. भक्तीनें वश सत्पतीस करिती साध्वी, मला मज्जन ॥
प्रेमांभो-निधि संत त्यांत करितों मी मीनसा मज्जन ॥

---

१ रस्त्यांतले पाणी. २ ब्राह्मणविषयीं दयाळु. ३ शरण आलेल्याचें रक्षण करणारें ४ कल्पवृक्षाचे गुरु असे पाय. ५ लोकांचा एक नायक म्हणजे मुख्य नायक जो विष्णु त्याला. ६ लक्ष्मीहून अधिक.

त्यांला मीच मलाहि तेच रुचले ते हंस मी मानस ॥
श्री त्यांहींच मला मदीय-भजनें त्यांचें सुखी मानस ॥ ६१ ॥

अनुष्टुप्. सर्व-स्व मी सज्जनांचें माझें सर्व-स्व सज्जन ॥
पावेन मी न पावेल कधीं मज्जन मज्जन ॥ ६२ ॥

” सु-दासीं न उदासीन [1]प्राकृत-प्रभुही मनीं ॥
कसा दास प्रसादास माझा पात्र नव्हे जनीं ॥ ६३ ॥

शा॰ वि॰ लोकीं नि-स्पृह मी सदा अ-जित मी चित्तीं उदासीन मी॥
स्वाधीन प्रभु हें खरेंचि परि [2]या भावें सु-दासीं नमी ॥
बापा [3]प्रेमळ-सज्जनाशय-महा-गंभीर [3]आवर्त तो ॥
जैसें वर्तवितो तसेंचि पडला त्यांमाजि [4]हा वर्ततो ॥ ६४ ॥

स्रग्धरा. साधूंचा त्याग अर्ध-क्षणहि न करवे आमुचे देव संत ॥
श्री दे सत्संग आम्हां जसि करुनि कृपा कानना दे वसंत ॥
संतांसीं वक्र जो तो खल [5]मल-जल-धी पावतो आपदेतें ॥
त्याला त्याचेंचि पाप [6]प्रळय-शत-शत ब्राह्मणा ताप देतें ॥ ६५ ॥

घनाक्षरी. ते न जाणती मदन्य ॥ मीही न जाणें तदन्य ॥
वर्णूं किती तैसे धन्य ॥ तेचि एक पाहिले ॥ १ ॥
त्यांच्या गुणा नसे अंत ॥ भक्ति-ज्ञान-भाग्यवंत ॥
दया-क्षमा-निधी संत ॥ माझ्या मनीं राहिले ॥ २ ॥
मीही नव्हें त्यांचें मोल ॥ संत-सिंधु बहु खोल ॥
त्यांहीं निंदकाचे बोल ॥ तैसे त्यां न साहिले ॥ ३ ॥
साधु बाप साधु माय ॥ साधु [7]मंद-रांचे राय ॥
साधूंचे पवित्र पाय ॥ आम्हीं माथां वाहिले ॥ ४ ॥ ६६ ॥

पृथ्वी. तुला वि-कळ पाहतां मम मन श्रमें घाबरें ॥
गमेल निज-चातक-व्यसन काय मेघा बरें ॥
उपाय कथितों करीं नमन त्याचि संता, पहा ॥
चमत्कृति, हरील तो नृपचि सर्व सं-ताप हा ॥ ६७ ॥

---

१ लौकिकांतले प्रभु म्हणजे राजे वगैरे. २ मी ह्या उत्तम भक्ताला प्रेमानें नमून आहें. ३ प्रेमळ असें जें सज्जनांचें अंतःकरण हाच मोठा खोल भोंवरा. ४ मी. ५ दोघांचा समुद्र. हें खलाचें विशेषण. ६ प्रळयांच्या शताचें शत म्हणजे शेंकडों प्रळयपर्यंत. ७ कल्पवृक्षांचे.

पुष्पिताग्रा. हरि-जनाचि खरे सखे दरा हे ॥
नुरविति यां नमितां न खेद राहे ॥
न निववितिं जरी पदीं नर्मदा ॥
खळ म्हणुनि त्यजिती नदी न मीना ॥ ६८ ॥

हरिणी. चरण धरिले ज्यांहीं ते तों कधींहि न तापले ॥
कळकळविले सत्पादांनीं न आ-श्रित आपले ॥
अमृतहि पितां न स्वास्थ्याला वरील गदी[1] क्षण ॥
त्रुटि न भरतां नाशी सारेहि ताप सदीक्षण ॥ ६९ ॥

शा॰वि॰ त्वां केला [2]अभि-चार साधु-पुरुषीं जो तो तुला बाधला ॥
कोणालाहि निजेष्ट-लाभ न [3]सदुच्छेदोद्यमें साधला ॥
पाषाण स्व-शिरीं पडेचि गगनीं मित्रा[4]सि जो हाणिला ॥
कीं पाय ज्वलनीं जळेचि हृदयीं हा भाव कां नाणिला ॥ ७० ॥

अनुष्टुप्. साधूच्या लंघनीं होतो नीचाचा घात रोकडा ॥
बोकडा मारक नव्हे मेरूचा काय हो कडा ॥ ७१ ॥

स्रग्धरा. होतोचि प्राप्त मृत्यु स्व-भुज-बळ-मदें लंघितां अर्णवातें ॥
पावे गर्वें उडे तो पतन उडविलें ज्या परी पर्ण वातें ॥
ज्या दुष्टें सज्जनाचा अ-करुण-हृदयें चिंतिला घात, लागा ॥
पाठी त्या खा[5] न साधू म्हणति [5]परि अघीं तो मुखीं घातला गा ॥७२॥

अनुष्टुप्. विद्या तपस्या ज्या यांहीं भले ते विप्र तारिले ॥
खोटे [6]सुधा-मोहिनींहीं दैत्य तेविं प्र-तारिले ॥ ७३ ॥

शा॰वि॰ दुर्वासा मुनि हो, सदुक्ति स-रसा साक्षात् सुधेच्या नद्या ॥
सेवा लेशहि पाप ताप न उरो देवा तुम्ही मान द्या ॥
प्रार्था त्या नृप-सत्तमासि चुकलों रक्षीं म्हणा जा जगा ॥
तो रक्षीलचि साधु लक्षिति निजापत्यापरी ह्या जगा ॥ ७४ ॥

पृथ्वी. असें प्रभु वदे न दे अ-भय, अंबरीषाकडे ॥
मुनि त्वरित जाय त्या नृ-पतिच्याचि पायीं पडे ॥

---

१ रोगी. २ दुसऱ्याचा घात व्हावा म्हणून केलेला जारणमारणादि योग. ३ ( सत्+उच्छेद+उद्यम ) सज्जनांच्या नाशाच्या उद्योगानें. ४ सूर्याला. ५ त्या पाठी लागा (आणि) खा ( असें ) साधू ( अधांस ) न म्हणति, परि गा तो अघीं ( पातकांनीं ) मुखीं घातला असा अन्वय. ६ अमृत आणि मोहिनी ह्यांनीं.

द्वि-जें स्व-पद वंदितां सु-मति भूप तो लाजला ॥
तयाहुनि [1]तदद्भुत-व्यसन-पावकें भाजला ॥ ७५ ॥

व०ति०. पाहोनि ताप बहुतांपरि तापसाचा ॥
पावे तयापरिस तो परि-ताप साचा ॥
दे चक्र[2] ताप पळ-मात्र तपोनिधीतें ॥
ज्याच्या तसा सु-कठिना न तपोनि धीतें ॥ ७६ ॥

द्रु०वि०. वरि दिसे मृदु मौक्तिक पोवळें ॥ परि न लेश तदंतर कोवळें ॥
न तुळवे विधु अंकित तो मळें ॥ स-रस साधु-मनें शुचि कोमळें ॥७७॥

स्रग्धरा. मित्राप्तां[3] म्लानि देता जरि अमृत-रसालागिं हा चांद वीतो ॥
साधू तैसा कसा, जो सुखवुनि सकळ प्राणियां नांदवीतो ॥
साधूंच्या दर्शनानें अ-शिव तिथि अशी सर्वथा आढळेना ॥
साधूंचें तेज रात्रिं-दिव समचि न तें सोडुनी त्यां ढळेना ॥ ७८ ॥

,, राजा पाहोनि चक्रें करुनि अति-शयें ब्राह्मणा तापल्याला ॥
सर्वांगीं तप्त झाला उतरुनि मुनिचा काय तो ताप ल्याला ॥
वैकुंठास्त्रासि जोडी कर बहु विनवी, कोपतां फार भारी ॥
दासीं स्वामी तयाला स्व-पदर पसरी हा जसा कारभारी ॥ ७९ ॥

शा०वि०. चक्रा तूं भगवत्प्र-ताप [4]स-सुरा शक्रा तुवां रक्षिलें ॥
नक्राचेपरि भक्त-पीडन-परा वक्रा जना भक्षिलें ॥
पीडा लेश नसोचि या [5]श्रुति-शुकी-नीडा मुनीला पहा ॥
व्रीडा-कारक [6]विप्र-गंजन तुज [7]क्रीडारि-दर्पाप-हा ॥ ८० ॥

,, तूं गो-ब्राह्मण-धर्म-पाळक जगन्नाथ-प्रिय ख्यात कीं ॥
हें काय द्वि-ज-वर्य-पीडन बरें दुष्कीर्ति या पातकीं ॥
हो अन्वर्थ सु-दर्शना मुनि-वरीं दासीं दया दाखवीं ॥
[8]अत्यच्छ स्व-यशः-सुधा-रस रस-ज्ञात्या जना चाखवीं ॥ ८१ ॥

---

१ त्या दुर्वासाला जें अद्भुत संकट तोच अग्नि त्यानें. २ चक्र तपोनिधीतें (दुर्वासाला) पळमात्र (जसा) ताप दे तसा तपोनि ज्याच्या सुकठिना धीतें (मनाला) न (झाला नाहीं); असा अन्वय. ३ मित्र म्हणजे सूर्य त्याचे आप्त जीं कमळें त्यांस; पक्षीं मित्र आणि आप्त (सुहृत्संबंधी) त्यांस. ४ देवांसहवर्तमान. ५ श्रुति (वेद) ह्याच शुकी (पोपटीण) तिचें नीड म्हणजे घरटेंच; म्हणजे वेदांचें स्थान अशा दुर्वासऋषीला. ६ ब्राह्मणाला गांजणें. ७ (क्रीडा+अरि+दर्प+अप+हा) क्रीडेनें शत्रूचा गर्व हरण करणाऱ्या. ८ फार स्वच्छ.

पृथ्वी. कुळोचित तप-क्रतु-व्रत-जप द्विजोपासना ॥
असेल घडली मनीं जरि असेल सद्वासना ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ॥
नतीं करिं, हरीं प्रभु-प्र-हरणा दयाळो भया ॥ ८२ ॥
„ बुभुक्षित जना जसें रुचि-करेष्ट जें अन्न तें ॥
असल जरि अर्पिलें स-बहु-मान म्यां सन्नतें ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ॥
नतीं करिं, हरीं प्रभु-प्र-हरणा दयाळो भया ॥ ८३ ॥
„ कुळांत कुळ-देवता जरि नसेल विप्राधिका ॥
असेल गुरु-सत्क्रिया घडलि शुद्धिची साधिका ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ॥
नतीं करिं, हरीं प्रभु-प्र-हरणा दयाळो भया ॥ ८४ ॥
„ असेल जरि ईश्वर स्थिर-चरीं वरा पाहिला ॥
नसेल अणुमात्रहि क्षणहि भेद म्यां साहिला ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ॥
नतीं करिं, हरीं प्रभु-प्र-हरणा दयाळो भया ॥ ८५ ॥

व०ति०. गो-विप्र-दीन-शरणागत-याचकां मी ॥
झालों असेन वश तत्पर याच कामीं ॥
तैसाचि लुब्ध जरि [1]सत्परि-शीलनातें ॥
तूं दीन-बांधव खरें करिशील नातें ॥ ८६ ॥

स्रग्धरा. रक्षाया ब्राह्मणातें सु-कृत सकळही अर्पितां भू-प-शक्रें ॥
पावोनी क्षिप्र शांती-प्रति अ-भय दिलें त्या द्विजा विष्णु-चक्रें ॥
जें [2]क्षीरांभोधि-फेनामृत-शुचि दिधलें अंबरीषा नृपातें ॥
श्रोत्या वक्त्या जनांही सु-यश निववितें दावुनी सत्कृपा तें ॥ ८७ ॥

शिखरिणी. छळी अ-न्यायेंचि प्रणति करितांही तदपि त्या ॥
भजे विप्रीं जैसा सुत धरुनि माथां पद पित्या ॥
पडे स्पर्शीं[3] भेदास्तव जरि बळानें घ्रण, [4]मणी ॥
करी स्वर्ण स्पर्शें क्रिमपि न[5] महात्मा वणमणी ॥ ८८ ॥

---

१ साधूंच्या सहवासाला. २ क्षीरसागराचें फेसाळलेलें पाणी त्यासारखें पांढरें शुभ्र याचें विशेषण. ३ परिसावर. ४ स्पर्शमणि. ५ मागेंपुढें पाहत नाहीं (?)

मंदाक्रांता. श्री-रामाचा सु-गुण निववी जेविं गातां शिवाला ॥
श्री-दुर्वासा मुनि बहु तसा साधु-संगें निवाला ॥
भेटे भूपाप्रति अति-शमें तो करी प्रेम हर्षे ॥
पाद-प्र-क्षालन नृप म्हणे तैं करूं दे महर्षे ॥ ८९ ॥

शा० वि०. त्या भूपासि म्हणे मुनीश्वर सुधा सेवूनि कां जीभली ॥
ज्ञात्याची रसिकीं म्हणेल पुसतां गोडीस कांजी भली ॥
साधूंची तसि कीर्ति तत्सम दुजी नाहींच जीवां चवी ॥
श्रोत्रीं दावुनि, दुःसहीं भव-दवीं दग्धांसि जी वांचवी ॥ ९० ॥

,, लोकीं संत तुम्हीच धन्य तुमचें न स्तोत्र हें सत्य या ॥
विप्राच्या तुमचा अ-गाध महिमा आला नृपा प्रत्यया ॥
एकीं साधु-जनींच शांति करुणा मैत्री क्षमा सन्मती ॥
मुक्तांचे[1] इतर-त्र राशि न जसे रत्नाकरीं जन्मती ॥ ९१ ॥

स्रग्धरा. साधूवांचूनि अन्य त्रि-भुवनिं भुज-गा घातका जिव-दाना ॥
कोणी देईल काय क्षण तरि पुसतों सत्य कां जी वदाना ॥
देऊनी प्राण-दान छळक सुखविला धन्य बापा, मराया ॥
होता योग्य स्व-पापें तरिहि जिवविलें त्वांचि या पामरा या ॥ ९२ ॥

शा० वि०. लागों देति विधीश-विष्णु करितां नम्रीं न भद्र क्षण ॥
त्यांचें म्यां पद वंदिलें परि तिहीं केलें न मद्रक्षण ॥
साधो त्वां शरणागता मज महा-तापातुरा रक्षिलें ॥
नाहीं मत्कृत-पाप वा पर-हितोद्युक्ता तुवां लक्षिलें ॥ ९३ ॥

,, तूं ब्रह्मण्य, शरण्य तूं, स-दय तूं, सत्कीर्तिचा चांदवा ॥
लोकीं साधु तुम्ही असाचि उभवा प्राणी सुखें नांदवा ॥
आयुर्वृद्धि असो, वसो मनिं सदा भूतानुकंपा, दिलें ॥
मातें तें इतरांहि द्या यश भलें जन्मोनि सं-पादिलें ॥ ९४ ॥

शालिनी. ऐशी आशीर्वाद-पीयूष-वृष्टी ॥ केली विप्रें त्या नृपीं प्रेम-दृष्टी ॥
राजा लाजे, शंभुला जेविं नंदी ॥ वारंवार श्री-मुनींद्रासि वंदी ॥ ९५ ॥

शा० वि०. राजा त्या मुनिला म्हणे मज जडा देतां तुम्ही थोरवी ॥
पादें आपुलिया जसा विधुसि कीं रत्नासि देतो रवी ॥

---

[1] मोत्यांचे.

केला हा निज-दास [1]वासव-नुता [1]सत्कीर्तिला भाजन ॥
स्वामी युष्मदुपासनेच्छु कवणा पावे न लाभा जन ॥ ९६ ॥

पृथ्वी. तुम्हीं प्रभु जगद्गुरु स्व-पद-दास-मंदार हा ॥
जन स्तविलि काय या श्रुति म्हणेल मंदा रहा ॥
म्हणोनि तुमचा मला सु-महिमा न वाखाणवे ॥
[2]प्र-कूप-खनका कसा जल निधी नवा खाणवे ॥ ९७ ॥

शा॰ वि॰ केला प्रार्थुनि तृप्त तो मुनि नृपें अत्यादरें जे मनीं ॥
होते सिद्ध पदार्थ विप्र-पतिच्या आले मुखीं जेमनीं ॥
आज्ञा दे गुरु-राज त्या नृ-पतिला जेवावया तो मग ॥
ब्रह्म्याच्या सदनासि जाय भगवान् भास्वान् जसा व्योम-ग ॥ ९८ ॥

" वर्षानंतर तापसेश्वर पुन्हा येतां गृहा पाहिला ॥
तावत्काल उपोषित [3]प्रभु-जल प्राशुनियां राहिला ॥
आज्ञा घेउनि जेविला मग सुहृद्वर्गासवें तो भला ॥
ऐसा [4]सन्नत अंबरीष सु-यशें लोक-त्रयीं शोभला ॥ ९९ ॥

आर्या (गीति) हा ग्रंथ भक्त-भूषण कंठीं जे साधु यासि धरितील ॥
ते आत्म-दर्शनीं अति स-स्पृह निः-स्पृहजनासि करितील ॥१००॥

## सुदाम-चरित्रांतील पृथुकोपाख्यान.

**कृष्णाचा** सखा **सुदामा** नांवाचा अति दरिद्री ब्राह्मण त्याच्या भेटीकरितां द्वारकेंत गेला. तेव्हां त्यानें आपल्या आतिशय गरिबीमुळें नुसते पृथुक (पोहे) त्यास नजर करण्यासाठीं नेले होते, तरी भक्तांविषयीं अत्यंत प्रेमळ जो श्रीकृष्ण त्यानें मोठ्या आदरानें त्या पोह्यांचा स्वीकार केला, व त्याबद्दल सुदाम्याला सोन्याची नगरी दिली. असें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे म्हणून ह्यास **पृथुकोपाख्यान** हें नांव दिलें आहे.

### साक्या.

गावीं संत-चरित्रें हो ॥ तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु॰ ॥
हरिचा सखा सुदामा ब्राह्मण निःस्पृह आत्म-ज्ञानी ॥
होता गृहीं [5]यदृच्छा-लाभें परम सुखातें मानी ॥ १ ॥

---

१ इंद्रानें स्तुत्य अशा जी सत्कीर्ति तिला. २ मोठी विहीर खणणारास. ३ देवाचें तीर्थ. ४ साधूंविषयीं नम्र. ५ आपोआप जें मिळेल तेणेंकरून.

त्या विप्राची भार्या आर्या मलिना कृशा कु-चैला ॥
[1]पति-पद-भजनें सर्षप मानी [2]भव-दुःखाभिध-शैला ॥ २ ॥
ते एकदा पतीच्या पार्श्वीं बहु भीत भीत गेली ॥
अवाङ्मुखी कंपित-तनु साध्वी कर जोडुनियां ठेली ॥ ३ ॥
[3]भय-गद्गद-कंठीं ते साध्वी म्हणे पतीतें स्वामी ॥
श्री-पति तो स्व-सखा हें कथितां नित्य तुम्ही निज-धामीं ॥ ४ ॥
भेटाया त्या दीन-बंधुला द्वारावतिला जावें ॥
गातां ध्यातां परि सखयातें नेत्रें अव-लोकावें ॥ ५ ॥
भजकाला आत्माही देतो ऐसा उदार तो कीं ॥
दीन-जनाचा कल्प-वृक्ष ही कीर्ति तयाची लोकीं ॥ ६ ॥
मोक्षहि देतो तेथें देणें अर्थ काम हें काय ॥
यास्तव जाउनि पहा कुटुंब-त्राणार्थें यदु-राय ॥ ७ ॥
देइल कांहीं दयाळु तो प्रभु रक्षाया हीं बाळें ॥
तुम्हांला स्व-सख्याचें दर्शन घडेल बहुता काळें ॥ ८ ॥
ऐसें स्त्रीचें प्रिय हित भाषण ऐकुनि मुनी सुखावे ॥
आलें मनांत कीं जाउनियां प्रभुचे पाय पहावे ॥ ९ ॥
स्त्रीस म्हणे आनंदें तो द्विज जातों सखा पहाया ॥
तच्चरणावरि निज-तनु मनही पुष्पांजळी वहाया ॥ १० ॥
आहे कांहीं गृहीं उपायन दे हो स-त्वर आणीं ॥
[4]रिक्त-पाणिनें न वि-लोकावा गुरु ऐशी स्मृति-वाणी ॥ ११ ॥
ऐसें परिसुनि भिक्षा मागुनि चार मुष्टि पृथुकांशी ॥
आणुनि बांधूनि [5]चैल-खंडीं अर्पी निज-कांताशी ॥ १२ ॥
घेउनि मुनि तो उपायनाला बहु हर्षेंचि निघाला ॥
भेटेल कसा प्रभु हें स्व-मनीं चिंतित जाता झाला ॥ १३ ॥
हरिला हृदयीं चिंतित जातां मार्ग जाहला थोडा ॥
बहुधा केला [6]हरि-सं-दर्शन-कामें [7]प्रेमा घोडा ॥ १४ ॥

---

१ नवऱ्याच्या पायाच्या सेवेनें. २ भव+दुःख+अभिधा+शैल=संसारसंबंधी दुःख हेंच आहे अभिधा म्हणजे नांव ज्याला असा शैल म्हणजे पर्वत त्याला. ३ भयानें दाटला आहे कंठ जिचा अशी. ४ रिकाम्या हातांच्या मनुष्यानें. ५ फडक्यांत. ६ कृष्णाला पाहण्याची अत्यंत आवड आहे ज्याला अशा सुदाम्यानें. ७ प्रेम ( पुल्लिंगी ).

अमरावती-समाना द्वारावती परी कनकाची ॥
विलोकिली दिव्य राज-धानी विश्वाच्या जनकाची ॥ १५ ॥
काय तिची वर्णावी शोभा सत्यवती जिस लाजे ॥
मी धन्य म्हणुनी जीच्या योगें रत्नाकर बहु गाजे ॥ १६ ॥
जेथिल लोक वि-शोक स्व-सुखें तुच्छ मानिती स्वर्गा ॥
लाजति सुर-वर योगी ज्ञानी नागरिकांच्या वर्गा ॥ १७ ॥
त्या नगरींत मुनी तो गेला जैसा वैकुंठातें ॥
[1]ब्रह्मण्य-देव-पुरींत नाहीं नि-रोध पळ विप्रातें ॥ १८ ॥
एकापरीस एक सु-रम्यें यादव-गृहें अ-पारें ॥
विप्रावांचुनि जेथें न शिरे आज्ञा नसतां वारें ॥ १९ ॥
त्यांतहि सोळा सहस्र आणिक अष्टोत्तर शत गेहें ॥
स्त्री-सुत-युक्तें केलीं शोभित हरिनें अनेक-देहें ॥ २० ॥
त्यांतुनि एका गृहांगणीं तो गेला ब्राह्मण दीन ॥
सुख पावला स्व-चित्तीं जैसा ब्रह्मानंदीं लीन ॥ २१ ॥
श्री-रुक्मिणिच्या पलंगिं तेव्हां होता [2]जगन्निवास ॥
तेथें कळलें कीं भेटाया आलासे निज-दास ॥ २२ ॥
झडकरि उठला दयाळु मा-धव वस्त्रादिक नावरितां ॥
धांवत आला पुढें रमेला सांडुनि दासाकरितां ॥ २३ ॥
ये ये बंधो ऐसें सद्गद बोलत धांवत आला ॥
कडकडुनी [3]भुज-युग्में स्व-सखा हृदयीं धरिता झाला ॥ २४ ॥
मित्रांग-स्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू ॥
[4]लोचन-पद्मापासुनि गळती प्रेमाश्रूचे बिंदू ॥ २५ ॥
धरुनि स्व-सखा करीं हरीनें पर्यंकीं बसवीला ॥
[5]सात्त्विक-भावें भक्ति-प्रेमा देवें बहु दाखविला ॥ २६ ॥
जळ घाली रुक्मिणी पदांवरी [6]मणि-कनकाच्या पात्रें ॥
प्र-क्षालन केलें श्री-नाथें सुख-रोमांचित-गात्रें ॥ २७ ॥

१ ब्राह्मणांविषयीं दयाळु जो देव म्हणजे कृष्ण, त्याच्या पुरांत. २ (जगत्+निवास) विश्वाचा आधार कृष्ण. ३ दोन्ही हातांनीं. ४ कमळासारख्या नेत्रांतून. ५ रोमांचादिक हे आठ प्रकारचे सात्त्विक भाव आहेत त्यांनीं. ते हे:—स्तंभ, प्रलय, रोमांच, स्वेद, वैवर्ण्य, वेपथु, अश्रु, आणि वैस्वर्य. ६ रत्नजडित सोन्याच्या भांड्यानें.

शंभु-शिरीं ज्याचें चरणोदक, वेद जयाचे बंदी ॥
तो तीर्थ-रूप तीर्थांचाही मुनि-पादोदक वंदी ॥ २८ ॥
गंधालेपें[1] धूपें दीपें पुष्पें गुरु-समान ॥
ब्रह्मण्यदेव मुनितें पूजि वाढवुनी बहु मान ॥ २९ ॥
व्यजन चामरें घेउनि हातीं शैब्या[2] घाली वारा ॥
तें परिसुनियां आला तेथें [3]अंतः-पुर-जन सारा ॥ ३० ॥
हरि-स्त्रिया त्या म्हणति अगाई कोण विप्र हा आला ॥
जगद्गुरूसहि बला-परिस हो पूज्य कसा हा झाला ॥ ३१ ॥
कृष्ण सख्यातें करीं धरुनियां सांगे गोष्टी गोडा ॥
त्यांशीं सर्व-रसाधिक परि तें अ-मृत न पावे जोडा ॥ ३२ ॥
देव म्हणे मी बंधो [4]गुरुची आलों घेउनि आज्ञा ॥
सं-पादिला [5]तदुत्तर [6]पाणि-ग्रहण-विधी कीं प्राज्ञा ॥ ३३ ॥
बहुधा गृहीं उदासीन तुझें मन धन-वांछा कांहीं ॥
नाहीं, हें मज पूर्वीपासुनि अव-गत आहे पाहीं ॥ ३४ ॥
परि [7]लोकसंग्रहास्तव मीही करितों गृह-स्थ-धर्म ॥
योगर्चि[8] हा फळ-वांछा टाकुनि सर्व करावें कर्म ॥ ३५ ॥
[9]गुरु-कुळ-वास तुला स्मरतो कीं जेणें तरतो मूढ ॥
त्वरितचि होतो [10]अ-क्षय-सुख-द-स्वात्म-पदीं आ-रूढ ॥ ३६ ॥
[11]सांदीपनि-गुरुच्या पत्नीनें काष्ठें आणायासी ॥
पाठविलें विपिनाला स्मरतें तें माझ्या हृदयासी ॥ ३७ ॥
गेलों आपण वनासि तेव्हां झाली अ-काल-वृष्टी ॥
कल्पक्षयचि निशा-काळीं तो झाला गो-चर दृष्टी ॥ ३८ ॥
प्रातः-काळीं श्री-गुरु आला आम्हां शोधायाला ॥
श्रांत शिष्य देखतां स्व-हृदयीं फार दयाकुळ झाला ॥ ३९ ॥
धरुनि पोटिशीं आशीर्वादें गौरविलें बहु सकळां ॥

१ गंधाच्या उटीनें. २ रुक्मिणी. ३ जनानखान्यांतील जन म्हणजे स्त्रिया. ४ कृष्णाचा जो गुरु सांदीपनि त्याची. ५ त्यानंतर. ६ विवाह. ७ लोकांची स्वधर्माविषयीं प्रवृत्ति व्हावी या उद्देशानें. ८ ईश्वरप्राप्तीचें साधन-मोक्षसाधन. ९ गुरूच्या घरीं राहून त्याची सेवा करणें. १० अविनाशि अशा प्रकारचें सुख देणारें स्वात्मपद म्हणजे मुक्ति तीवर. ११ या नांवाचा कृष्णाचा गुरु त्याच्या

दिल्या चतुर्दश विद्या ह्या शुद्ध चतु:षष्टि कला ॥ ४० ॥
हें सारें मजला आठवतें स्मरतें तुज कीं नाहीं ॥
गुरु-प्रसादें शिष्य-जनांला नसे उणें सुख कांहीं ॥ ४१ ॥
हें ऐकुनियां तो श्री-दामा म्हणे प्रभो सर्व-ज्ञा ॥
[1]लोक-विडंबन सारें केलें वदतां करुनि अव-ज्ञा ॥ ४२ ॥
आम्हांला तारायाकरितां गुरु-कुळ-नि-वास केला ॥
तुझ्या प्रसादें या दासाचा सारा सं-शय[3] गेला ॥ ४३ ॥
वेदें-मया कल्याणाधारा जगद्गुरो तुज कवणें ॥
सर्व-ज्ञाला अ-ज्ञ-मनुष्यें काय ज्ञान शिकविणें ॥ ४४ ॥
देव म्हणे सखया मज द्याया काय उपायन आजी ॥
आणिलें असेल देउनियां तें वांछा पुरवीं साजी ॥ ४५ ॥
भक्तें प्रेमें अणुही दिधलें तें मज पुष्कळ होतें ॥
बहुहि अ-भक्तें समर्पिलें परि अल्पचि भासे हो तें ॥ ४६ ॥
पत्र, पुष्प, फल, जळ, जें मजला भक्त आदरें अर्पी ॥
तें विश्वात्म्याला मज बंधो सुधा-रसाहुनि तर्पी ॥ ४७ ॥
हें परिशिलें परंतु स्व-मनीं [5]मुष्टि-चतुष्टय पोहे ॥
द्यावे प्रभुला हा धीर तरी त्या विप्राला नोहे ॥ ४८ ॥
सं-कोचला अधो-मुख बसला विप्र न बोले कांहीं ॥
बुडतचि होता मुनि तो केवळ लज्जा-नदी-प्रवाहीं ॥ ४९ ॥
सखा कृतार्थ कराया निंद्या चिंध्या आपण पाहे ॥
पृथुक-मोटली सांपडतां प्रभु बहु-हर्षाला लाहे ॥ ५० ॥
सोडुनि गांठी पृथुक-मुष्टि तो वदनीं घालुनि भक्षी ॥
तों तों लाजे विप्र प्रभुच्या मुख-पद्मासि न लक्षी ॥ ५१ ॥
भूतात्म्याला मजला [7]तर्पिति पोहे हे बहु फार ॥
याहुनि न रुचे भुवनीं बंधो अन्य [8]उपायन-सार ॥ ५२ ॥
ऐसें स्तवुनि उपायन दुसरी मुष्टि श्री-पति उचली ॥
तों रुक्मिणी धरी कर धांवुनि म्हणे मला हे रुचली ॥ ५३ ॥

१ लोकांसारखें वागणें. २ भीड-मुरवत न धरित. ३ अज्ञान-द्वैत-भ्रांति. ४ ज्ञान-स्वरूपा. ५ चार मुठी. ६ पोह्यांची गांठोडी. ७ तृप्त कारतात. ८ उत्तम नजराणा.

घावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वाडेकोडें ॥
सेवन करितां तुम्हांला[2] तों हें ब्रह्मांडहि थोडें ॥ ५४ ॥
इह-पर[1] भवज्जनाला येणें सर्वहि समृद्धि झाली ॥
पुरे मुष्टि-पृथुकांचें भक्षण ब्रह्मांडावलि धाली ॥ ५५ ॥
पोहे नेले हिरोनि [3]भगवत्-पर-पद्म-जा-सतीनें ॥
प्रार्थुनि रिझवुनि हंसवुनि रमवुनि निज-पतिला सु-मतीनें ॥ ५६ ॥
[4]षड्रस-युक्तें [5]चतुर्विधान्नें भोजन झालें रातीं ॥
[6]ब्रह्माद्यलभ्य-पंक्ति लाधली दैवें विप्र-वरा ती ॥ ५७ ॥
[7]निज-पल्यंकीं मृदु-शयनावरि विप्राला यदु-राय ॥
निजवुनि परमादरें हळूहळु करें चुरी मग पाय ॥ ५८ ॥
स्वर्ग-सुखाहुनि बहु सौख्याला विप्र पावला रातीं ॥
प्रातः-काळीं उठतां आ-ज्ञा मग दे [8]कंसारातीं ॥ ५९ ॥
[9]पावित गेला दूर जगत्पति कंठ दाटला भारी ॥
मित्र-वि-योगें प्रभुच्या वाहे नेत्रांपासुनि वारी ॥ ६० ॥
माझें स्मरण असों दे ऐसें म्हणे स-गद्गद-कंठ ॥
आलिंगुनि वंदुनि विप्राला परते मग वैकुंठ[10] ॥ ६१ ॥
ब्राह्मण देव-वि-योगें व्याकुळ होउनि सावध झाला ॥
भगवद्दर्शन-लाभ घेउनी स्वांतीं पुष्कळ धाला ॥ ६२ ॥
मनीं म्हणे द्वि-ज मजला कांहीं कृष्णें न दिलें वित्त ॥
मी मागावें तेंहि विसरलों स्व-मुखें, भुललें चित्त ॥ ६३ ॥
स्त्री परि हांसेल घरा जातां यासि करावें काय ॥
हांसो सुखें, परंतु वदान्य-श्रेष्ठ खरा यदु-राय ॥ ६४ ॥
द रिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड ॥
आ त्यांचेपारि मग न घडेल प्रभुचें स्मरण अ-खंड ॥ ६५ ॥
यास्त स्व करुणा-निधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें ॥

---

१ ह्या लोकीं व परलोकीं. २ तुमच्या भक्तांस. ३ भगवत्सेवेविषयीं तत्पर जी प-द्मजा म्हणजे लक्ष्मी तद्रूप जी सती म्हणजे पतिव्रता रुक्मिणी तिनें. ४ गोड, आंबट, तिखट, खारट, तुरट, कडू; असे सहा रस. ५ खाद्य, पेय, लेह्य व चोष्य अशीं चार प्रकारचीं अन्नें. ६ ब्रह्मादिक देवांसही मिळण्यास कठीण. ७ आपल्या मंचकावर. ८ कंसाचा अराति म्हणजे शत्रु कृष्ण. ९ पोंचवीत. १० कृष्ण.

धन न दिलें हें बरवें केलें दीन-जनाच्या तातें ॥ ६६ ॥
असें मनीं चिंतित निज-मार्गी आला स्व-गृहापाशीं ॥
तों त्याच्या दृष्टीला पडला सहसा तेजो-राशी ॥ ६७ ॥
म्हणे काय हें कैसें झालें गृह जें माझें होतें ॥
तेथें कैशी [1]स्वर्ण-पुरी ही काय जाहलें हो तें ॥ ६८ ॥
वि-स्मित होउनि पाहे तो मुनि [2]नानोपवनें रम्यें ॥
कनक-पुरींच्यामध्यें सदनें रत्नाचीं [3]अनुपम्यें ॥ ६९ ॥
नर-नारी-जन देव-समान [4]स्वालंकृत अति गेहीं ॥
रत्न-भूषणें वस्त्रें रवि-सम दीप्ति जयाच्या देहीं ॥ ७० ॥
आला स्वामी म्हणुनि पुढें मग नागरीक जन धांवे ॥
वाजत गाजत गृहासि आणिति मुनिला पूजुनि भावें ॥ ७१ ॥
देवांगना तशी शुभ-गात्री विप्राची स्त्री गेहीं ॥
पति आला हें परिसुनि झाली सुख-रोमांचित देहीं ॥ ७२ ॥
देव-स्त्री-सम [5]दासी-शत-युत आली धांवुनि दारा ॥
पतिस विलोकुनि हृदयीं [6]भेटे साध्वी [7]परमोदारा ॥ ७३ ॥
नेला गेहीं पति निज-हस्तें धरुनि करीं बहु-मानें ॥
दिव्य समृद्धि विलोकुनि जाणे मुनि [8]तद्बीज ज्ञानें ॥ ७४ ॥
म्हणे मुनी मी जन्मापासुनि दरिद्र केवळ पापी ॥
हरि-दर्शनाविणें कोण दुजा या भाग्य-पदीं स्थापी ॥ ७५ ॥
[9]महा-वि-भूति-यदूत्तम-दर्शन समृद्धि-कारण साचें ॥
काम-द मेघ-श्याम पुरविता [10]कामित निज-दासाचें ॥ ७६ ॥
देवाचे परि देव-प्रभुनें समर्पिलें मज हस्तें ॥
तीर्थ-पदें[11] मत्पदावनेजन[12] धरिलें कीं निज-मस्तें ॥ ७७ ॥
केली माझी सेवा देवें निजवीलें स्व-पलंगीं ॥
सु-गंध-लेपन केलें प्रभुनें निज हस्ताचि [13]मदंगा ॥ ७८ ॥

१ सोन्याची नगरी. २ नानाप्रकारच्या बागा. ३ ज्यांना उपमा नाहीं अशीं. ४ उत्तम प्रकारें अलंकारांनीं शोभविलेलें. ५ शेंकडो दासींसहित. ६ आलिंगन देई. ७ फार मोठ्या मनाची. ८ त्या समृद्धीचें कारण. ९ मोठा ऐश्वर्यवान् जो यदूत्तम म्हणजे यदुकुलांत उत्तम श्रीकृष्ण त्याचें दर्शन. १० इच्छिलेलें. ११ ज्याच्या पायांच्या ठिकाणीं तीर्थें आहेत अशा श्रीकृष्णानें. १२ ( मत्+पद+अवनेजन ) ज्यांत माझे पाय धुतले आहेत असें पाणी ( अवनेजन-अव+निज्=धुणें ). १३ माझ्या आंगाला.

मज दीनांतें बंधो बंधो ऐसें वदला स्वामी ॥
[1]अन्वर्थता प्र-कट केली कीं दीन-बंधु या नामीं ॥ ७९ ॥
सौहृद मैत्री[2] सख्य[2] दास्य[2] त्या देवाचेंचि असावें ॥
जन्मोजन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ ८० ॥
केलें कृतार्थ भुवन हि माझ्या सख्या मुकुंदा स्वामी ॥
तूं [3]करुणांबु-द-जीवन-सुख-कर मयूर चातक आम्हीं ॥ ८१ ॥
ऐसा भगवत्सखा सुदामा स्त्रीसह भजे प्रभूतें ॥
इह-पर नित्यचि पवता झाला तेणें सुखें प्र-भूतें ॥ ८२ ॥
[4]दीनोद्धरण चरित्र विभूचें पावन गोड उदार ॥
राम-नंदनें मयूरेश्वरें फार मानिलें सार ॥ ८३ ॥
वाणी पवित्र करावयास्तव पृथुकोपाख्यान सुखें ॥
लेश-मात्र वर्णिलें पुन्हा[5] हीं मयूरेश्वरेंच स्व-मुखें ॥ ८४ ॥
रसिक विष्णु-भक्तांहीं प्रेमें शिशु-भाषण परिसावें ॥
दोष निवारुनि गुण घेउनियां स्व-सुखानें नाचावें ॥ ८५ ॥
गावीं संत-चरित्रें हो ॥ तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥

---

## रघुनाथपंडित.

**या कवीनें केलेला** असा एकच लहानसा ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्याचें नांव **नल-दमयंती-स्वयंवराख्यान.** हा ग्रंथ संस्कृत भाषेंतील नैषधकाव्याच्या आधारानें केलेला आहे. हा फार सुरस असून ह्यांत यमकादि शब्दालंकार व उपमादि अर्थालंकार चांगले साधलेले आहेत; आणि वृत्तेंही नानाप्रका-

---

१ नांवाच्या अर्थास अनुरूप अशी कृति. २ एथें बहुधा एकार्थकच अशा अनेक शब्दांची योजना करून कवीनें सुदाम्याचा प्रेमभर दाखविला आहे. ३ मयूरपक्षीं करुणांबुद व चातकपक्षीं करुणांबुद जीवन ( करुणारूप मेघोदक, असा अर्थ समजावा. परंतु ही रचना अशीच असेल तर सदोष आहे ). दीनांचा उद्धार करणारें. ५ एकदं आर्यावृत्तानें लिहिलें असून आतां आणखी साकीवृत्तानें लिहिलें आहे, म्हणून 'पुन्हाहीं' म्हटलें आहे. ६ 'सीतास्वयंवर,'. 'रुक्मिणीस्वयंवर' इत्यादि संज्ञांवरून पाहतां या ग्रंथालाही दमयंतीस्वयंवर अशी संज्ञा दिली असती तर चांगली शोभती, परंतु 'नलदमयंतीस्वयंवराख्यान,' ही संज्ञा पुष्कळ दिवसांपासून प्रसिद्धीस आलेली दिसते.

र्चीं योजिलेलीं आहेत. रघुनाथपंडिताच्या कवितेंत श्लेषरचना बरीच आढळते; व तेणेंकरून स्थलविशेषीं कवितेस दुर्बोधत्व आलें आहे; तथापि ऐकंदरीनें पाहतां ह्याची कविता हृदयंगम आहे.

हा कवि शालिवाहन शकाच्या १७ व्या शतकाच्या अखेरीस होता असें म्हणतात. ह्याखेरीज ह्या कवीचें वृत्त कांहींच माहीत नाहीं.

## नल-दमयंती-स्वयंवराख्यान.

शा० वि० पुण्य-श्लोक-नृपावळींत पहिला होवोनि जो राहिला ॥[1]
तो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला[2] ॥
व्यासोक्तें अव-गाहिला बुध-जनीं नाना-गुणीं गायिला ॥
जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

गीति. इंद्रादिक वर असतां, कशी नल-सतीच होय दमयंती ॥
सुंदर-सकल-वधूंतें कशी न लसतचि होय दम-यंती ॥ २ ॥

दिंडी. कथा बोलूं हे मधुर सुधा-धारा ॥ होय शृंगारा करुण-रसा थारा ॥
निषध-राजा नळ-नामधेय होता ॥ वीरसेनाचा तनय महा-होता ॥ ३ ॥
" चौगुणीनें[3] जरि पूर्ण शीत-भानु ॥ नळाऐसा तरि कला-निधी[4] वानूं ॥
प्र-तापाचा जो[5] न मावळे भानू ॥ तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ ४ ॥

व० ति०. चंद्रासि लागति कळा[6] उप-राग येतो ॥

१ पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥ २ राजा व प्रजा हीं दुराचरणी असलीं म्हणजे पृथ्वीला भार होतो, व त्यामुळें तिला मस्तकावर धारण करणारा जो शेष त्यालाही भार होतो असें मानिलें आहे. ह्या गोष्टीस लक्षून नलराजा मोठा सदाचरणी होता, व प्रजाही तशीच होती, हें दाखविण्याकरितां ' विश्रांति शेषाहिला ' इत्यादि वर्णन केलें आहे. ३ चौपटीनें म्हणजे पौर्णिमेचा पूर्ण चंद्र १६ कळांचा असतो, तो ६४ कळांचा होईल तर. ४ चंद्र-कला म्हणजे चंद्रबिंबाचा १६ वा अंश-श्लेषानें लेखनगायनादि ६४ कलांपैकीं प्रत्येक. तात्पर्य कीं, चंद्राला कला आहेत पण १६ आहेत; आणि नळराजाला तर ६४ कला आहेत; म्हणून त्यांची बरोबरी नाहीं. ५ नळराजा. ६ क्षयवृद्धि.

गंगेशि भंग[1] बहु पाण-उतार होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळ-राज-महा-यशाला ॥ ५ ॥

शा॰ वि॰. वाजींचें मन जाणता, सकळही रीजी शिपाई जया ॥
याजी होउनियां द्वि-जांसि म्हणतो या जी धनें घ्यावया ॥
त्याजी जो धन-दापरी, सुकृत[2] जें त्या जवि[2] ऐसें गणी[2] ॥
गाजी तो नळ भू-प हूप धरुनी गा जी गुणींच्या गणीं ॥ ६ ॥

दिंडी. लोकें[3]-बंधू जो होय रवी-ऐसा ॥ कुवलयाला[4] जो सुख-द चंद्र जैसा ॥
सांग[5] नोहे तो कुसुम-चाप तैसा ॥ निषध-रायाशीं तुल्य-रूप कैसा ॥ ७ ॥

गीति. नाडी-ज्ञान जयाचें, स-रोग-बंधू चतुष्पद गणावे ॥
सुत तेजी-तुरगीचे; नळ-सम सुंदर कदापि न म्हणावे ॥ ८ ॥

---

१ लाटा. "भंग बहु" एणेंकरून पावसाळ्यांत पूर येतो तो सुचविला; आणि "पाणउतार" एणेंकरून उन्हाळ्यांत पाणी आटतें तें सुचविलें. तात्पर्य कीं, गंगेचें पाणी कमजास्त होतें आणि नळाचें यश सर्वदा एकसारखें असतें; तेव्हां चंद्र, गंगा व मौक्तिक हीं शुभ्र आहेत, तरी त्यांची नळयशाला उपमा देतां येत नाहीं. या पद्यांत 'कळा,' 'उपराग,' 'भंग' व 'पाणउतार' या शब्दांचे जे अनुक्रमें आंगास लागणाऱ्या कळा, निंदा, पीडा किंवा मोड व अप्रतिष्ठा हे व्यावहारिक अर्थ आहेत, त्यांस लक्षून कवीनें हे शब्द योजिलेले आहेत. २ पुण्य ज्याला प्राणाप्रमाणें आवडे; म्हणजे प्राणरक्षणाविषयीं जसें जपावें तसें सद्धर्म व न्याय यांच्या रक्षणाविषयीं तो जपत असे. ३ लोकबंधू=लोकांचें हित करणारा, पक्षीं, प्रकाशानें लोकांच्या कर्माचें नियमन करणारा. ४ कुवलय म्हणजे चंद्रविकासी कमल. हीं कमलें चंद्रोदयीं विकासतात म्हणून यांस चंद्र हा सुखद म्हणजे सुख देणारा आहे. तसा नळही कुवलयाला म्हणजे कूच्या (पृथ्वीच्या) वलयाला म्हणजे सर्व पृथ्वीवरच्या लोकांना सुख देणारा आहे. ५ अंगासहित. कुसुम-चाप म्हणजे मदन हा अनंग (अंगरहित) आहे. ६ 'सरोगबंधू' याचा अवयवार्थ—सरोग म्हणजे रोगी आहे बंधू म्हणजे भाऊ ज्याचा, असा आहे. एथें या शब्दाचा अर्थ धन्वंतरी (देवांचा वैद्य) असा घ्यावयाचा. त्याला सरोगबंधू म्हणण्याचें कारण असें कीं, धन्वंतरी आणि चंद्र हे दोघेही समुद्रमंथनाच्या वेळीं एकाच क्षीरसागरापासून उत्पन्न झाले. म्हणून चंद्र हा धन्वंतरीचा भाऊ मानिला आहे आणि तो सरोग (क्षयी) आहे, म्हणून धन्वंतरी सरोगबंधू झाला. ७तजी (घोडा). तुरगी (घोडी)चे सुत म्हणजे अश्विनीकुमार. हे सूर्याचे पुत्र होते. त्वष्ट्याची संज्ञानामक कन्या सूर्यास दिली होती, तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून तिनें घोडीचें रूप धरिलें आणि सूर्यानें घोड्याचें रूप धरिलें. तेव्हां पुढें त्या उभयतांपासून हे उत्पन्न झाले, अशी कथा आहे. हे स्वर्गीचे वैद्य असून रूपानें सुंदर होते. याचा अन्वय—ज्याचें नाडीज्ञान (इतकें होतें कीं त्यापुढें) सरोगबंधू (व) तेजी-तुरगीचे सुत (हे) चतुष्पद गणावे; तेजी-तुरगीचे सुत नळ-सम सुंदर कदापि न म्हणावे.

शिख०. कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
वि-पक्षाच्या वक्षावरि [1]विवर-लक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राचौ त्वरित शर-सं-धान-करणी ॥ ९ ॥

व० ति०. धाले धनी पुढिल याचक या नळाचे ॥
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ॥
त्यांहींच ते सकळ पूरित-काम केले ॥ १० ॥

दिंडी. अशी अ-गणित गुण-कीर्ति नैषधाची ॥
फिरे भुवन-त्रयिं जान्हवीच साची ॥
असें असतां द्वि-ज पांच सात याची ॥
भेटि घेती [2]वैदर्भ-राजयाची ॥ ११ ॥

" बहू आशीर्वादासि तिहीं केलें ॥ भीम-भूपें मग तयां बोलिजेलें ॥
तुम्ही आलां कोठूनि अशा बोलें ॥ द्वि-जीं निषधापासाव म्हणीजेलें ॥ १२ ॥

" भीम-राजा मग गिरा वदे ऐसी ॥ निषध-देशीं नळ-राज-रीति कैसी ॥
असें ऐकोनी वदति विप्र त्यासी ॥ वि-प्रयासीं [3]वक्तृ-त्व ये जयांसी ॥ १३ ॥

व० ति०. हे [4]वामनैक-पद भूमि, नसोनि जंघी ॥
एके दिशींच [5]दिन-राज नभास लंघी ॥

---

१ विवर म्हणजे व्रण व लक्ष म्हणजे पाहणें. शत्रूच्या वक्षःस्थलावर व्रण दृष्टीस पडल्यामुळेंच त्यानें बाण जोडिला व सोडिला, असें लोक अनुमान करीत. ( तो बाण जोडी केव्हां व सोडी केव्हां हें कोणाच्या दृष्टीस पडत नसे; इतकी त्याची चलाखी होती हा भाव ). २ भीमराजाची. ३ ह्या चरणाचें तात्पर्य असें आहे कीं, नलाचे गुण अनंत व अनुपम असल्यामुळें त्यांचें यथार्थ वर्णन आपणांस कसें करितां येईल ? ह्या विचारांत ते पडले. ४ वामनैक-पद=वामन म्हणजे लहान मुलगा ह्याच्या एका पावलाइतकी, तेव्हां ती नळाच्या विस्तीर्ण यशाला उपमा देण्याला योग्य नाहीं. वामनावतारीं विष्णूनें बलिराजापाशीं त्रिपाद भूमि मागितली, पण त्याच्या एका पावलांतच सर्व पृथ्वी आटली, अशी कथा आहे; तिकडे ह्या वर्णनाचें धोरण आहे. ( पृष्ठ १११ श्लोक २६ पहा ). ५ दिनराज म्हणजे सूर्य हा जंघी म्हणजे वेगानें चालणारा नसूनही ( म्हणजे लोकदृष्टीला तो संथ चालतोसा दिसतो ) एका दिवसांत आकाश ओलांडितो; तेव्हां नळराजाच्या यशाला अशा लहानशा आकाशाची उपमा देतां नाहीं.

[1]वारांशि वानर-वि-लंघित होय तो कीं ॥
लोकीं नसे नल-यशस्तुलना [2]विलोकीं ॥ १४ ॥

शा० वि०. जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनाचा करी ॥
[3]जो पावे समयीं[3], विशेष गणिला जो [4]पावनांभीतरीं ॥
सोपा जो सकळां द्विजां, सु-मतिचा[5] सोपा, सदा [6]लाभतो ॥
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ १५ ॥

शा० वि०. जो धैर्यें [7]धर-सा, सहस्र-कर-सा तेजें, [8]तमा दूर-सा ॥
जो [9]रत्नाकर-सा गभीर, [10]शिर सा भूपां, [11]यशो-हार-सा ॥
ज्ञाता जो सरसावला[12] [13]नव रसांमाझारि शृंगार-सा ॥
शोभे तामरसाक्ष तो नळ रसा-नाथ स्तवूं फार-सा ॥ १६ ॥

दिंडी. अशी होतां नळ-चरित-कथा कांहीं । भीम-नामा भू-पाळ परिसतांही ॥
[14]जवळें होती लडिवाळ जे सदाहीं[14] । सुता दमयंती नाम जीस पाहीं १७

मालिनी. निषध-पति-कथा हे जे सुधेतें जयंती ॥
परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥
नवल मज न भासे [15]चंद्र-वंशैक-शाली ॥
नल तरि [16]वन-माळी [17]भीमकी हेचि झाली ॥ १८ ॥

१ वारांशि म्हणजे समुद्र, हा तर वानरांनीं ( मर्कटांनीं ) ओलांडला आहे; तेव्हां नलाच्या यशाला समुद्राचीही उपमा देववत नाहीं. २ 'पाहण्यांत' अथवा 'समज' असे दोनही अर्थ एथें शोभतात. ३ जो समयीं पावे म्हणजे प्रसंगीं कार्य करी म्हणजे उपयोगीं पडे. ४ पवित्र करणारांमध्यें; ह्याच्या नामाच्या स्मरणानें स्मरणकर्ता पवित्र होतो अशाविषयीं पुराण प्रमाण आहे. ५ सद्-बुद्धीचा सोपा म्हणजे घर. ६ ज्यापासून नेहमीं लाभ होतो. ७ पर्वतासारखा-पर्वताला अचळ असें नांव आहे म्हणजे कांहीं झालें तरी तो हालत नाहीं, त्याप्रमाणें हा कसाही प्रसंग आला, तरी डगत नव्हता, म्हणून धैर्यानें तसा. ८ तमा दूरसा--अज्ञानापासून दूर म्हणजे अज्ञानरहित. ९ समुद्राप्रमाणें-समुद्र फार खोल असतो त्याप्रमाणें-हा मनानें खोल; अर्थात् गंभीर. १० राजांमध्यें श्रेष्ठ. ११ यशच आहे हार ज्याचा असा-म्हणजे सत्कीर्ति हेंच ज्याचें भूषण होतें; त्याच्या शरिराला शोभा आणण्याला इतर भूषणांची गरज नव्हती. १२ पुढें आला-पहिली पदवी पावला, नऊ रसांत शृंगार जसा पहिला तसा सर्व ज्ञानीजनांत हा पहिला. १३ नवरस-शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत आणि शांत. १४ ब्राह्मण नलाचें वर्णन करीत असतां तें वर्णन संपे तोंपर्यंत एकसारखी. १५ चंद्र-वंशांत एकटाच शोभणारा. १६ कृष्ण. १७ कृष्णाकडे भीमकी म्हणजे रुक्मिणी आणि नलाकडे भीमकी म्हणजे भीमकन्या दमयंती.

मा०भा०. नळ-राज-कथा सुधाचि[1] साजे ॥ दमयंती [2]वर-वर्णिनी वि-राजे ॥
मिळणी[3] उभयांशि होय जेथें[4] ॥ अधिकारी[5] अधिकानुराग[6] तेथें ॥ १९ ॥

दिंडी. कथा तेथिल ही होय असो ऐशी ॥ हेर आला तो वदे नैषधासी ॥
तुझ्या कथनीं वैदर्भ-राजयासी ॥ प्रीति होती तनयाहि तयापासी ॥ २० ॥

शा०वि०. बापाच्या उजवे कडेसि बसली म्यां पाहिली नोवरी ॥
व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी ॥
तापातें हरितें करोनि मधुरालापासि जे सुंदरी ॥
ज्या पावे जगदीश, [7]सांग-सुमनश्चापा नृ-पा त्या वरी ॥ २१ ॥

व०ति०. जें अंतरंग पिंवळें सरसीरुहाचें ॥ भासे मनांत मज अंग तसें तियेचें ॥
गोरोचनापरिस गौर असें गणावें ॥ सोनेंच बावनकसी न कसें म्हणावें ॥ २२ ॥

दिंडी. असें बोले तो चार समाचारा ॥ करी दमयंती नल-मनीं विहारा ॥
नोवरी हे मज होय कशी दारा ॥ करूं लागे तैं भू-प या विचारा ॥ २३ ॥

" वि-भूतीनें झांकला अनळ-सा तो ॥ गुप्त दमयंती-विरह नृ-पा होतो ॥
नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो ॥ सागरानें तो काय सांगिजेतो ॥ २४ ॥

आर्या. रजनी दिवस गमेना नृ-पतिस संगीतही सुखं[8] गमेना ॥
मन कोठेंहि रमेना म्हणोनि करि वन-वि-हार सह सेना ॥ २५ ॥

व०ति०. गंगा-तरंग-सम जो निज-देह-वर्णीं ॥
मृगापरी रुचिर कांति जयाशि कर्णीं ॥
जंघाल जो [9]पवन-सं-गतिची सवें घे ॥
शृंगारिला हय तयावरि भू-प वेंघे ॥ २६ ॥

---

१ अमृत. २ उत्कृष्ट स्त्री. ३ एकत्र होणें. ४ दमयंतीमध्यें. ५ हक्कदार. ६ अधिक प्रीति. ह्या श्लोकाचें तात्पर्य—अमृत हा उत्तम पदार्थ पडला आणि दमयंती ही उत्तम पदार्थांचें वर्णन करणारी म्हणजे गुण घेणारी पडली; म्हणून या दोघांचा मिलाफ झाल्यावर अधिक अनुराग म्हणजे प्रीतिच हक्कदार म्हणजे हक्काची आहे म्हणजे खचीत होणारी आहे. गुणी आणि गुणज्ञ ह्यांची गांठ पडल्यावर गुणवानाविषयीं गुणज्ञाचे चित्तांत प्रीति उत्पन्न होते, तद्वत्. एथें श्लेषानेंही एक दृष्टांत सुचविला आहे; तो असा—सुधा म्हणजे चुना आणि वरवर्णिनी म्हणजे हळद हीं एकत्र मिळालीं असतां अधिकच अनुराग म्हणजे रक्तिमा येतो, तद्वत्. एकंदर तात्पर्य कीं दमयंती ही नळाची कथा ऐकून रिझली म्हणून वरच्या श्लोकांत जें सांगितलें तें योग्यच आहे; कारण तें तसेंच व्हावयाचें. ७ अंग धारण करणारा मदन. हें "नृपा" ह्याचें विशेषण. ८ सुख देणारें. ९ वायूच्या अत्यंत वेगाची सवय घेई. 'सवें' असा पाठ घेतल्यास तो आपणाबरोबर वारा मात्र सोबत घेई, असा अर्थ. तात्पर्य कीं वायूप्रमाणें जलद चालणारा.

व० ति०. जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ॥
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवल-त्व ने घे ॥
शृंगारिला हय तयावरि भू-पं वेंघे ॥ २७ ॥

दिंडी. सर्वे सेना भू-पाळ निघालाहे ॥ शींव लंघी उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवकासि बाहे ॥ फौज सारी बाहेर उभी राहे ॥२८॥

,, पनस जंबू जंबीर वि-विध निंबें ॥ कुंद चंदन माकंद सु-दाडिंबें ॥
तुंग नारिंगें वि-कसलीं कदंबें ॥ वसति तेथें शुक-सारिका-कदंबें ॥२९॥

वंशस्थ. लते-तळीं रुंद नि-रुंद कालवे ॥ गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती[1] ॥ फुलांसवें भृंग-तती तरंगती ॥ ३० ॥

आर्या. उपरि स-कंटक साचे परंतु सांचे[2] जयांत सु-रसाचे ॥
घोंस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ ३१ ॥

उ० व०. तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबलें; [3]तामरसानपायें ॥
निरंतरामंद मरंद वाहे ॥ तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ ३२ ॥

द्रु०वि०. अ-मृतही पयही म्हणवीतसे ॥ उभय होय तसी रुचि वीतसे ॥
मधुर सारस[4] तें जल गा तसें ॥ मधुर सारस[5] यास्तव गातसे ॥३३॥

व०ति०. पीतां मरंद उदरं-भर-बंभराचें ॥ जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें[6] ॥
जें पद्म तेथिल सहस्र-दळां धरीतें ॥ प्रत्यक्ष सूर्य-किरणांस विसांवा[7] देतें ॥ ३४ ॥

दिंडी. तया कासारीं [8]राज-हंस पाहे ॥ राज-हंसाचा कळप पोहताहे ॥
तयांसाठीं हे वापिकाच पोहे ॥ नळें केली हें कोण म्हणे नोहे ॥३५॥

---

१ (रंगामुळें) शोभतात. २ साठे. सु-रसाचे साठे म्हणजे गरं. ३ तामरस म्हणजे कमल व अनपाय म्हणजे अविनाश. कमलें विपुल असून त्यांचा नाश होत नसल्यामुळें हें 'अमंद मरंद वाहे' ह्याचें कारण. ४ सरोवरांतलें. ५ एका जातीचे पक्षी आहेत. हे बगळ्यासारखे असतात; पण त्यापेक्षां मोठे असतात. अन्वय—गा तें सारस जल तसें मधुर (कीं) अमृतही पयही म्हणवीतसे; (कारण) उभय होय तसी रुचि वीतसे; यास्तव (तेथील) सारस मधुर गातसे. ६ लक्ष्मीचें नांव पद्मालया असें आहे. तेव्हां अर्थात् कमल हें तिचें मंदिर आहे, तें भ्रमराचेंही मकरंद पितांना मंदिर होतसे. तात्पर्य कीं, त्या सरोवरांतील कमलांत मकरंद विपुल असून इतका मधुर असे कीं तो पिण्यां भ्रमर गुंतले असतां संध्याकाळाचें भान न राहून गुंतून राहत. ७ विसावा देतें. म्हणजे सूर्याच्या सहस्रकिरणांसही सहस्र-पत्रांचीं कमलें वरचेवर धरून ठेवीत. तात्पर्य, कमलें मोठमोठालीं व तेजस्वी असून सरोवरांतील उदक गार राही. ८ राज-श्रेष्ठ (नळ).

दिंडी. [1] तया हंसांचे देह कांचनाचे ॥ पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥
रंग माणिकसे चंचुचे पदांचे ॥ जसे अधरींचे [1] भीम-कन्यकेचे ॥ ३६ ॥

व० ति०. त्यांतील एक कल-हंस तटीं निजेला ॥
जो भागला जल-वि-हार वि-शेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ॥
पक्षीं तनू लपवि भू-प तया पहातो ॥ ३७ ॥

,, टाकी उपानह पदें अति-मंद ठेवी ॥
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ॥
भू-पें हळूच [2] धरिला कल-हंस पायीं [2] ॥ ३८ ॥

मालिनी. कलकल कल-हंसें फार केला सुटाया ॥
फडफड निज-पक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृ-पतिस मणि-बंधीं टोंचिता होय चंचू ॥
धरि सु-दृढ ज्या तो काय सोडील पंचू ॥ ३९ ॥

,, तदितर ख-ग भेणें वेगळाले पळाले ॥
उप-वन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्व-जन गवसला जो [3] त्याजपाशीं नसे तो ॥
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ४० ॥

दिंडी. न सोडी हा नळ भूमि-पाळ मातें ॥ असें जाणोनि हंस वदे त्यातें ॥
हंस हिंसा नच घडो तुझ्या हातें ॥ स्व-स्थळातें पावेन [4] पक्ष-पातें ॥ ४१ ॥
जागजागीं आहेत वीर कोटी ॥ भले झुंझारहि शक्ति जयां मोठी ॥
तयां माराया धैर्य धरीं पोटीं ॥ पांखरूं हे मारणें बुद्धि खोटी ॥ ४२ ॥

१ दमयंतीच्या खालच्या ओठाचा रंग एकच तांबडा असतां बहुवचन योजण्यामध्यें, पहिल्या दोन चरणांतील 'चे' ह्या अक्षराशीं मेळ बसविणें हाच कवीचा उद्देश दिसतो. २ कलहंसाचा पाय धरून त्यांला पकडिलें. कोणाला धरावयाचें असतां त्याचा जो अवयव धरावयाचा तद्वाचक शब्दाची सप्तमी योजण्याचा संप्रदाय संस्कृतांतही आहे: जसें वाल्मीकिरामायण—

सतं रुचिरमाक्रम्य देशमाश्रमकर्मणि ॥
हस्ते गृहीत्वा हस्तेन रामः सौमित्रिमब्रवीत् ॥

३ अन्वय-जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे. ४ उडून.

दिंडी. वधुनि माझी हे कनक-रूप काया ॥ कटक-मुकुटादिक भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तूज राया ॥ काय नाहीं तूजला दया माया ॥४३॥
शा० वि०. म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ॥
कांता काय वदों [1]नव-प्रसव ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ॥
हातामाजि नृ-पा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥ ४४ ॥
पद. हर हर सांपडलों, सांपडलों ॥ कैसा फांशीं पडलों ॥ ध्रु० ॥
इतर नदी जळ टाकीं ॥ टाकुनि आलों याच तटाकीं ॥ १ ॥
सोडुनि [2]मानस-केली ॥ कापुनि घ्याया आलों शेली ॥ २ ॥
ठेविन तव पदिं माथा ॥ आतां सोडविं मज रघु-नाथा ॥ ३ ॥४५॥
दिंडी. सखे माझे परतोनि घरा येतां ॥ तुवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां ॥ कशी होशिल तें आठवितों आतां ॥४६॥
,, थोर होतिल बाळकें तुझीं [3]बाळे ॥ तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोक-शाळे ॥ मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥ ४७ ॥
मालिनी. स-दय हृदय याचें भू-प हा ताप-हारी ॥
म्हणुनि परिसतां मी होय एथें वि-हारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो ॥
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ॥ ४८ ॥
व० ति०. एणेंपरी परिसतां अति दीन वाचा ॥
हेलावला नळ पयोधि दया-रसाचा ॥
सोडी, म्हणे वि-हर जा अथवा फिराया ॥
राहें यथा-निज-मनो-रथ हंस-राया ॥ ४९ ॥
मालिनी. सुटुनि ख-ग पळाला बैसला शाल-शाखे ॥
क्षणभरि निज-देहीं मुक्ति-वि-श्रांति चाखे ॥
स्व-जन तंव तयाचे भोंवताले मिळाले ॥
कवळिति निज-बंधू बाष्प-बिंदू गळाले ॥ ५० ॥
शिखरिणी. विसांवा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला ॥
नृ-पाळाचे स्कंधीं बसुनि मणि-बंधीं उतरला ॥

---

१ नुकती बाळंतीण झालेली. २ मानससरोवरांतील क्रीडा. ३ हे प्रिये.

म्हणे हंस क्षोणी-पतिस तुज कोणी सम नसे ॥
दयेचा हा ठेवा तुजजवळि देवा बहु वसे ॥ ५१ ॥

दिंडी. एक राया तूं थोर दया-सिंधू ॥ नीति-सागरही तूंच दीन-बंधू ॥
निखंदूनी बोलिलों नको निंदूं ॥ सकल[1] वदसी तरि पाय तुझे वंदूं ॥५२॥

,, पारधीमाजी ख-गा मृगा राजे ॥ करिति हिंसा जी तीच बरी साजे ॥
तुवां दिधली मज मोकळीक बा जे ॥ दया केली ही कीर्ति तुझी गाजे ॥५३॥

,, हंस मिळणें हें कठिण मही-लोकीं ॥ सोनियाचा तो नवल हें विलोकीं ॥
तशा मजलाही सोडिलें तुवां कीं ॥ तुझा ऐसा उप-कार मी न झांकीं ॥५४॥

,,तुझा कर-पंजर होय मला थारा ॥ तुझ्या वचनांचा ओघ दुग्ध-धारा॥
तुझें मानस[2] बहु थोर गा उदारा ॥ सत्य-लोकेशहि तूंचि गुणागारा ॥५५॥

,,किती रावे असतील तुझे धामीं ॥ किती कोकीळा सारिका तसा मी ॥
चित्त जडलें हें तूझिया लगामीं ॥ नृ-पा स्वामी मज योजिं तुझ्या कामीं॥५६॥

व० ति०. हें पांखरूं मजसि येइल काय कामा ॥
ऐसें नृ-पा न वद पूरित-लोक-कामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारी ॥
छाया करी तपन-दीप्तिसही नि-वारी ॥ ५७ ॥

मालिनी. [3]वर-नृ-पति वि-राजे भीम हें नाम ज्याला ॥
वर[4] **दमन**-ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
[5]वर-सुत **दम**-नामा, **दांत**-नामा द्वितीय ॥
[6]वर-तनु **दमयंती** नंदिनी हे तृतीय ॥ ५८ ॥

व० ति०. तेजो-निधीस तनया यमुना जसी ते ॥
**सीता** जशी [7]सु-**जनका** जनका[8] तसी ते ॥
ते आवडे सुतहि ते न तसे तयाला ॥
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ॥ ५९ ॥

,, राया तिचें मुख सुधा-कर या द्वयाला ॥
नाहींच वेगळिक हें गमतें[9] मनाला ॥

---

१ अन्वय—वदसी तरि ( आम्ही ) सकल तुझे पाय वंदूं. म्हणजे तूं सांगशील तर, आम्ही सारे तुझ्या पायां पडून क्षमा मागूं. २ एथें मानस सरोवर व ब्रह्मदेव हे अर्थ श्लेषानें सुचविले आहेत. ३ श्रेष्ठ. ४ प्रसाद, देणगी. ५ ज्येष्ठ म्हणजे पहिला मुलगा. ६ उत्तम शरिराची. ७ जनक राजाला. ८ बापाला. ९ वाटलें असतें.

सं-पूर्ण नित्य असता नसता कलंकी ॥
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ६० ॥

व॰ ति॰. चांपेकळीपरिसही सरल-त्व[1] नाकीं ॥
जीचा धरी अधर [2]विद्रुम-भावना कीं ॥
भासे मनांत मज [2]बिंब-फळ भ्रमानें ॥
कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें[3] ॥ ६१ ॥

पद. रूपवती ते भूप-सुता अनु-रूप नसे दुसरी वनिता ॥
रूप धरूनि वरीं तिजला अनु-रूप पयोधि जशी सरिता ॥ ध्रु॰ ॥
बीज अ-चंचळ शीतळ जे तजवीज कशी तुज हे नुमजे ॥
नीज जशी तुझिया नयना [4]सुख-बीज [5]स-पल्लव भाव लता ॥ १ ॥
सुंदर-ता तव तीजविणें अति मंद[6] गमे तरि काय जिणें ॥
कुंद-रदा तर मंदर-धीरा सुंदरिला हो वश करिता ॥ २ ॥
[7]नूतन-नीर-ज-नूत-मुखी पुरु-हूत-वधूसि सखी निरखी ॥
दूत तुझा परि मीच सुखी करवीन म्हणे [8]रघुनाथ-नुता ॥ ३ ॥ ६२ ॥

व॰ति॰. धाता करींच करिता मृदु हे न होती ॥
या कारणास्तव मनो-मय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला[9] रस[9] पूर्ण केली ॥
ओतीव हे न [10]घटिताकृति बोलिजेली ॥ ६३ ॥

[illegible] ऐसीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ॥
वि-श्रांतिही विरह-खेदहि फार झाला ॥

---

१ पोंवळ्याशीं सारखेपणा. २ अधरोष्ठ पोंवळ्यासारखा लाल असल्यामुळें त्यावर तोंडल्याची भ्रांति होऊन. ३ राघूनें अधरोष्ठास तोंडलें समजून तें खाण्यासाठीं आपली चोंचच काय पुढें केली. एथें दमयंतीच्या नासिकेवर राघूच्या चोंचीची उत्प्रेक्षा केली आहे, म्हणजे तिचें नाक राघूच्या चोंचीसारखें लांब होतें हें तात्पर्य. ४ सुखबीज म्हणजे सुखाचें मूळ आहे. ५ जशी निज सुखबीज (किंवा) सपल्लव लता (सुखबीज) (तशी) (ही) तुझिया नयना भाव. म्हणजे निद्रेनें जसें सुख होतें, किंवा पल्लवांनीं भरलेली वेल पाहून असें सुख होतें तशी ही तुला सुख देईल असें समज. ६ फार विशोभित. ७ "नुत" याबद्दल छंदाकरितां "नूत" असें घातलें आहे. नवी कमलानें जिचें मुख नुत म्हणजे स्तुत आहे म्हणजे नवीन कमलापेक्षांही जिचें मुख चांगलें. ८ रघुनाथपंडितानें स्तुत असा जो नळ आला. ९ शृंगार. १० हे न घटिताकृति (घडलेल्या आकाराची) (तर) ओतीव बोलिजेली.

आ-धार हा मज [1]म्हणोनि गणोनि डोले ॥
झाला सवेंचि विरही नळ-राज बोले ॥ ६४ ॥
व०ति०. वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ॥
चालन मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
[2]चक्रापरीच सजलों असतां फिराया ॥
[3]हंसा तुझा उदय होय सुखी कराया ॥ ६५ ॥
,, ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी ॥
दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥
आहे जणों जवळि हे गज-राज-गामी ॥
ऐसाच भाव तंव बोलतसें तिला मी ॥ ६६ ॥
,, भृंगें वि-राजित नवीं अरविंद-पत्रें ॥
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ॥
आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥ ६७ ॥
,, हंसा विलोकुनि सुधा-कर अष्टमीचा ॥
म्यां मानिला निटिल-देश तिचाच साचा ॥
[4]शंख-द्वयीं धरुनि कौंकुम[5] [6]कीर-वाणी ॥
लावावया तिलक लांबविला स्व-पाणी ॥ ६८ ॥
दिंडी. भला माझा तूं हंस गडी राया ॥ विरहदुस्तर-विस्तार निस्तराया ॥
चित्त नेघे मज तूज जा म्हणाया॥तेंचि[7] वाहन तरि तूं करीं फिराया ६९॥
,, असें बोलोनी नळें रंजवीला ॥ अंजुळीमाजी हंस बैसवीला ॥
गमे चंपक-कुसुमौघ-हार झेला॥पाठवाया युवतीस सिद्ध केला॥७०॥
,, त्वरित पुनरागम असो तुझा एथें॥ झेंप घालीं सुख-रूप गगन-पंथें॥
नको विसरूं आम्हांसि असों एथें॥वदुनि धरिजे गाहिंवरा मही-नाथें ७१॥
,, बरें येतों म्हणऊनि हंस बोले ॥उडुनि जातां बहु शकुन तया झाले॥

१ असें मानून. २ चक्रवाकपक्ष्याप्रमाणें. रात्रीं चक्रवाक नर आणि त्याची मादी ह्यांचा वियोग होत असतो आणि तो तिला अंधारांत धुंडीत फिरत असतो, अशी कविप्रसिद्धि आहे. ३ श्लेषानें सूर्य असा अर्थ घ्यावयाचा. सूर्योदय झाला म्हणजे चक्रवाकपक्ष्यांच्या जोड्याचा संयोग होत असतो. ४ कानशिलाच्या दोन हाडांमध्यें. ५ कुंकुमाचा, ह्याचा पुढील "तिलक" शब्दाकडे अन्वय. ६ खरोखर. ७ चित्त.

पवन-चंचळ मधु-बिंदु मुखीं आले॥वाम-भागीं उभयतां गरुड गेले ७२॥

दिंडी. उडत होते ख-ग वायसादि जाणा॥ तयां भासे तैं हंस तो ससाणा॥
नभा मानुनि कीं नि-कष-पाषाणा॥ स्वर्ण-रेखा तें तेज मनीं आणा॥७३॥

,, असा वेगें तो नभामाजि धांवे ॥ तया वैदर्भी देशिं क्षणीं पावे॥
तेथ कुंडिन-नगरासमीप धांवे॥ राज-मंदीरीं गो-पुरीं विसावे ॥ ७४ ॥

मालिनी. ख-ग मग नगरींचे गो-पुरीं झेंप घाली ॥
मृदु-पवन-गवाक्षीं वैसतां झोंप आली ॥
तदुपरि [1]जव-शाली वेंघला चंद्र-शाला ॥
निरखि [2]वि-तत-शाला राज-धानी वि-शाला ॥ ७५ ॥

चूर्णिका. सकल-भुवन-ललामायमाना ॥
[3]मानाधिक-वि-भव-धनिक-सदन-शत-वि-राजमाना ॥
[4]कलश-जनित-मुनि-चकित-जल-धि-शरणाति-
विस्तृत-परिखांतरीपायमाना ॥
[6]चंद्रशाला-वि-जित-सुर-विमाना ॥
जिचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभाचि माना ॥
लाविति ते जल-दा निज-माना ॥
वासव-चाप जयांस कमाना ॥
ऐसी कुंडिन-नामधेय-नगरी राज-हंसें पाहिली ॥ ७६ ॥

व॰ति॰. कोणी वणिग् जन विकी तुळितां तराजे ॥
कस्तूरिका तिजसवें अलिनी वि-राजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ॥
घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ ७७ ॥

---

१ वेगवान्. २ विस्तीर्ण आहेत वाडे जीमध्यें अशी. ३ मानाधिक म्हणजे गणती होत नाहीं असें. ४ अगस्तिऋषि. अगस्तिऋषीनें समुद्रजल प्राशन केलें अशी कथा आहे; तेव्हां त्याला भ्यालेला जो समुद्र त्याचें रक्षण करणाऱ्या अशा अतिविस्तृत ज्या परिखा म्हणजे खंदक त्यांच्यामध्यें अंतरीपायमान म्हणजे बेटाप्रमाणें असणारी. तात्पर्य कीं; कुंडिन-नगरीस सभोंवतीं खंदक असून ते इतके मोठे होते कीं, त्यांत समुद्रसुद्धां सामावला असता. ५ अंतरीप=बेट. ६ देवांचीं विमानें फार सुंदर असून तीं पृथ्वीपासून फार उंचावर चालतात, त्यांपेक्षांही कुंडिन-नगरींतल्या चंद्रशाळा म्हणजे वरच्या माड्या सुंदर आणि उंच होत्या; असें तात्पर्य.

तेणें तसें नगर तें धरितां निढारीं ॥
तेथें वि-लास-वन एक दिसे पुढारीं ॥
जेथें सु-शीतळ मही-तळ सांद्र साई ॥
जाई जुई फुल-मयी बहु आंब-राई ॥ ७८ ॥

पद. तया वनीं खेळे भूप-सुता ॥ ध्रु० ॥
खेळविता बहु मेळविला सखि-मेळ तया सहिता ॥ १ ॥
राजस ते द्विज-राज-मुखी गज-राज-गती ललिता ॥ २ ॥
ख्यात असे नळ-राज-कथा रघुनाथ-कवींद्र-नुता ॥ ३ ॥ ७९ ॥

व० ति०. तो मंडळाकृति फिरे उतरावयाला ॥
भैमी-मुखेंदु-परि-वेष म्हणों तयाला ॥
तेथें महीवरि असा ख-ग बैसताहे ॥
कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे ॥ ८० ॥

,, जो बैसतां चपळ पक्ष-पुटीं धरेला[1] ॥
हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला ॥
पाहे तया ख-ग-वरासि वरानना हे ॥
मानी मनीं नवलही मग बोलताहे ॥ ८१ ॥

शिखरिणी. असा पक्षी लक्षी बहु-विह-ग-लक्षीं न मिळता ॥
सु-वर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता ॥
अगाई हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी ॥
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी ॥ ८२ ॥

व० ति०. ऐसें वदे मग तयास धरावया हे ॥
तैं होय हंस-गमना[2] पहिलीच आहे ॥
वाजेच ना वलय नूपुर-नाद नोहे ॥
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ॥ ८३ ॥

,, हे मंद-मंद-पद सुंदर कुंद-दंती ॥
चाले जसा मद-धुर-धर इंद्र-दंती ॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते ॥

१ पृथ्वीला. २ दमयंती पहिलीच हंसगमना ( हंसाप्रमाणें हळू चालणारी ) होती ती पुनः हंस धरण्याकरितां तशी झाली, म्हणजे श्लेषानें, हंसाकडे गमन करणारी झाली.

[1]निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते ॥ ८४ ॥

दु॰वि॰. गवसलाच असा ख-ग भासला ॥ तंव तदीय सखी-जन हांसला ॥
मग सर्वेच बुझावुनि हांकिला ॥ उडविलाचि पिटाळुनि टाकिला ॥८५॥

व॰ ति॰. कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो ॥
नाहींच दूर न समीप बसे तसा तो ॥
पाहे सुधा-कर-मुखी कल-हंस-राया ॥
लाहे मनो-रथ तयास पुन्हा धराया ॥ ८६ ॥

सवाई. हंस धरीन म्हणोनि मनो-रथ हा मज होय वि-नोद तुम्हांला ॥
हा कल-हंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच, तुम्ही नलगेच, असें वदुनी नृप-राज-सुता ते ॥
राहविला सखिचा जन आपण-मात्र तयास धरूं मग जाते ॥ ८७ ॥

व॰ ति॰. रागेजली अरुण-कांति वि-राजवीते ॥
हे एकली सु-तनु चंद्र-कला तसी ते ॥
गेली हळूच कल-हंस समीप केला ॥
कांहीं पुढें फडकला अव-लोकिजेला ॥ ८८ ॥

" आणिकही पद न वाजत मंद चाले ॥
जो चालतां पदर सांवरिला न हाले ॥
हेही करी निज-करीं ख-ग सांपडेसा ॥
तोही हळू हळुच होय पलीकडेसा ॥ ८९ ॥

मालिनी. मद-गज-गमनेनें मागुती चाल केली ॥
वि-नत-तनु-लता हे तत्समीपास गेली ॥
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं ॥
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ९० ॥

व॰ ति॰. हंसें तदा चतुर-सं-मत युक्ति केली ॥
ते झालवीत सु-तनू बहु दूर नेली ॥
[2]छाया तियेशि दुसरी तिसरी वनाळी ॥
जे सांवळी युवति-तुल्य दिसे निराळी ॥ ९१ ॥

---

१ हातांत कांकणें होतीं तीं न वाजावीं म्हणून हात न हालविता. २ तिला दुसरी सोबतीण तिचीच छाया होती आणि तिसरी वनपंक्ति होती. तात्पर्य कीं, तेथें तिच्याशिवाय दुसरें कोणी मनुष्य नव्हतें.

प्रमाणिका. तया बनांत एकली ॥ वि-लासिनी विलोकिली ॥
मदें भरोनि डोलतो ॥ तियेस हंस बोलतो ॥ ९२ ॥

दिंडी. भूमि-मार्गी फिरणार तूं तुला मी ॥ कसा सांपडेन सांग गगन-गामी ॥
बाळ बाळें जरि होय चंद्र-कामी ॥ हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥९३॥
,, असो, सांपडतां तुझ्या करामाजी ॥ पुन्हा सुटका करिशील काय माझी ॥
कसा पातेजूं बाळ-बुद्धि तूझी ॥ स्त्री-स्वभावें बहु आणशील बाजी ॥९४॥

मालिनी. चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ॥
तरि न धरि मृगाक्षी वि-स्मयीं भाव कैसा ॥
पळुनि तिज निखंदी तीस तो खेद नाहीं ॥
शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ॥ ९५ ॥

दिंडी. कोण तूं गा कोठील कवणियाचा ॥ कसा झाला तव देह सोनियाचा ॥
कशी आली ही तूज मनुज-वाचा ॥ काय भाग्योदय सांगु या वनाचा ॥९६॥
,, धरिल पाहिल सोडील असा पाहीं ॥ मजवरता विश्वास तुझा नाहीं ॥
असो, पुसतें ते सांग कथा कांहीं ॥ जाइं अथवा मग याच वनीं राहीं ॥९७॥
,, असें बोलोनी मौन धरुनि राहे ॥ काय बोले तो हंस असें पाहे ॥
तदा त्याचा वचनौघ असा वाहे ॥ राज-कन्ये तूं आयकें गिरा हे ॥९८॥
,, ब्रह्मदेवाचे बहु विमान-वाही ॥ हंस आहेती ऐकिलें तुवांही ॥
तया वंशीं सौवर्ण-देह हाही ॥ ज्यासरीखा सखि सर्व-मान्य नाहीं ॥९९॥

व॰ति॰. मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ॥
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें ॥
आम्ही असों नृप-सुते [२]तरि कांचनाचे ॥
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १०० ॥
,, जो मानसीं [३] वि-हरतो वि-हरो परी तो ॥
कां आमुची [४]कुल-सती [५]अ-सती करीतो ॥
राखीं नळा [६]निज-यशो-मय-हंस राया ॥
आलों महीवर फिराद अशी कराया ॥ १०१ ॥

---

१ मी विचारितें ती (गोष्ट). २ म्हणून. ३ मानस-सरोवरी. ४ कुलाची कीर्ति. ५ खोटी. ६ नळाचा यशोमय हंस हा मानससरोवरीं येऊन विहार करतो तो खुशाल करो, पण "आम्ही सुवर्ण-कांति हंस" ही जी आमच्या कुळाची कीर्ति आहे ती नाहींशी करतो; कारण तो शुभ्र असल्यामुळें आम्ही शुभ्र होतों. याकरितां हे नळा, आपला यशोमय

व० ति०. मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौघ-पाशीं ॥
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ॥
लोकेशता विं-भवही चतुराननाचे ॥ १०२ ॥

,, एकांत लेखनहि याचनहीं करीतो ॥
माझी तनु-द्युति समीप तदा धरीतो ॥
याकारणें नळ मला बहु आप्त मानी ॥
तो सांगता निज-मनो-रथ होय कानीं ॥ १०३ ॥

,, आधींच नैषध-कथा नवनीत-मेला[1] ॥
होता अलं-करण-रूप इच्या जिभेला ॥
[2]हंसोदयें विघरतां अधरीं धरी ते ॥
स्वीकारितां वचन तें मग आदरीते ॥ १०४ ॥

दिंडी. नळें तुजशीं एकांत काय केला ॥ तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥
तया बोलोनी निववीं या भुकेला ॥ एकवावा मज म्हणुनि नायिकेला ॥ १०५ ॥
नळाशीं जो एकांत तुझा तो कां ॥ प्र-कट कीजे म्यां सांग इतर लोकां ॥
धन्य डोळे न करोनि तदालोका ॥ नळ-कथेनें हे कर्ण धन्य हो का[4] ॥ १०६ ॥
निषध-राजीं हे फार दिसे राजी ॥ असें हंसें जाणोनि मनामाजी ॥
बोलिजेली नळ-राज-कथा हे जी ॥ मला हेजीब तीशि म्हणे हे जी ॥ १०७ ॥
नळ म्हणाला मज सहजें धरुनि बाहीं ॥ तुला कोठेंही बंक अटक नाहीं ॥
सकळ भुवनें तरि फिरुनि राज-गेहीं ॥ एक नवरी मज योग्य बरी पाहीं ॥ १०८ ॥

व० ति०. एकांत हाच वदला मज जाण बाळे ॥
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ॥
एणेपरी परिसतांच तया अनन्या[5] ॥
ते बोलते चतुर सुंदर राज-कन्या ॥ १०९ ॥

[6]मी जाण देवनळही स्व-करीं धराया ॥

---

हंस आपणाजवळ राखून ठेव अशी फिर्याद करण्याकरतां पृथ्वीवर आलों आहें. तात्पर्य कीं, नळाची निष्कलंक कीर्ति मानससरोवरापर्यंत गेली होती.

१ गोळा. २ सूर्योदयें, पक्षीं; हंसागमनानें. ३ न ऐकलेला म्हणून. ४ होईनात कां. ५ जवळ कोणी दुसरें नव्हतें अशाला म्हणजे एकट्याला. ६ (अन्वय-१.) काळें करूनि जोंवरि लेखीं सुख होय (तोंवरि) देवनळ हा स्वकरीं धराया (योग्य आहे असें) मज लाभ जाया (मला) निर्लज्जता प्राप्त होणाला चतुरा मी सांगन काय।

सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
काळें करूनि सुख जोंवरि होय लेखीं ॥
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ ११० ॥
रुक्मिणी. श्लेष-शब्दें इणें भाव सांगीतला ॥
नैषधाधीश तो नाथ मागीतला ॥
होय[1] जाणीयली घे त्रपा-कंचुला ॥
हंस बोलावया हालवी चंचुला ॥ १११ ॥
व० ति०. गांठ्याळ जें हृदय सांद्र[2] न होय ज्याचें ॥
नामेंचि देवनळ कार्य नसे तयाचें ॥
धत्तूर हा कनक-नाम सदा धरीतो ॥
होईल काम रसिका कनकापरी तो ॥ ११२ ॥
ती बोलते युवति, लाज मनीं दडाली ॥
होती, तुवां विघरतां मन ती उडाली ॥
आतां वरूं नळ-वरासि तुला नबाजूं ॥
गाऊं तुझी स्तुति करूनि कशास लाजूं ॥ ११३ ॥
मालिनी. परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें ॥
पतग-कुल-वतंसें अंतरीं ध्याइजेलें ॥

---

हे जाण. अर्थ—कांहीं काळानें जोंपर्यंत नळ मला वरील, तोंपर्यंत देवनळही हातीं धरण्याला म्हणजे लेखद्वारा परस्परांचें मनोगत परस्परांस कळविण्यामध्यें सुख करून घेतलें पाहिजे. मला जास्त बोलण्याला लाज वाटते. तूं चतुर आहेस. तुला आणखी सांगणें नको. अथवा—( अन्वय—२ ) ( हे ) देवनळ ( नळराजा ) या ( व ) ही ( मां ) स्वकरीं धरा. मी जाण ( जाणती ) मज जाया (आपण होऊन जाण्याला) लाज न काय ? काळें करूनि इत्यादि ( पूर्ववत् ) ( असें ) चतुरा सांग. अथवा ( अन्वय ३ )—चतुरा मला लाज काय? ( हे ) देवनळ या ( व ) ही जाया ( स्वस्त्री म्हणून ) स्वकरीं धरा, ( असें ) मी काळें करूनि सांगेन जाण. ( जोंपर्यंत तो मला वरी ) ( वरील ) तोंवरि लेखीं सुख होय. अथवा—( ४ ) नळ हा देव ही म्हणजे देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्याप्रमाणें कांहीं काळानें त्याचें प्राप्तिरूप सुख होईपर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणिग्रहण करण्यास योग्य आहे असें सांगेन काय ? तात्पर्य कीं, तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं म्हणून तूं पूर्व श्लोकांत विचारिलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय ? असें सांगण्यास त्यांस लाज नाहीं काय ? देव असले तरी सांगणार नाहींत; असें उत्तर दिलें. ह्यांत लाजेमुळें सांगत नाहींत पण मनांतून तसें असतें असें सुचविलें ह्यावरून नळच इष्ट आहे असें दर्शविलें.

१ ओळखिली गेली—म्हणजे तिचा भाव हंसानें जाणिला. २ स्निग्ध, मृदु, कोमल.

पर-वश-हृदया हे नैषधें राज-हंसें ॥
म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें ॥ ११४ ॥

दिंडी. जशी रंजलि आहेस निषध-भूपीं ॥ तसा तोही रंजला तुझ्या रूपीं ॥
देव-घटने अन्योन्य व्हाल सोपीं ॥ तुम्ही नांदा लहि सत्य हें निरोपीं ॥ ११५ ॥
,, कोण योजावी नोवरी नळाला ॥ ब्रह्मदेवानें हा विचार केला ॥
तुझा नामाक्षर-संघ घेइजेला ॥ असें भासतसे माझिया मनाला ॥ ११६ ॥

मालिनी. नळ-रहित वराशीं तूज योजूनि पाहे[1] ॥
तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे ॥
अ-चतुर नर तोही जाहल्या[2] जेविता कीं ॥
सळमिसळ करीना सर्वथा क्षीर-ताकीं ॥ ११७ ॥

दिंडी. कशाला हें बोलणें काय एणें ॥ तुवां वरिला नळ-राज तूंहि तेणें ॥
स-फळ माझें हें एथवरी येणें ॥ राज-कन्ये नीरोप मला देणें ॥ ११८ ॥
,, चतुर सुंदर तो तरुण निषध-राजा ॥ तुवां राजी केलाच तूं घरा जा ॥
धन्य वैदर्भी दैव-योग तुझा ॥ बोल मानीं सत्यार्थ मनीं माझा ॥ ११९ ॥
,, असें जाउनि तूं बोल राजहंसा ॥ तुझी दासी जाहलें राज-हंसा ॥
नको चिंता तूं करूं अरि-ध्वंसा ॥ ऐक शुभ्रांशू-वंशजावतंसा ॥ १२० ॥
,, नको पाहूं तूं नोवरी नळाशी ॥ मीच भावें होईन सत्य दासी ॥
जरी यावें आतांचि तयापाशीं ॥ गोष्ट भासे विपरीत लौकिकाशी ॥ १२१ ॥

मालिनी. करुनि मज रवाना राजसे तूजसाठीं ॥
नृ-पति निरखि माझी वाट [3]आराम-वाटीं ॥
बसवुनि निज-पाठीं तूज नेईन तेथें ॥
परि चुकुर तुझे हे लोक होतील एथें ॥ १२२ ॥

व० ति०. येरीकडे नृ-पति धाडुनि राजहंसा ॥
तो बैसला करित आपण तत्प्रशंसा ॥
येईल शीघ्र घटना करुनी तियेची ॥
होईल भेटि मज आज तये प्रियेची ॥ १२३ ॥

शा० वि०. तों चिन्हें शुभ पाहुनी नृ-प म्हणे लाभेल लाभावळी ॥
आला सन्मुख राजहंस निरखी, ऊरू-युगीं आंवळी ॥

---

१ योजूं पाहील. २ जेविता जाहला तर–जेवूं लागला तर. ३ बागेच्या वाटेमध्ये–बागेत.

बोले मंजुळ वाक्य एथ बसलों स्वद्ध्यान लावूनि रे ॥
झालें वृत्त समग्र सांगुनि करीं.हंसा समाधान रे ॥ १२४ ॥

दिंडी.काय वदली.तुजसवें हंस-राया ॥ मान्य झाली कीं ती मला वराया ॥
कधीं भेटे ती निज-करीं धराया ॥ विरह-बाधा मज नये आवराया ॥१२५॥

,, हंस बोले नृ-प-राज सु-गुण-सारा ॥ माळ घालीते ती तुला उदारा ॥
तुझ्या ध्यानीं सलग्न जे विचारा ॥ सत्य मानीं ती होय तुझी दारा ॥१२६॥

,, जाइं नगरा तूं नृ-पा कृपा-राशी ॥ पत्र येतांची जा स्वयं-वरासी ॥
स्वयें ये ते चालूनि मंदिरासी ॥ फार वदणें नलगे सुखोत्करासी ॥१२७॥

,, बरें येतों बोलोनि पाय हातें ॥ नमुनि चाले स-प्रेम तो गृहातें ॥
नृ-प निघे तैं सह-चमू निज-पुरातें ॥ हंस-वचनीं लावुनी अंतरातें ॥१२८॥

,, जनक-तनयेशीं पवन-तनयसा तो ॥ वदुनि वेगीं उड्डाण (न) नभीं घेतो ॥
नळापाशीं वृत्तांत निवेदी तो ॥ स्व-धामातें पावोनि सुखी होतो ॥१२९॥

,, असो ऐशी हे कथा सौरसांची ॥ श्रवण करितां बहु गोड गमे साची ॥
धन्य लीला त्या एक नैषधाची ॥ प्रकट वाणी रघुनाथ-पंडिताची ॥१३०॥

,, असो आल्या इजजवळि सख्या ऐशा ॥ बोलती त्या मग तीस सकळ केशा ॥
हंस धरुनि परि-पूर्ण तुझी आशा॥काय गेला तो उडुनि गगन-देशा.॥१३१॥

मालिनी. धरुनि कर सखींनीं सौध-शालेंत नेली ॥
ख-ग-वचन-मधूनें[2] जे मनीं मोहिजेली ॥
नळ-विरह-भरानें पोळली गुप्त-रूपें ॥
नवल कनकशी ते [3]गौरही तप्त-रूपें ॥ १३२ ॥

शिख॰ न रंजे कारंजें निरखुनि [4]फणीतें [5]फणफणी ॥
[6]मुदेनें मोदेना नल-गुण-गणीं जे [7]गुणगुणी ॥
न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुक-गिरा ॥
न[8] [9]नाहे, माना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥१३३॥

मालिनी. गजबज बहु झाली माय धांवोनि आली ॥
धरुनि हृदय-देशीं तीजला सेज केली ॥

---

१ अन्वय—जे तुझ्या ध्यानीं सलग्न ती तुझी दारा होय ( त्या ) विचारा सत्य मानीं. २ रसभरित. ३ अन्वय—कनकशी ते तप्तरूप ही गौर-सुवर्णासारिख्या कांतीची ती तप्त झाली असतां ही गौर राहिली, हें नवल होय. ४ केस विंचरण्याच्या फणीला. ५ त्रासे. ६ डोक्यांत घालण्याच्या मुदेनें. ७ गुणगुण करी. ८ स्नान न करी. ९ समजा.

करिति विझण-वारे त्या सख्या वेगळाल्या ॥
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १३४ ॥

गीति. ते शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले ॥
औषध [1]भलगे मजला परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले ॥ १३५ ॥

दिंडी. मूल उप-वर हे जाहलें इयेला ॥ पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला ॥
असें ऐकोनि [2]वधूचिया बोला ॥ स्वैंवराचा मग यत्न नृ-पें केला ॥ १३६ ॥
,, नगर सारें शृंगारविलें तैसें ॥ भूमि-लोकीं वैकुंठ दिसे जैसें ॥
लिखित पाठविलें सकळ नृ-पां कैसें ॥ तुम्हीं यावें जी स्वैंवरासि ऐसें ॥ १३७ ॥
,, निषध-राजासी लिखित पाठवी तो ॥ प्रति-द्वीपीं भू-पतिसही लिहीतो ॥
अशा यत्नीं लागला नृ-प अहो तो ॥ पुढें परिसा वृत्तांत कसा होतो ॥ १३८ ॥
,, ऋषी नारद असतां नभो-विहारीं ॥ वैजयंती ज्या दिसे मनोहारी ॥
मणी रमणीय कनक-कलश भारी ॥ सुर-पतीचा जो सौध महा भारी ॥ १३९ ॥
,, तया प्रासादीं जाय ऋषी पाहे ॥ सभा केली देवेंद्र बैसलाहे ॥
फार आदरिलें तया देव-रायें ॥ अर्घ्य-पाद्यादिक करुनि वि-नत-कायें ॥ १४० ॥

भु० प्र०. समुद्रोद्भवा अप्सरा साठ कोटी ॥
जयांची द्युती ते रतीलाहि लोटी ॥
विधीनें तशा त्या तुळूं पाहिजेल्या ॥
जियेशीं [3]हळू जाहल्या उंच गेल्या ॥ १४१ ॥

मालिनी. उप-वर दमयंती जाहली नोवरी ते ॥
कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥
दृढतर-निज-लज्जा-गव्हरीं गुप्त केला ॥
जिवलगाहि सखीला जो नसे सांगिजेली ॥ १४२ ॥

दिंडी नवे तरणे नृप-मुल्य तीजसाठीं ॥ मोहिले ते करितातिं यत्न कोटी ॥
कलह-वार्ता ही मानितातिं पोटीं ॥ तया युवतीची आस तयां मोठी ॥ १४३ ॥
,, असें नारद बोलोनि तो निघाला ॥ जाय हृदयासी मानल्या स्थळाला ॥
थोर चिंता मग होय सुरेंद्राला ॥ म्हणे कैसी ते वरिल आपणाला ॥ १४४ ॥
,, वरुण पावक यम इंद्र हे मिळाले ॥ असे चौघेही रथारूढ झाले ॥
मही-लोकासी यावया निघाले ॥ तया कुंडिन-नगरासमीप आले ॥ १४५ ॥

---

१ भलगे म्हणजे नको. श्लेषानें-नल गे म्हणजे मजला गे नल हेंच औषध. २ भीम-राजानें आपल्या बायकोचें बोलणें. ३ हलक्या;-हें नारदाचें बोलणें.

द्रु० वि०. तंव तया चवघांस तया पथीं ॥
निषध-नायक येत दिसे रथीं ॥
तरुण सुंदर जो चतुराग्रणी ॥
अ-तुल वैभव राज-शिरोमणी ॥ १४६ ॥

मालिनी. निरखुनि निषधेंद्रा इंद्र तो बोलताहे ॥
युवति उभयताही लभ्य आम्हांसि नोहे ॥
वरिल जरि नळाला ते तया लाभली जे ॥
न वरि तरि आम्हांसी मूढ[1] ते काय कीजे ॥ १४७ ॥

शिखरिणी. नळातें पाचारी सुर-पति विचारी कुशल तो ॥
म्हणे आम्हांपाशीं तव गुरु[2] वि-लासी नि-वसतो ॥
खुणा ज्या ज्या त्याच्या तुजजवळि त्या त्या निरखितों ॥
खरा तूं तद्वंशी म्हणउनि तदंशी समजतों ॥ १४८ ॥

व० ति०. तो वन्हि तो वरुण तो यम इंद्र गा मी ॥
झालों तुला सकळ हे विदित स्व-नामीं ॥
बोले मही-रमण हा नल चंद्र-वंशी ॥
वंदी पदास तुमच्या तुमचाच[3] अंशी[3] ॥ १४९ ॥

दिंडी. नळा कोठें जातोसि असें बोले ॥ नळें इंद्रासी असें बोलिजेलें ॥
भीम-भू-पें हें लिखित पाठवीलें ॥ सैंवरालागीं येइजे वहिलें ॥ १५० ॥
,, बोलताहे देवेंद्र नृ-प-वराला ॥ नैषधा तूं आलासि सैंवराला ॥
समज आम्ही तुजजवळि याचनेला ॥ करूं आलों मनिं धरुनि कामनेला ॥ १५१ ॥

व० ति०. जे हे दिशों-पति विशाल-यशा अशांला ॥
आशा-वशा कु-वलयांत दशा कशाला ॥
हा बोल तूं न [4]वद, तूजसमीप येतों ॥
आम्ही मखीं निज मुखीं अव-दान घेतों ॥ १५२ ॥

१ मूर्ख. जर नळाला तिनें वरलें नाहीं तर अशी मूर्ख आम्हांला काय करावयाची आहे. २ पिता वीरसेन. ३ राजा हा अष्टलोकपालांचा अंश असतो—" अष्टानां लोकपालानां वपुर्धारयते नृपः " असें मनूचें वचन आहे. ४ अन्वय-" ( हे ) विशालयशा ( नळा ) जे हे दिशापति अशांला कुवलयांत अशावशा दशा कशाला, हा बोल तूं न वद. " अर्थ-हे विशालकीर्ते नला, हे सारे दिक्पाळ असून त्यांची दृष्टि पृथ्वीवरील पदार्थांच्या आशेनें बद्ध कां ? असें तूं म्हणूं नको; कां कीं

व० ति०. कला ।वचार हृदयीं नळ-राज यानें ॥
हा जीवही धनहि देइन निश्चयानें ॥
देवेंद्र दे जरि, म्हणेल कदापि भैमी ॥
ते देववेल मज काय ? करीन गै[1] मी' ॥ १५३ ॥

दिंडी. म्हणे राजेंद्र तया देव-देवा ॥ काय आज्ञा जी काय करूं सेवा ॥
वीरसेनाचा थोर पुण्य-ठेवा ॥ मज मिळाला तो दर्शनाख्य मेवा ॥ १५४ ॥

व० ति०. बोले सुराधिप नराधि-पतीस राया ॥
भैमी जसी मज वरील तसें कराया ॥
बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ॥
तूं बोलका चतुर केवळ होस राजा ॥ १५५ ॥

मालिनी. मग हळुच सुरेंद्रा [2]बोलिजे भू-पतीनें ॥
मज [3]निज-सुमनाची घातली माळ तीनें ॥
हृदय तरि तियेचें सांद्र झालें [3]सु-वासें ॥
चलित न करवे तें कोणत्याही प्रयासें ॥ १५६ ॥

दिंडी. पुन्हा बोले देवेंद्र नृ-प-वरा या ॥ तुला झालें वश हृदय तिचें राया ॥
तरिच आलों हे याचना कराया ॥ तुझ्या वाक्यें आम्हांसि ते वराया ॥ १५७ ॥

व० ति०. दातव्यही[4] स्व-वश आपण जाणताही ॥
पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥
दाता असा शठ कसा ठक-सा कदापी ॥
जो याचकावरि दया न करीच पापी ॥ १५८ ॥

मालिनी. गहिंवरत गळाही चावळे जीभ चाळे ॥
विकळपण शरीरीं कंपही या निराळे ॥
धनिक वि-मुख होतां अंतरीं शोक राहे ॥
हर हर मज भासे यातना याचना हे ॥ १५९ ॥

१ कानाडोळा. २ बोलिजेलें ( म्हटलें ). ३ पुष्पाची; 'तरी तिचें हृदय सुवासानें ( चांगल्या वासानें ) भरलें आहे. आतां मजकडे पुष्पांची माळ आली असतां तिजकडे सुवास राहील कसा ? तर सुमनाची' म्हणजे आपल्या चांगल्या मनाची आणि सुवास म्हणजे माझा तिच्या मनांत चांगला वास म्हणजे वसति. तात्पर्य कीं, तिचें मन मजवर पक्कें बसलें आहे. ४ जें द्यावयाचें तें.

व० ति०. [1]भांबावला धन-मदें भलतेंच बोले ॥
तो बोलही स-रस मानुनि लोक डोले ॥
मासेंकरूनि फुगला [2]गळ-सान्न भावे ॥
ज्या दीन मीन धरितां वळसाच पावे ॥ १६० ॥

दिंडी. असे परिसोनी बोल वासवाचे ॥ तया नळ-राजा काय वदे वाचे ॥
तुम्ही ज्ञाते हो थोर थोर साचे ॥ असां साक्षी तुम्हि माझिया मनाचे ॥ १६१ ॥
,, ज्याशि जेथें सामर्थ्य नसे त्यातें ॥ कसें कार्या त्या तुम्हीं सांगिजेतें ॥
बाळ तान्हें उचलील काय जातें ॥ [3]बोलणाराचें मोल [3]फोल जातें ॥ १६२ ॥
,, सात बंकांही पलीकडे हो ते ॥ राजकन्येची भेट कशी होते ॥
त्यजुनि राज्य त्वदूतता कशी ते ॥ धरावी म्यां हृदयासि जे [4]करीते ॥ १६३ ॥

व० ति०. बोले सुरेंद्र नृप-सौध सुखें फिराया ॥
आकार गुप्त वर देइन देव-राया ॥
जाई [5]विदर्भ-वसुधेस सुतेस शोधीं ॥
आम्हांसि ते तरि वरील तुझ्याच बोधीं ॥ १६४ ॥

ओंव्या. इंद्र त्रैलोक्य-नायक ॥ तोही झालासे याचक ॥
दाक्षिण्यानें भू-पाळक ॥ यांच्या वाक्यें गुंतला ॥ १६५ ॥
,, बरें म्हणोनी उत्तरें ॥ रथावरोनि ऊतरे ॥
तया राज-पुरीं शिरे ॥ शोभा तेथील पाहतो ॥ १६६ ॥

व० ति०. प्राणापरीच हृदयीं नगरांतरीं तो ॥
गुप्त स्व-रूप नल भू-प तदा धरीतो ॥
बंकीं रिघे तंव तया दिसताति बंके ॥
पंकेरुहास्य[6] न दिसेचि तया[7] न शंके[7] ॥ १६७ ॥

ओंव्या. तया राज-सौधांतरीं ॥ शोभा पाहे परोपरी ॥
कोठें आहे ते सुंदरी ॥ धुंडावया लागला ॥ १६८ ॥

---

१ ह्या क्रियेचा कर्ता "धनिक" अध्याहृत आहे. २ मासे धरण्याच्या गळाप्रमाणेंच भावे म्हणजे वाटतो. हा गळ मांसानें फुगलेला असतो म्हणजे ह्यास मांस लावलेलें असतें. धनिक तर मांसानें पुष्ट असतोच. ह्या गळाला मीनानें म्हणजे माशानें धरलें म्हणजे तो वळसा पावतो म्हणजे गरक्यांत येतो. तसें दीनानें धनिकास धरिलें असतां त्याला गोता बसतो म्हणजे तो फसतो. ३ बोलण्याचा मातबरी ( योग्यता ) राहत नाहीं. ४ पीडा देते. ५ कुंडिननगरीस. ६ कमलमुख-नल; ७ कोणाला त्याविषयीं शंका आली नाहीं.

ओंव्या. कोणी एक दोघी दूती ॥ तेथें अन्योन्य बोलती ॥
एथें आहे दमयंती ॥ जाई बोलोनि येई ॥ १६९ ॥
" तिजसवें सौधांतरीं ॥ राजा जाय अंतः-पुरीं ॥
तेथें देखिली सुंदरी ॥ जैसा पूर्ण चंद्रमा ॥ १७० ॥
" सुमन-सेजेच्या पलंगीं ॥ बैसलीसे तन्वंगी ॥
सख्या खेळतांती संगीं ॥ बहु अप्सरा त्या जैशा ॥ १७१ ॥

मालिनी. प्रगट तिजपुढारां जाहला राज-मौळी ॥
पदर वरि न घेतां हार जैसा झळाळी ॥
निज-हृदय-नि-वासी काय बाहेर आला ॥
निरखुनि दमयंती तेविं मानी तयाला ॥ १७२ ॥

द्रु० वि०. गजबजोनि समस्त तिच्या सख्या ॥ गज-गमा उठल्या तिजसारख्या ॥
पदर सांवरितां नृ-प-बाळिका ॥ झळकती हृदयीं मणि-माळिका ॥ १७३ ॥

शा० वि० रामातें जनक-क्षमा-पति-सुता, रामा[1] जशी रेवती ॥
कामारीस[2] नगाधि-राज तनया, कामासि जैशी रती ॥
या मानूनि तशी विदर्भ-दुहिता रामा मनीं भाविते ॥
हा माझा हृदयाब्ज-सूर्य म्हणुनी त्या मानिनी बोलते ॥ १७४ ॥

साकी. 'कोण तुम्ही कवणाचे कोठुनि एथें कां आलां हो ॥
काय निमित्तें दिधला मजला हा निज-दर्शन-लाहो ॥ १७५ ॥
" अटक न केली तुम्हांसि येतां त्या सातांही बंकीं ॥
हीं माझ्या नयनांचीं सु-कृतें वि-शेष मी हें शंकीं ॥ १७६ ॥
" सं-भवलां कवणाचे वंशीं सांगा हो अ-कलंकीं ॥
उभे असां कां भागतसां हो या बैसा पर्यंकीं ॥ १७७ ॥

व० ति०. राजे असाल तरि धन्य वसुं-धरा हे ॥
शोभाल देव तरि नाक यथार्थ आहे ॥
भोगी तुम्ही उपजलां जरि नाग-लोकीं ॥
खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ १७८ ॥

साकी. दुग्ध-पूर नसतां निज-रूपीं क्षीर-सिंधु तो जैसा ॥
वसंत आला नाहीं तरि तो उद्यान-भाग जैसा ॥ १७९ ॥

---

१ बलरामास. २ शिवास.

साकी: अ-मृत-कराचा उदय न होतां रजनी-समयो जैसा ॥
तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा ॥ १८० ॥

व०ति०. भू-पाळ जो मन मनो-मुकुरीं उमासे ॥
तो नैषधेंद्र तुमचा अनु-बिंब भासे ॥
रूपें तशींच दिसताति दिगंतराळीं ॥
तीं हीं कशीं म्हणवतील तुम्हांनिराळीं ॥ १८१ ॥

साकी. स-रस-द्युति-पद फुल शिरसांचें फुललें मृदु स्व-भावें ॥
चालवाल किति दूर तयातें अ-दय हृदय मज भावे ॥ १८२ ॥
,, कर्ण-युगल हें धन्य करावें सांगुनियां निज नांवें ॥
स्तवन करी **रघुनाथ** तयाचें कवन स्वीकारावें ॥ १८३ ॥

**दमयंतीचें हें बोलणें ऐकून नलराजा तिला म्हणतो:—**

व०ति०. आहेस कीं सुख-वती कमनीय-लीळे ॥
निश्चित कीं हृदय होय तुझें सु-शीळे ॥
आतां नकोच अव-लंब [1]वि-लंबनाचा ॥
हेजीब मी समज मुख्य सुराधि-पाचा ॥१८४ ॥

स्वागता. जो धरी निज-करीं शत-कोटी ॥ ज्याशि नम्र सु-मनःशत-कोटी ॥
तो सुरेंद्रहि तुला नत याची ॥ हा असो वर, तुला न तयाची ॥१८५॥

घनाक्षरी. (?) तया इंद्रा करीं धरीं ॥ अथवा तयाचे शेजारीं ॥
नांदे जो [2]तेजो-निधी भारी ॥ तया वरीं राजसे ॥
तोही येईना जरी मना ॥ तरी वरावें [3]शमना ॥
अथवा करूनि करुणा ॥ त्या वरुणा वरीं कीं ॥
ऐसें बोलतां भू-पाळ ॥ काय बोले ते वेल्हाळ ॥
कांहो बोलतां पाल्हाळ ॥ नाम कुळ सांगावें ॥ १८६ ॥

व० ति०. बोले नृ-पाळ पुससी मज वंश नामें ॥
यावीण सांग तटलीं तुझिं काय कामें ॥
आलों सुधांशु-मुखि जे घटना कराया ॥
तीतें विचारूनि वरीं सुर-लोक-राया ॥ १८७ ॥

१ उशिराचा. २ याचना करतो. ३ बरोबरी. ४ अग्नि. ५ यमाला.

घनाक्षरी. बोले सुंदरी तयासी ॥ स्व-वंश-नाम-न सांगसी ॥
तरी आम्ही पर-पुरुषासीं ॥ वदणें मर्यादा नोहे ॥
तिचा पाहुनियां कोप ॥ काय बोले नळ-भू-प ॥
चंद्र-वंशाचें हें रोप ॥ माझें जाण राजसे ॥
महा-जनाचा आ-चार ॥ निज नामाचा उच्चार
करूं नये हें साचार ॥ [1]शास्त्राधार आहे कीं ॥
पुन्हा बोलते सुंदरी ॥ चंद्र-वंशी महीवरी ॥
बहु आहेत ते परी ॥ नामें घेतां जाणवे ॥ १८८ ॥

गीति. मी वासुदेव ऐसें स्व-नाम मुर-हर वदे सकळ-वेदी[2] ॥
आ-धार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी ॥१८९॥

घनाक्षरी. (?) बोले नैषधेंद्र वाचा ॥ नाम [3]हेजीब इंद्राचा ॥
किती साक्षेप नामाचा ॥ काय तेणें करिसी तूं ॥ १९० ॥
केला काय अंगीकार ॥ बोलूं इंद्रासी निर्धार ॥
तंव ते बोले सुकुमार ॥ चंद्राकार-वदनातें ॥ १९१ ॥

व०ति०. ऐरावतावरि बसोनि [4]विमान-देशीं ॥
जो सं-चरे सुर-पती सुख-संपदेशीं ॥
मी भूमिकेवरि असोनि तयास कांहीं ॥
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥ १९२ ॥

घनाक्षरी. नळावेगळा भ्रतार ॥ नलगे स्वप्नीं हें साचार ॥
ऐसा निश्चय विचार ॥ तंव राजेंद्र बोलतो ॥
टाकुनि इंद्राचा सं-भ्रम ॥ धरिशी कां तूं नळ-भ्रम ॥
जाईल वि-श्राम-वि-भ्रम ॥ नसता श्रम होईल ॥
तुझें सौंदर्य पहावया ॥ धरी सहस्राक्ष काया ॥
तया वरीं देव-राया ॥ नळ-माया टाकुनी ॥
अथवा तुज तो मोहला ॥ होऊं [5]नेदी नैषधाला ॥
यास्तव त्याच इंद्राला ॥ माळ गळां घालावी ॥ १९३ ॥

१ 'आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च ॥ श्रेयस्कामो न गृह्णीयाज्ज्येष्ठापत्यकलत्रयोः॥' अशी स्मृति आहे. २ जागणारा. ३ दूत. ४ विमानें फिरतात तेथें म्हणजे आकाशांत. ५ 'वरूं नेदी.

व० ति०. एणेंपरीच अनळासि यमाधिपासी ॥
पाशीसही तरि वरीं म्हणतां नृ-पासी ॥
आ-धार लेश न वदे नव-सारसाक्षी ॥
होते तयासि सुर-नायक गुप्तसाक्षी ॥ १९४ ॥

,, ऐसा अ-वंचक वदोनि नृ-पाळ आला ॥
इंद्रादिकांसहि नि-वेदित वृत्त झाला ॥
पाचारिले मग महींद्र विदर्भ-भूपें ॥
आले समस्तहि सभेसि स-हर्ष-रूपें ॥ १९५ ॥

ओंव्या. इंद्रादिक तेही अधि-प ॥ धरूनि आले नळ-रूप ॥
सभे बैसले अमूप ॥ जेथें भूप शोभती ॥ १९६ ॥

,, आला नळही भू-पाळ ॥ कीर्ति-रूपें जो विशाळ ॥
तदा दमयंती वेल्हाळ ॥ सखियांसीं बोलते ॥ १९७ ॥

,, नळ-राज-हिरा वरिला ॥ तोचि मनीं म्यां धरिला ॥
सुर किंवा नर भला ॥ न वरीं अन्यातें निश्चयें ॥ १९८ ॥

,, ऐसें बोलोनी सुंदरी ॥ बैसे शिबिकेभीतरीं ॥
आली राज-सभांतरीं ॥ बरोबरी शारदा[1] ॥ १९९ ॥

,, बोले शारदा तियेला ॥ ऐकें राजांच्या नामांला ॥
मना येईल तयाला ॥ माळ गळां घालीं तूं ॥ २०० ॥

शा० वि०. हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावली कंधरीं ॥
हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे अन्दरीं ॥
हा राजीव-दलाक्ष सद्गुण-निधी फारा जनांचा महा ॥
थारा, हाच वरीं, रिपूंशि परते[2] सारावयाचा पहा ॥ २०१ ॥

व० ति०. एणेंपरीच बहु भू-प नि-वेदिजेले ॥
हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥
जेथें वळी[3] धरूनि पंच-नळी[4] बसे ते ॥

१ स्वयंवराच्या वेळीं वधू ( नवरी ) राजसभेमध्यें वर निवडण्याकरितां जाऊं लागली म्हणजे जिला तेथें जमलेल्या राजांची चांगली माहिती असून जी मोठी चतुर आहे अशा प्रकारची एक स्त्री तिच्याबरोबर असते, अशी प्रसिद्धि आहे. तशी ही एथें शारदा आहे. २ पराजय करून परत फिरविणारा. ३ ओळ, रांग. ४ पांच नळ.

तेथें विरिंचि-तनयेसमवेत येते ॥ २०२ ॥

घनाक्षरी. (१) बोले शारदा वचन ॥ एथें बाई सावधान ॥
बरें घालूनियां मन ॥ नर-लाभें सुखी हो ॥ २०३ ॥

व० ति०. ज्याचीं पदें धरिति ठेव शिरो-ललामीं ॥
स्वाराज्य[1] जो मिरवितो गज-राज-गामी ॥
जो वज्र-पाणि बहु लोचन कांति भारी ॥
हा[2] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २०४ ॥

,, साहील कोण सजणे बहु तेज याचें ॥
[3]मध्य-स्थ रूप धरितो हरिचे यमाचे ॥
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ॥
हा[4] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २०५ ॥

,, सं-पूर्ण ते समज वास्तव दक्षिणाशा ॥
पाप्यांस दंड धरितो करितो वि-नाशा ॥
देहीं जया मिरवते घन-कांति भारी ॥
हा[5] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ २०६ ॥

,, आ-धार हाच सजणे बहु जीवनाचा ॥
रक्षी दयेंकरुनि मान [6]ऋषी-जनाचा ॥

---

१ स्वर्गाचें राज्य. २ इंद्र. ह्या श्लोकांत "बहु-लोचन" ह्या विशेषणानें इंद्र हजार डोळ्यांचा आहे, तेव्हां तो कुरूप असल्यामुळें वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ३ पूर्व व दक्षिण ह्या दिशांचे स्वामी अनुक्रमें इंद्र व यम हे आहेत; व ह्या दोन दिशांच्या मधील जी आग्नेयी दिशा तिचा स्वामी अग्नि आहे, म्हणून व विदर्भराजसभेंतहि तो इंद्र व यम ह्यांच्यामध्यें बसला होता; म्हणून त्यास "मध्यस्थ रूप धारेतो" इत्यादि म्हटलें आहे. ४ अग्नि. ह्या श्लोकांत आरंभींच अग्नीच्या तापाची असह्यता सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ५ यम. ह्या श्लोकांत "घन-कांति" ह्या शब्दानीं यम काळा आहे, असें सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ६ पूर्वी एकदा वरुणानें यज्ञ केला, तेव्हां त्याला ऋत्विज् पाहिजे होते. म्हणून वरुणाचा मुलगा बंदी त्यानें वादांत कहोड वगैरे ऋषींचा पराजय करून त्यांस समुद्रांत बुडविलें. आणि अशा रीतीनें आपले बापास ऋत्विज् पाहिजे होते ते दिले. पुढें यज्ञ संपल्यावर वरुणानें त्यांचा मोठा आदरसत्कार करून त्यांस परत पाठविलें; अशी कथा आहे. (भारत, वन प०, अ० १३२) तिला अनुलक्षून हें लिहिलें असावें.

दुर्निवार--निवारण करण्यास अशक्य.
दुर्हृद--दुष्ट, वाईट अंतःकरणाचा.
दुर्वह--धारण करण्यास अशक्य.
दुलडी--गळ्यांतील दागिना.
दुष्कर--करावयास कठीण.
दुहणें--दूध काढणें.
दुहिता--१ कन्या. २ सून.
दून--दुःखित, तप्त.
दूरशी--रजस्वला.
देवगर्भ--देवतुल्य.
देवतटिनी--भागीरथी.
देवदत्त--अर्जुनाच्या शंखाचें नांव.
देवधाडी--अकस्मात् आलेलें महत् संकट.
देवनळ--बोरू.
देवर--दीर.
देवराज-- इंद्र.
देवर्षि--नारद.
देवलसी--देवळांत राहणारा, साधु.
देवव्रत--भीष्म.
देवाद्य--महादेव.
देवांगना--देवांच्या स्त्रिया.
देवापगा--गंगा, भागीरथी.
देवी--१ देवांगना. २ राजाची पत्नी, राणी.
देवेंद्र--इंद्र.
देशधडी--देशपार.
देशिक--गुरु.
देसवटा--स्थान, प्रदेश.
देहाभिमान--देहच मी अशी बुद्धि.
देहांतर--अन्य देह.
देहुडी--चौकी.
देव्हारें--देवालय.
दैन्यवाणा--बापुडा.
दैवहत } --दुर्दैवी, करंटा.
दैवहतक }
द्युति--कांति.
द्युमणि--सूर्य.
द्रविण--पैसा.
द्रुति--सुवास, सुगंध.
द्रौणी( द्रोणपुत्र )--अश्वत्थामा.
द्वंद्वयुद्ध--कुस्ती.
द्वंद्वें--सुखदुःखादि युग्में.
द्वारावती--द्वारका.
द्विज--१ दंत. २ ब्राह्मण. ३ पक्षी.
द्विजाति--ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे.
द्विजराज--चंद्र.
द्विप--गज, हत्ती.
द्वैत--भेदबुद्धि.
द्वैपायन--व्यास.

### - ध.

धडकुडें(डी)--१ कठोर, मर्मभेदक. २ एकदम.
धगडील--जवळ.
धणी--लाभ, तृप्ति, वैपुल्य.
धत्तूर--धोतरा.
धन--द्रव्य.
धनद--कुबेर.
धनंजय--१ अर्जुन. २ अग्नि.
धन्व--धनुष्य.
धन्वी--धनुष्य धारण करणारा.
धमनी--१ फुंकणी. २ शिर.
धर--पर्वत.
धरमधका--कार्य न होतां व्यर्थ जे श्रम पडतात ते.
धर्म--यमधर्म.
धर्षण--दांडगेपणा.
धरणी } --पृथ्वी.
धरा }
धराधीश--राजा.
धरारमण--पृथ्वीपति, राजा.
धव--नवरा.
धवल--शुभ्र, पांढरें.
धवलारें--घरें.
धवळणें--शुभ्र करणें.
धाटी--रीत, प्रकार.
धाता--ब्रह्मदेव.
धात्री--१ पृथ्वी. २ दायी.
धाम--१ घर. २ तेज.
धाय--१ तृप्त होय. २ रडण्याची आरोळी.
धाया--लहान.

धारें—१ कमी. २ धुराडें.
धाले—तृप्त झाले.
धावणें—पाठलाग करणारे लोक.
धावण्या—रक्षणासाठीं.
धिंसा / धिवसा }—उत्कंठा, धैर्य, हव्यास.
धी—बुद्धि.
धुर—अग्रभाग.
धूर्जटि—महादेव.
धृति—धैर्य.
धोपणें—तहानेनें किंवा आशेनें गळा सुकणें.
धौम्य—पांडवांचा उपाध्याय.

## न.

नई—नदी.
नक्र—सुसर.
नग—१ पर्वत. २ भूषण. ३ वृक्ष.
न घटे—न घडे.
न घावे—न पावे.
नटले—सिद्ध झाले.
नति—नमस्कार.
नंदन—मुलगा.
नंदिनी—कन्या, मुलगी.
नभ—आकाश.
नभोवाणी—आकाशवाणी.
न मनी—न मानी.
नय—न्याय.
नर—१ मनुष्य. २ अर्जुन. ३ एक अति प्राचीन ऋषि.
नरसिंह / नरेंद्र }—राजा.
नर्तक—नाचणारा.
नलद—वाळा.
नव—नऊ.
नव / नवा }—१ नवीन. २ तरणा.
न वचे—न जाई.
नवनीत—लोणी.
नवाई—गोडी, कौतुक.
नवाजणें—वर्णणें.
नवाळी—कौतुक, गोडी.
नवोढा—नववधू, नवरी.
न सूये—न ओढवे, पुढें न सरे.
नहुष—ययातिराजाचा पिता.
नाक—स्वर्ग.
नाकर्षि—देवऋषि.
नाकेश—इंद्र.
नाग—हत्ती.
नागवण—हानि.
नागवणें—मुकणें.
नाटकशाला—कलावंतीण.
नाट्य—नृत्य.
नातरी—किंवा, अथवा.
नातळणें—न स्पर्शणें.
नातुडणें—न प्राप्त होणें.
नाथिला—१ व्यापला. २ खोटा, जो नाहीं तो
नानादर्शनें—षड्दर्शनें.
नाराच—बाण.
नावेक—अंमळ, क्षणभर.
न हूत—न बोलावलेला.
नाहो—नवरा, पति.
नाळ—नळी.
निकट—जवळ.
निकर—१ समुदाय. २ कहर.
निकषनिसाण / निकषपाषाण }—कसोटीचा दगड.
निकाश—सदृश.
निकें—खरें.
निखंदणें—धिःकारणें, धिसपिटाविणें.
निगदणें—बोलणें.
निगम—वेद.
निगुती—निश्चयें.
निग्रह—१ निश्चय. २ अटकाव.
निजपद—आत्मपद.
निजबोध—आत्मज्ञान.
निटिल—कपाळ.
निटिलदेश—कपाळभाग.
निडळीं—कपाळीं.
निदर्शी—दृष्टांत.
नितंबिनी—स्त्री.

निदाघ—उष्णता.
निदान—१ कारण. २ शेवट.
निदिध्यास—अखंड ध्यान.
निदेला—निद्रित.
निधडा—धैर्याचा.
निधडें—अभेद्य.
निधन—मरण.
निधान—ठेव, निक्षेप.
निधि—ठेवा.
निधोट—१ परिपूर्ण. २ एकरूप. ३ धीट.
निनद—शब्द, नाद.
निपट—केवळ.
निबलोण—दृष्ट काढण्याथें साधन.
निमग्न—बुडालेला, गढलेला, तत्पर.
निमाला—संपला.
निम्नगा—नदी
नियती—दैव.
निरखणें—पाहणें.
निरंजन—१ निष्कलंक, निरुपाधिक. २ परमेश्वर.
निरपत्रप—निर्लज्ज.
निरय—नरक.
निरवणें—स्वाधीन करणें.
निरसतां—नष्ट होतां.
निरक्षर—अक्षरशून्य, मूर्ख.
निरुतें—स्पष्ट.
निरुपचार—उपचारहीन.
निरें—शुद्ध, निखालस.
निरोध—अटकाव.
निरोपणें—सांगणें.
निर्जर—देव.
निर्दळणें—नाश करणें.
निर्धारी—निश्चयें, खचीत.
निर्धत—निःशेष.
निर्भर्त्सना—धिक्कार, निंदा.
निर्भर—पूर्ण.
निर्वाण—अंत, समाप्ति.
निर्वाणीं—संकटसमयीं.
निलय—घर, स्थान.
निवटणें—१ प्रवीण होणें. २ टाकणें, नाश करणें.
निवाड—निर्णय, निकाल.
निवाडा—न्याय.
निवास—स्थान.
निवृत्ति—मुक्ति.
निशाणी घाव घालणें—जिंकणें.
निशीथ—मध्यरात्र.
निःशेष—निखालस, निःसंशय.
निष्क—पदक, अलंकार.
निष्कल—एकरूप.
निष्टंकें—निश्चयें.
निस्त्रप—निर्लज्ज.
निस्पृह—निरिच्छ.
निःस्व—निर्धन.
निःसाराया—दूर कराया.
नीर—पाणी.
नीरज—कमल.
नीलग्रीव—महादेव.
नुगवे—न कळे.
नुत / नूत—स्तुत, वाखाणलेला.
नुमजे—न समजे.
नुमसे—१ न विसंबे. २ न सांगे.
नुरे—न उरे.
नुसधी—नुस्ती, केवळ.
नृपासन—राजाची गादी.
नेघे—न घेई.
नेटका—मनोहर.
नेणता—अजाण, लहान.
नेणीव—अज्ञान.
नेदितां—न देतां.
नैषध—नळ राजा.
नोलांडवे—न उल्लंघवे.
नोहावी—न व्हावी.
न्यसीत—ठेवीत.

## प.

पंकेरुह—कमळ.
पंक्ति—१ ओळ. २ दहा.
पंक्तिकंधर ( दशकंधर )—रावण.
पंक्तिफट—दहा फणांचा.

पंगु—पांगळा.
पघळणें—पसरणें.
पंचम—सप्तस्वरांपैकीं एक स्वर.
पंचवदन—शिव.
पंचानन—सिंह.
पंचाक्षरी—मांत्रिक.
पंचू—१ पक्षी. २ चुवा, पकडदार.
पंजर—पिंजरा.
पट—वस्त्र.
पटु—१ हुशार. २ निरोगी.
पडसाद—प्रतिध्वनि.
पडिभरू—सांगाती, सोबती.
पढियें—आवडे.
पण्यांगना—गणिका, वेश्या.
पतग—पक्षी.
पतंग—१ सूर्य. २ पक्षी. ३ एक प्रकारच्या रंगाचें लाकूड.
पतन—१ शाप. २ पातित्य, नीचत्व.
पति—१ धनी. २ नवरा.
पतित—पापी.
पत्ररथ—पक्षी.
पथ—वाट.
पद—स्थान.
पथ्य—हितकारक.
पदातीत—जागेवरून दूर केलेला, काढलेला.
पद्म—कमळ.
पद्मभवांड—ब्रह्मांड.
पद्मयोनि—ब्रह्मदेव.
पद्मराग—एक प्रकारचें माणिक.
पद्मा—लक्ष्मी.
पद्मासन—१ ब्रह्मदेव. २ योगशास्त्रांत एक प्रकारचें आसन आहे.
पद्मिनी—कमलिनी.
पद्य—छंदोबद्ध कविता.
पद्यावें—रचावें.
पनस—फणस.
पय—१ दूध. २ उदक.
पयोधर—१ स्तन. २ मेघ.
पयोधि—समुद्र.

पर—१ शत्रु. २ दुसरा. ३ उत्तम. ४ परंतु.
परती—पलीकडे.
परत्र—परलोक. परलोकीं.
परम—अत्यंत. फार.
परमेष्ठी—ब्रह्मदेव.
परदार—परस्त्री.
परवंटा—कंबरेभोंवतीं गुंडाळण्याचा पदर.
परस्व—परधन.
पराग—१ महापराध. २ पुष्पांतील रज.
पराया—१ परका. २ शत्रु.
परिकर—१ कमरपट्टा. २ प्रयत्न. ३ समूह.
परिखा—खंदक.
परिजन—सेवक.
परिग्रह—१ घेणें, ग्रहण. २ संग्रह.
परिचर्या—सेवा.
परिणमलें—परिणाम पावलें.
परिधान—वस्त्र.
परिमल—सुगंध.
परिरंभ—आलिंगन.
परिवर—प्रकार.
परिवार—बरोबर असणारीं माणसें.
परिवेष, परिधी—खळें.
परी—प्रकार.
परेश—भगवान.
परेसी—वाणिविशेषास. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाणी आहेत.
परोक्ष—दृष्टीच्या मागें.
परौतें—दूर, वेगळें, पलीकडे.
पर्णणें—वरणें, विवाह करणें.
पर्याय उत्तर—भलतें उत्तर.
पर्यंक—पलंग.
पऱ्हा—पलीकडे.
पल—मांस.
पलाल—पाचोळा, कोंडा.
पलाश—राक्षस.
पल्ली—गांव.
पवन—वायु.

पवनज }
पवनतनय } –मारुती.
पवनारि –सर्प.
पवमान–वायु.
पवाड–स्तव, स्तुतिपर कविता.
पवि–वज्र.
पवे–पावे.
पशुप–१ गुराखी. २ शंकर.
पशुपति–सांब.
पश्यतोहर–पहात असतां नेणारा, उचल्या, भामट्या.
पहुडणें–१ निजणें. २ पावणें.
पक्ष–१ पंधरवडा. २ बाजू, तरफ.
पक्षती–पक्षमूळ.
पक्षिगमन–गरुडवाहन. ‘खगगमन’ पाहा.
पक्षिपति–गरुड.
पाइकी–सेवा.
पाखर–आश्रा, रक्षण.
पाखाळा–स्वच्छपणा.
पांग–अडचण, संकट.
पाचारणें–बोलावणें.
पांचाळ–एक देश, लाहोर.
पाटव–चातुर्य.
पाटस्थळ–पाटाच्या पाण्यानें होणारें शेत वगैरे.
पाटाव–रेशमी वस्त्र.
पाटीर–चंदनवृक्ष.
पांटोरी–पांट्या.
पाटोळा–पितांबर.
पाटारीं–पृष्ठभागीं.
पाड–१ मान, लेखा. २ सादृश्य.
पाडें–प्रमाणें.
पाणी–हात.
पातला–आला, पावला.
पाता–पालनकर्ता.
पाती–पंक्ति.
पात्री–भांडें.
पातेजूं–विश्वासूं.
पादप–वृक्ष.
पाप्में–पातकें.
पामर–हलकट, यःकश्चित.
पायकी–चाकरी.
पायवणी–पादोदक.
पायस–खीर.
पायु–गुदस्थान.
पारद–पारा.
पारिजात–कल्पवृक्ष.
पारिबर्ह–लवाजमा.
पारु–अंत.
पारुखे–१ उरो. २ दुखावे.
पार्श्व–बाजू.
पालऊ–पालव, पदर.
पालखीं–पाळण्यांत.
पालाणणें–१ झांकणें. २ खोगीर घालणें.
पाव–पाय.
पावक–अग्नि.
पावन–१ पवित्र. २ पवित्र करणारा.
पाशी–वरुण
पांसु–धूळ, रज.
पाहुणेरु–पाहुणचार.
पाळा–वेढा.
पाक्षिक–१ संशयाचा. २ एकपक्षी.
पिक–कोकिल.
पिटणें–ताडणें.
पिंड–देह.
पिता–बाप.
पितामह–१ आजा. २ भीष्म.
पितृप–यम.
पिनाक–सांबाचें धनुष्य.
पिनाकी–शंकर.
पिपीलिका–मुंगी.
पिशित–मांस.
पिशुन–दुष्ट, चहाड.
पिष्ट–पीठ.
पिसाट–भूत, पिशाच.
पिसूण–दुष्ट, चहाड. ‘पिशुन’ पाहा.
पिसें–वेड.
पीठ–स्थान, आसन.
पुंख–पिसारा.

पुंगव-श्रेष्ठ.
पुच्छ-शेपूट.
पुंज-रास.
पुटामाजी-अग्निपुटांत.
पुंड-दंगेखोर, अधम.
पुढतांपुढतां-वारंवार, पुन्हापुन्हा.
पुढती-पुनरपि.
पुढां-पुढें.
पुढिल-अन्य, दुसरा, परकी.
पुंभूषण-पुरुषवेष.
पुरिजेना-पुरेना.
पुरुषव्याघ्र-पुरुषश्रेष्ठ.
पुरुषार्थ-धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्यां पैकीं प्रत्येक.
पुरुहूत-इंद्र.
पुरोधा-उपाध्याय.
पुरोहित-उपाध्याय.
पुलिन-वाळवंट ( नदीचें ).
पुष्कर-१ कमळ. २ शुंडाग्र.
पुजी-१ शोभवी. ५ पूजा करी.
पूर्ती-समाप्ति, परिपूर्णता.
पूर्वरेखा-पूर्वीचें कपाळीं लिहिलेलें.
पृतना-सेना.
पृथा-कुंती.
पृथुक-पोहे.
पे-पाशीं, कडे.
पेंचपाड-पेंचपाच.
पेटे-ओझीं.
पैं-१ निश्चयें, खचीत. २ वाक्यपूरक अव्यय.
पैजार-खेटर, जोडा.
पैशुन्यवादी-उणें पाहणारा.
पोटपोशा-पोटबाब, पुत्रानंद.
पोटळणें-पोटाशीं धरणें.
पोत-१ बालक. २ दिवटी. ३ नांव.
पोरवडा-१ मुलांचा समुदाय. २ पोरकट-पणा.
पोसणें-पोसायास घेतलेलें ( लेंकरूं ).
पोहणी-पोहावयाजोगें पाणी.
पोहे / पोही } -पाणपोई.
पौत्र-नातू.
पौळी-१ पोंवळीं. २ चौदिवाली.
प्रकर-समुदाय.
प्रकाम-अत्यंत, फार.
प्रकृति-१ माया. २ प्रजा.
प्रकृतिपुरुष-माया आणि ईश्वर.
प्रचुर-पुष्कळ.
प्रजा-१ संतति. २ लोक.
प्रणत-नम्र, शरण.
प्रणति-नमस्कार.
प्रताप-१ सामर्थ्य. २ उष्ण.
प्रतिभा-१ स्फूर्ति, स्मृति, आठवण. २ बुद्धि.
प्रतिम-सारखा.
प्रतीची-पश्चिम दिशा.
प्रतोद-चाबूक.
प्रत्यगात्मा-कूटस्थ, जीवाचें लक्ष्य स्वरूप.
प्रत्यय-अनुभव.
प्रधानज-प्रकृतिजन्य.
प्रपंचीक-संसारसंबंधी.
प्रपदें-पायांचीं अग्रें.
प्रबंध-रचना.
प्रभंजन-वावटळ.
प्रभु-१ समर्थ. २ ईश्वर.
प्रभूत-पुष्कळ.
प्रमदा-तरुण स्त्री.
प्रमाद-दुर्लक्ष्यामुळें झालेला दोष, बेसावधपणा.
प्रयाणीं-जातेवेळीं.
प्रवया-वृद्ध.
प्रवाल-१ पल्लव. २ पोंवळें.
प्रवृत्ति-वार्ता, बातमी.
प्रश्रय-लीनता.
प्रक्षालन-धुणें.
प्रज्ञा-बुद्धि.
प्रज्ञाचक्षु-१ आंधळा. २ धृतराष्ट्र.
प्रज्ञांधक-आंधळा.
प्राकृत-१ साधारण. २ नीच.
प्राची-पूर्वदिशा.

प्राज्य–पुष्कळ, विपुल.
प्रांजळ–उघड, मोकळा.
प्राण–वायु.
प्राणवृत्ति–१ जीवन, निर्वाह. २ वायुसदृश.
प्रातर्विधि–शौचस्नानादि क्रिया.
प्रांत–कडा, शेवट.
प्रायः–बहुधा.
प्रायश्चित्त–प्रायः ( पाप ) चित्त ( शोधन ), पापदूरीकरण.
प्राज्ञ–चतुर, शहाणा.
प्रेतगतिंगत–मेलेला, प्रेताच्या स्थितीला गेलेला.
प्रेषणें–पाठविणें.
प्रेक्षक–पाहणारा.
प्रोत्तुंग–उंच, दीर्घ.
प्लवंग–वानर.

## फ.

फटकाळ–दुष्ट.
फडकणें–उडून जाणें.
फणी–सर्प.
फरा–१ पिंपळवर्ण. २ रांग, समूह.
फाणस–कंदील.
फाल्गुन–अर्जुन.
फिटणें–शुक्त होणें, सुटणें.
फिरंगणी–फिरंगी लोकांसंबधीं.
फ़िराद–फिर्याद.
फुटाचें–हिरव्या आंब्याचें.
फुंफाट–फो! फो!
फुलारा–गुंफलेलीं फुलें.
फेंडिशी–घालविशी.
फोल–व्यर्थ, फुकट, वांयां.

## ब.

बक–बगळा.
बंक / बंका –१ चौकी, पहारा. २ पहारेकरी.
बजागी–भांडखोर, मिसखोर.
बडिवार–थोरवी.
बडिश–मासे धरण्याचा गळ.
बंदी–स्तुतिपाठक, भाट.
बंधकी–दासी.
बंभर–भ्रमर.
बभ्रा–१ उपहास. २ बोभाटा.
बरवंटा–सुंदर.
बराडी–भिकारी, खा खा सुटलेला.
बर्ह–पंख, पक्ष.
बर्ही–१ मोर. २ पक्षी.
बलहा–बलनामक दैत्याला मारणारा–इंद्र.
बलभद्र–बळराम.
बल्लव–१ गौळी. २ आचारी, स्वयंपाकी.
बसणें–मूळ, बीज.
बहुवस–पुष्कळ.
बहुवसाळ–पुष्कळ.
बळ–१ बळराम. २ शक्ति.
बळवंड–दांडगा.
बळसत्राणें–मोठ्या बळानें.
बळी–१ बळकट. २ एक राजा–प्रल्हादाचा नातू.
बागूल–बाऊ, भयंकर पदार्थ.
बाजी–१ डाव. २ संकट.
बाड–कनाथ, पडदा.
बाढ–दृढ.
बाणणें–ठसणें.
बाद–काढून टाकलेला.
बाधा–इजा, त्रास, दुःख.
बाधारी–१ डोंगरावरचा प्रदेश. २ बंधन.
बाप–१ वाप हो. २ मोठा.
बापुडे–अज्ञ जन.
बापोषाख–उत्तम वेष.
बारबार–वारंवार.
बालक–मूल.
बालिश–मूर्ख, पोरकट.
बाष्प–१ आसवें, अश्रु. २ बाफ.
बाहणें–बोलावणें.
बाहे–बाहु.
बाह्य–१ बाहु. २ बाहेरचें.
बाह्यवटें–बाहुभूषणें.
बिंब / बिंबफळ / बिंबीफळ –पिकलेलें तोंडलें.

बिडाल } —मांजर.
बिडालक }
बिनी—१ अघाडी. २ पागोट्याचे केळें.
बिरडें—बंधन.
बिरुदाइत—बाणा बाळगणारा.
बिलोरी—कांचेचें.
बिस—कमळाचा देंठ.
बिसिनी—कमलिनी.
बीज—१ द्वितीया तिथी. २ कारण. ३ बी.
बीबूडी—बीमोड.
बीभत्सु—अर्जुन.
बुका—सुवासिक चूर्ण.
बुडतया—बुडणाऱ्यास.
बुडीं—१ शेवटीं, परिणामीं. २ तळीं.
बुझणें—समजणें.
बुझावणें—समजावणें.
बुध—१ पंडित, शहाणा. २ एक ग्रह—चंद्राचा मुलगा.
बुभुक्षु—भुकेलेला.
बेसक—स्थान.
बोभात—हाक मारीत.
बोभाय—हाक मारी, बोलावी.
बोल—शब्द.
बोळवणें—पोचवणें, रवानगी करणें.
ब्रह्मघ्न—ब्राह्मणास मारणारा.
ब्रह्मण्य—ब्राह्मणाविषयीं दयाळु.
ब्रह्मनंदन ( ब्रह्मपुत्र )—नारद.
ब्रह्मांड—सर्व जग.
ब्रह्मांडावली—ब्रह्मांडांची पंक्ति.
ब्रह्ममुहूर्त—पहांटेच्या चार घटका रात्रीचा समय.
ब्राह्मण्य—१ ब्राह्मणांचा समुदाय. २ ब्राह्मणपणा.
ब्रीद—बाणा.

भ.

भ—नक्षत्र.
भंग—१ तरंग, लाट. २ नाश.
भगवान—षड्गुणैश्वर्यसंपन्न देव.
भगण—नक्षत्रसमूह.
भगळा—भेगा, चिरा.
भजक—सेवक.
भट—योद्धा.
भंड—१ फजिती. २ भाडखोर.
भणग—भिकारी.
भद्र—१ कल्याण. २ सिंहासन.
भद्रजाती—१ भीम. २ गज. ३ अश्व.
भर—अतिशय.
भरण—पोषण.
भरावरी—वरचेवर, लवकर.
भर्ग—महादेव.
भर्जित—भाजलेलें.
भर्म—सुवर्ण.
भव—१ संसार. २ महादेव. ३ उत्पत्ति.
भवंडा—गरका.
भवन—घर.
भवाब्धि—संसारसमुद्र.
भवार्कातपत्र—भवतापनाशक, संसाररूपी सूर्याला छत्राप्रमाणें असणारा.
भव्य—कल्याण.
भसित—भस्म.
भा—शोभा, कांति, तेज.
भाऊ—भातृ, मानू.
भाक—भाषण, वचन.
भागवत—भगवद्भक्त.
भाग्य—ऐश्वर्य, दैव.
भाज } —भार्या, बायको.
भाजा }
भाजन—पात्र, भांडें.
भाट—स्तुतिपाठक.
भांडार—द्रव्याची कोठी, खजिना.
भाता—बाणांची पिशवी.
भातुकें—खाऊ.
भांड—वाचाळ.
भान—चैतन्य, शुद्धि.
भानुनंदन—सूर्याचा मुलगा, कर्ण.
भानें—शेपात्र.
भांबरभुतें—वेडे.
भार—समूह.

भारती–वाणी, वाग्देवता.
भारद्वाज–कुक्कुडकुंभा.
भारी–पुष्कळ मोलाचा.
भाव–१ निष्ठा. २ अभिप्राय.
भावोन } –मानून.
भावोनी }
भाळ–१ मस्तक. २ कपाळ.
भाळणें–भुलणें.
भिडणें–झगडणें.
भिदुर–वज्र.
भिझावितां–भिजवितां.
भिक्षु–ब्रह्मचारी.
भिक्षुकी–याचकी.
भीमकी–१ रुक्मिणी. २ दमयंती.
भीतरां–आंत.
भीरु–भितरा.
भुजंग–सर्प.
भुज ( जा )–बाहु, हात.
भुजंग } –सर्प.
भुजंगम }
भुजंगमारी–सापांचा वैरी, गरुड.
भुंजे–भोगी.
भुवन–१ गृह. २ जग.
भूतात्मा–प्राणिमात्राचा आत्मा.
भूदेव } –पृथ्वीवरील देव, ब्राह्मण.
भूनिर्जर }
भूप–राजा.
भूभुजेंद्र–राजाधिराज.
भूभृत्–१ पर्वत. २ राजा.
भूभृदरि–१(भू+भृत्+अरि)पर्वतांचा शत्रु, इंद्र.
भूमिधर–पर्वत.
भूषण–१ मोठेपण, थोरपण. २ दागिना.
भृंग–भ्रमर.
भें–भय.
भेक–बेडूक.
भेंडा–मातीचा गोळा.
भेणें–भयानें.
भेरी–नौबत.
भेषज–औषध.
भोग–विषय.
भोगी–सर्प, नाग.
भोजें–खाणों पिणों.
भोवणें–फिरणें, ग्रासणें.
भ्याड–भितरा.
भ्रमणें–भांबावणें.
भ्राता–भाऊ.
भ्रू–भोंवई.

म.

मकरंद–पुष्परस.
मकरालय–समुद्र.
मंचक–पलंग.
मंजु–कोमळ ( शब्दांमीं ).
मंडण–भूषण.
मंडल–चक्राकार प्रदेश.
मंडूक–बेडूक.
मणिक–मडकें, डेरा.
मणिबंध–मणगट.
मतंगज–हत्ती.
मतिप्रकाश–बुद्धिस्फूर्ति.
मथन–१ नाश. २ घुसळणें.
मदगज–माजलेला हत्ती.
मदनशत्रु–महादेव.
मंदाकिनी–भागीरथी.
मंदार–कल्पवृक्ष.
मदीय–माझा.
मधु–१ वसंत. २ मध. ३ मद्य.
मधुकरी–भ्रमरी.
मधुप–१ भ्रमर. २ मद्यपी.
मधुसुकाळी–मधुधारा.
मध्य–कटी, कमर.
मना–मानी.
मनु–१ मंत्र. २ चौदा ( मनु ).
मनसूर–राजपत्र, सनद, दस्तक.
मनुष्यदेव–राजा.
मनोज }
मनोभव } –मदन.
मन्मथ }
मरंद–पुष्परस.

मराळ ( ल )–हंसपक्षी.
मरु–मारवाड देश.
मरुत–वायु.
मल्ल–पहिलवान.
मवाळ–मेरु.
मशक } –धुंगुरडें.
मशक }
मषीपत्र–लिखितपत्र.
मस्त–१ पुष्कळ. २ मस्तक. ३ कैफ चढलेला.
मह–१ आनंद, उत्साह. २ तेज.
महापगा–महानदी.
महारथी–मोठा योद्धा.
महित–पूजित, सन्मानित.
महिमा–महत्त्व.
महिला–१ पृथ्वी. २ स्त्री.
महिश्वर–पृथ्वीपति, राजा.
मही–पृथ्वी.
महीध्र–पर्वत.
महेंद्र–इंद्र.
महेला–जाया, स्त्री.
मा–१ लक्ष्मी. २ निश्चयें. ३ मग.(?) ४ नको.
माकंद–आंब्याचें झाड.
माखणें–भरणें.
मागध–जरासंध.
मागुती–पुन्हा.
माघां } –मार्गे.
माघुता }
माजिवटा–उन्माद.
माजी } –आंत, मध्यें.
माझारीं }
मात–गोष्ट, बातमी.
मातलि–इंद्राचा सारथी.
मात्रा–औषध.
मात्सर्य–द्वेष, हेवा.
माथा–मस्तक, वरचा भाग.
मांदी–१ मेळा. २ पेटी.
माधव–कृष्ण.
माधुरी–गोडी. [ २ हर्ष पावणें.
मानवणें–१ मान डोलावणें, मान्य होणें.
मानस–१ अंतःकरण. २ मानससरोवर.
मानिनी–मानवती स्त्री.
माप–१ लक्ष्मीपति–कृष्ण. २ प्रमाण.
माय–माता.
मायराणी–पिशाची.
माया–माबयास.
माया–१ अविद्या, अज्ञान. २ ममता, प्रीति.
मायापडळ–मायेचें आवरण.
मायाशबल–मायोपाधिक, मायेच्या स्वाधीन.
मार–मदन.
मारुत–वायु.
मार्गण–बाण.
मार्तंड–सूर्य.
मालपुवा–एक पक्वान्न.
मालवणें–नाहींसा करणें.
मालिन्य–मळीणपणा.
मिणधा–( मिंधा )–ओशाळलेला.
मित–थोडें, परिमित, मोजकें.
मिति–परिमाण.
मिथिला–जनकराजाची नगरी.
मिनला–मिळाला, मिसळला, जमला.
मिनेगारी–मिन्याच्या रंगाचें.
मिलिंद–भ्रमर.
मीन–मत्स्य. [ आहे, मदन.
मीनकेतन–ज्याच्या ध्वजावर माशाचें चिन्ह
मुकुर–आरसा, दर्पण.
मुक्त–सुटलेला.
मुक्तलग–मोत्यें लावलेला.
मुक्ता–मोतीं.
मुक्तार्पित–मोत्यांची.
मुक्तें–मोत्यें. [ (स्त्री).
मुग्धा–सुंदर व नुकतीच तारुण्यांत आलेली
मुजुम–मुलखाची सर्व जमाबंदी करण्याचा व सर्व खर्चाचा बंदोबस्त राखण्याचा अधिकार.
मुद्रा–१ बंधन. २ चिन्ह. ३ बंद पडणें.
मुद्धारा–प्रीतिरसाची धारा.
मुधा–१ खोटें. २ व्यर्थ.
मुंड–१ नीच. २ डोकें.

मुनिवर–नारद.
मुमुक्षु–मुक्त होण्यास इच्छिणारा.
मुरारी–श्रीकृष्ण.
मूर्त–मूर्तिमंत, देहधारी.
मुलाअमतीचा–मिजाजी.
मुलायम–१ चांगलें, सुंदर. २ नरम.
मूषक–उंदीर.
मूस–साचा.
मूळ–बोलावणें.
मृगडोळस–हरिणाच्या डोळ्यांप्रमाणें डोळे जिचे, मृगनयना.
मृगपति } –पशूंचा राजा सिंह.
मृगराज }
मृगया–पारध.
मृगांक–चंद्र.
मृड–शंकर.
मृतक–मढें, प्रेत.
मृति–मरण.
मृत्युंजय–महादेव.
मषा–खोटें.
मेखला–कमरपट्टा.
मेघश्याम–मेघाप्रमाणें काळा.
मेदिनी–पृथ्वी.
मेसाई–कोणी क्षुद्र देवता.
मेळ–मेळवण, मिश्रण, आंबवण.
मेळावे–समुदाय.
मैंद–फांसेगार, ठक.
मोकलणें–सोडणें, उपेक्षणें.
मोतीलग–मोत्यें लावलेला, 'मुक्तलग' पहा.
मोदेना–हर्षेना, आनंद वाटेना.
मोवणां–मननांत.
मोह–ममता.
मोहरा–एक रत्न.
मोहरी–मोहित करी.
मोहिनीरूप–विष्णूनें सुंदर स्त्रीचें घेतलेलें रूप.
मोहिरे–मोहरा, अग्रभाग.
मौळ } –मस्तक.
मौळ }
मौल्य–मोल, किंमत.
म्हणियारा–अंकित, ताबेदार.
म्हून } –म्हणून.
म्हूण }

## य.

यथासांग–संपूर्ण, अंगांनीं युक्त.
यदुभूषण–कृष्ण.
यमनंदन–धर्मराज.
यमु–यमस्वरूपी.
यया–ज्यास.
यवस–तृण, गवत.
यज्ञसूकर–वराहावतार.
यशाचळ–यशोरूप पर्वत.
यष्टि–काठी.
याग–१ यज्ञ. २ पूजा.
याच–माग, याचना कर.
याजी–यज्ञकर्ता.
यातायात–जन्ममरणपरिश्रम.
यातिवैराकार–जातिवैर.
यातु } –राक्षस.
यातुधान }
यातुप–राक्षसेंद्र, रावण.
याद–जलचर.
यान–१ पालखी. २ वाहन. ३ स्वारी.
याम–प्रहर.
यामिनी–रात्र.
यावा–येणें, आगमन.
याज्ञसेनी–द्रौपदी.
युग–जोडी, द्वय.
युवराज–राजाच्या आज्ञेनें राज्यकारभार पाहणारा त्याचा मुलगा.
युवा–तरुण.
यूथ–समुदाय, कळप.
यूप–यज्ञस्तंभ.
येर–अन्य.
येसपार–ठावठिकाण, पत्ता.
योगक्षेम–चरितार्थ.
योत–ग्रेवोत
योध–योद्धा.
योषा–स्त्री.
यौवन–तारुण्य.

यौवराज्ज—युवराजपण.

## र.

रंक—भिकारी.
रंकु—हरिण.
रक्तप—रक्त पिणारा, राक्षस.
रंग—१ सभा. २ रंगमहाल.
रज—१ कण. २ रजोगुण.
रंजणें—१ अनुरक्त होणें. २ रंजविणें.
रंजयंती—रमविणारी.
रजस्वला—विटाळशी.
रणचत्वर—रणांगण, युद्धाची जागा.
रतिकांत } — मदन.
रतिपति }
रणझेंडा—युद्धांतील निशाण.
रणशौंड—युद्धनिपुण.
रत्नाकर—समुद्र.
रथचरण—रथचक्र.
रंभा—१ केळ. २ एक अप्सरा.
रमणी—सुंदर स्त्री.
रमा—लक्ष्मी.
रय—वेग.
रव—शब्द.
रवा—साखर.
रंवदळी—नाश, कत्तल.
रवि—सूर्य.
रशना—कमरपट्टा.
रश्मि—१ किरण. २ रथाच्या घोड्यांच्या दोऱ्या, अनीन.
रस—१ आवड, प्रीति. २ उदक. ३ अमृत. ४ आनंद.
रसद—१ मेघ. २ पैशाचा भरणा.
रसना—जीभ.
रसा—पृथ्वी.
रसानाथ—राजा.
रसाळ—१ गोड. २ स्निग्ध. ३ आंबा.
रसाळ—रसज्ञ.
रसिक—रसज्ञ.
रहंवर—मोठा रथ.
रहिवास—वस्ती.
राउळ—देऊळ.
राका—पूर्णिमा.
राग—१ प्रीति. २ रागीमा.
रागेजणें—रागावणें.
राजस—सुंदर.
राजीव—कमळ.
राडोळी—क्रीडा.
रांडोळी—कत्तल.
राणिवसा—अंतःपुर.
राणीव—राज्य.
रातला—रतला, रममाण झाला.
रात्रिंचर—राक्षस.
राधेय—कर्ण.
रावणि—रावणपुत्र, इंद्रजित्.
रामा—स्त्री.
रावो—राजा.
रासभ—गाढव.
राहटणें—वर्तणें.
राहटी—वर्तणूक.
रिगतां } —शिरतां.
रिघतां }
रिचविणें—ओतणें.
रितें—रिकामें.
रिंघ—प्रवेश.
रिंस—अस्वल.
रुका—पै.
रुक्म—सुवर्ण.
रुग्ण—रोगी.
रुचि—१ गोडी. २ कांति.
रुचिर—सुंदर.
रुंजणें—गुंजारव करणें; भोंवतें फिरणें.
रुजू—सुरू.
रुदित—रडणें.
रुधिर—रक्त.
रुळणें—लोंबणें.
रू—कापूस.
रूख—झाड.
रेखून—लिहून.
रेंच—१ रंग. २ खय, खोड.
रेवतीरमण—रेवतीचा नवरा, बळराम.

रोकडी—तात्कालिक, प्रत्यक्ष.
रोध—तीर, तट.
रोप—बाण.
रोम—केस.
रोहिणीवर } —चंद्र.
रोहिणीपति }
रौहिणीपुत्र—बळराम.
रौरव—एक नरक आहे. रुरु म्हणून एक किडा आहे, ते किडे त्यांत फार असतात.

ल.

लंकानाथ—रावण.
लकुच—फलविशेष (ओंठ).
लगदा—खोटें सोनें.
लघिमा—लघुत्व, हलकेपणा.
लडिवाळ—लाडकी.
लंड—ठक.
लत्ता—लाथ.
लंपट—आसक्त, नादावलेला.
ललना—सुंदर स्त्री.
ललाट—कपाळ.
ललाम—भूषण, अलंकार.
ललामायमान—भूषणीभूत.
लवण—१ नम्रता, लवणें. २ मीठ.
लवलाही } —त्वरेनें.
लवलाहे }
लसती—रूपवती.
लहरी—लाट.
लक्ष } —लक्ष्य.
लक्षा }
लाघव—चातुर्य, कौशल्य.
लाघवी—वश करणारी.
लाजा—लाह्या.
लाजाविरोन—लाजेनें विरघळून जाऊन.
लाधणें—पावणें.
लालन—लाड.
लावण्य—सौंदर्य.
लासी—मांजरी.
लास्य—नृत्य, नाचणें.
लाहणें—लाभणें, पावणें.
लाहो—१ श्रम. २ छंद, घोष.
लिंग—शिवलिंग.
लिगाड—लचांड.
लीन—गढलेला.
लुटे—लुटारू.
लुब्धक—लोभी, कृपण.
लुलाय—महिष, रेडा.
लूता—कोळी, कांतीण.
लेख—देव.
लेखर्षि—देवर्षि.
लेखा—पाड, गणना, हिशेब.
लेणीं } —अलंकार.
लेणें }
लोकबंधु—१ सूर्य. २ लोकहितकर्ता.
लोटे—हाले.
लोप—नाश.
लोल—१ लुब्ध. २ चंचल.
लोलुपता—लुब्धपणा.
लोला—छंद.
लोह—हेंकूळ.
लोह—लोखंड.
लोळ—१ कल्लोळ. २ लहरी, लाटा. ३ लोळणें.

व.

वक्त्र—तोंड.
वक्रदंत—शिशुपाळाचा भाऊ.
वंग—कथील.
वच—वाक्य.
वचणें—जाणें.
वंचिजे—१ ठकविजे. २ टाकिजे.
वंचाल—नाकारील.
वज्र—हिरा.
वडील—१ जुनाट. २ थोर.
वडीलपण—वृद्धत्व.
वण—घट्टा.
वणिक—वाणी.
वतंस—भूषण.
वत्स—१ बालक. २ वांसरूं.
वत्सर—वर्ष.

वत्सल-दयाळू.
वदान्य-दाता.
वंदारुता-स्तुति करण्याचें शील.
वधू-१ बायको. २ सून.
वन-१ उदक. २ अरण्य.
वनद-मेघ.
वनमाळी-कृष्ण.
वनाळी-वनपंक्ति.
वनिका-वन.
वनिता-स्त्री.
वपु-शरीर.
वमणें-टाकणें, ओकणें.
वर्णसंकर-जातींची मिसळ.
वर-१ श्रेष्ठ. २ पति. ३ अभीष्ट गोष्ट ( देवादिकांपासून मागितलेली ).
वरदानी-वर देणारा.
वरपंगें-वर वर करण्यानें.
वरपडी-झडप.
वरव-समृद्धि, बाहुल्य.
वरवर्णिनी-१ उत्तम स्त्री. २ हळद.
वराह-डुकर.
वरिचिल-वरची.
वरुणालय-समुद्र.
वर्ण-१ जात. २ रंग. ३ अक्षर.
वर्तिका } -दिव्याची वात.
वर्ती
वर्धिष्णु-वाढणारा.
वर्म-गुह्य.
वल्क } -झाडाची साल.
वल्कल
वल्गना-बडबड.
वल्गा-लगाम.
वल्मीक-वारुळ.
वल्लभ-प्रिय.
वश-स्वाधीन.
वंशी-मुरली. पांवा.
वंशोत्तंस-कुलभूषण.
वसुंधरा-पृथ्वी.
वश्य-सहाय.
वसन-वस्त्र.

वसुधा } -पृथ्वी.
वसुमती
वहिला } -सत्वर, तात्काळ.
वाहिलें
वळंघणें-चढणें.
वळसा-१ फेरा, घेरा, गोता. २ पुकारा.
वक्ष-ऊर.
वा-अथवा.
वागुरा-फांस.
वाग्वर्जी-प्रसिद्धीस.
वाग्विलास-वाक्चातुर्य.
वाङ्नियम-प्रतिज्ञावचन.
वाच्यत्व-निंदा.
वाज-बोभाट.
वाजट-वाचाळ.
वाजी-अश्व, घोडा.
वाटिका-बाग.
वाटुली-वाट, मार्ग.
वाड-मोठें, थोर.
वाडव } -वडवानल ह्या नांवाचा समुद्रांतील अग्नि.
वडवानल
वाडेंकोडें } -कौतुकानें, आवडीनें.
वाडेंपाडें
वाढ-पुष्कळ.
वाढप-वाढावयाचें अन्न.
वाणिज्य-व्यापार; देवघेव.
वाणी-१ वाचा. २ उणीव, वाण.
वाणें-वर्णन करणें.
वात्सल्य-दया.
वाथयाथ्या-पोट, गर्भाशय.
वादक-वाजविणारा.
वानणें-स्तवणें, वर्णणें.
वापिका-विहीर, तळें, सरोवर.
वाम-१ सुंदर. २ डावा.
वामदेव-शिव.
वामलोचनी-सुंदरनेत्री.
वाय }
वायां } -व्यर्थ.
वायांवीण }

वार–दिवस.
वारण–हत्ती.
वारिज } –कमळ.
वारिजात }
वारी–१ यात्रा. २ उदक.
वार्ता–गोष्ट, वृत्तान्त, वर्तमान.
वार्तिक–बातमीदार.
वाराशि–समुद्र.
वाली–कैवारी, रक्षक.
वाव–व्यर्थ, पोकळ.
वास–१ वस्त्र. २ गंध, सुवास. ३ वस्ती, राहणें.
वासर–दिवस.
वासरमणि–सूर्य.
वासव–इंद्र.
वासवि–इंद्रपुत्र, अर्जुन.
वाह–घोडा.
वाहणी–मार्ग.
वाळणें–करणें.
विकत्थन–बडबड.
विकराल–भयंकर.
विकळ–विव्हल.
विकोशं–नागवें ( शस्त्र ).
विखरणें–पसरणें.
विंगळ–विस्तव, निखरा.
विग्रह–१ देह. २ युद्ध. ३ कलह.
विचक्षण–पंडित.
विचारणें–१ विचार करणें. २ पुसणें.
विजन–निर्जनप्रदेश.
विजय–अर्जुन.
विजे–वारा घालतो.
विज्वर–दुःखरहित.
विटपी–वृक्ष.
विटंब–विटंबना.
विटली–१ रुसली. २ कंटाळली.
वितत–विस्तृत.
वित्त–द्रव्य.
वितरण–दान.
विंदाण–चातुर्य, विलास, कपट.
विदेह–१ जनकराजा, २ विरक्त.
विद्या–ज्ञान.
विद्रुम–पोंवळें.
विध्वस्त–भग्न, नष्ट, मोडलेला.
विधान–करण्याचा प्रकार.
विधि–१ आज्ञावाक्य. २ ब्रह्मदेव. ३ दैव.
विधु–चंद्र.
विधुमणि–चंद्रकांतमणि.
विन–वांचून, शिवाय.
विनटली–१ शोभली. २ तल्लीन–तत्पर झाली.
विनत–नम्र.
विनतानंदन–गरुड.
विनायक–१ गरुड. २ गणपति.
विनासा–नकटी.
विपति–गरुड.
विपक्ष–शत्रु.
विपर्यय–व्यत्यास, वैपरीत्य.
विपिन–अरण्य.
विप्रकर्ता–वाईट करणारा.
विप्रयासीं–मोठ्या आयासानें, कष्टानें.
विप्रिय–न आवडणारें.
विभव–ऐश्वर्य.
विभांडी–मारी, पराभव करी.
विभूति–१ ऐश्वर्य. २ मूर्ति.
विभ्रम–भ्रांति, विलास.
विमल–स्वच्छ, निर्दोष.
विरमणें–थांबणें, शांत होणें.
विरस–भग्नोत्साह.
विरहद–विरहदुःख देणारा.
विरहितु–निराळा.
विरिंचि–ब्रह्मदेव.
विरिंचितनया–ब्रह्मदेवाची कन्या–सरस्वती.
विरोचनसुत–( प्रल्हादाचा मुलगा. ) विरोचन दैत्य ह्याचा मुलगा–बळी.
विरोध–द्वेष.
विरोधी–शत्रु, द्वेषी.
विलंब–उशीर.
विलसणें–१ शोभणें. २ राहणें. ३ नाचणें.
विवर–भोंक.
विवरण–स्पष्टीकरण.
विवर्त–अन्यथाभास.

विवश–पराधीन.
विवर्श–जखीण.
विवळणें–विस्तारणें.
विवळेना–कळेना.
विविक्तदेशी–एकांतस्थान.
विवेक–विचार.
विशद–स्पष्ट.
विशारद–ज्ञाता, शहाणा.
विशिख–बाण.
विश्रब्ध–विश्वासलेला.
विश्राम–विश्रांति, सुख.
विश्लेष–वियोग.
विश्वंभर–१ जगाचें पोषण करणारा. २ मुक्तेश्वराच्या बापाचें नांव.
विशाळ–मोठा.
विषकंठ–महादेव.
विषम–प्रतिकूळ, मारक, कठीण.
विषमता–वैषम्य, दुजाभाव.
विषमें–विषमाचरणानें.
विषव्रतती–विषवल्ली.
विषय–इंद्रियग्राह्य पदार्थ.
विषयक–विषयांचें.
विषाद–खेद.
विष्णुपदी–भागीरथी.
विसंवणें–दूर ठेवणें.
विहंग } –पक्षी.
विहंगम }
विहगराज–गरुड.
विहार–क्रीडा.
विहित–सांगितलेलें, योग्य.
विहिरा–झरा, भुडकी.
वीट–कंटाळा.
वीतरागी–विरक्त.
वीरगुंठी–बुचडा.
वीरसू–वीरमाता.
वृक–लांडगा.
वृत–वरलेला.
वृत्त–वर्तमान, बातमी.
वृत्ति–१ उपजीवन. २ वर्तन.
वृत्रघ्न } –वृत्रासुरास मारणारा, इंद्र.
वृत्रहा }
वृंद–समुदाय.
वृंदारक–देव.
वृंदावन–कवंडळफळ.
वृष–१ कर्ण. २ बैल.
वृषभ–बैल.
वृष्णि–यादव.
वेगळ–भिन्न.
वेंघणें–चढणें.
वेंच–खर्च.
वेडीव–वेडेपणा.
वेणु–पावा, मुरली.
वेतनभोक्ते–पगार खाऊन राहिलेले, पगार देऊन ठेवलेले.
वेताटी–वेताची छडी.
वेद–श्रुति.
वेदश्रुति–वेद.
वेध–१ छंद. २ लय.
वेल्हाळ–प्रिय.
वेव्हार–उदीम करणारे सावकार.
वैकुंठ–१ कृष्ण. २ विष्णुलोक.
वैखरी–वाणी.
वैजयंती–१ ध्वज, पताका. २ विष्णूच्या गळ्यांतील माळ.
वैदर्भराज–विदर्भ देशाचा राजा–भीम ( दमयंतीचा बाप. )
वैद्युत–विजेचा.
वैर्णायाचा–पांघराचा.
वैरागर–१ रत्नांची खाण. २ दुकान.
वैराग्य–आवड नसणें, विरक्ति.
वैवस्वत–सूर्यपुत्र–यम.
वैश्वानर–अग्नि.
वैषम्य–वैपरीत्य.
वो–अहो.
वोखटें–वाईट.
वोज–कौतुक, चांगलें.
वोजे–प्राप्त होई.
वोटी–स्थान, जागा.
वोढक–ओढणारा.

वोढवणें—पुढें करणें.
वोडसी—धावसी.
वोढवारा—प्रतिबंध.
वोतारी—ओतकाम करणारा.
वोपणें—देणें.
वोस—तोटा.
वोसंडणें—१ भरून खालीं सांडणें. २ टाकून [जाणें.
वोळगणें—तत्प्रवण होणें, ओढवणें.
वोळणें—१ देणें. २ वळणें, प्रीति करणें.
वोळसा—१ वळसा, फेरा. २ वर्तुळसा. ३ पुकारा.
व्यंकट—१ भयंकर. २ वांकडा.
व्यजन—पंखा.
व्यतिरेक—वियोग.
व्यवसाय—१ व्यापार. २ उद्योग. ३ निश्चय.
व्यवहार—१ प्रपंच. २ वागणूक.
व्यसन—१ संकट. २ छंद, नाद.
व्यसु—गतप्राण, मृत.
व्यस्त—अस्ताव्यस्त.
व्यापक—सर्वगत, सर्वत्र स्थित.
व्यापें—व्यापकत्वें.
व्याप्त—अल्पदेशस्थित.
व्याल } —सर्प.
व्याळ }
व्यूह—युद्धासाठीं केलेली सैन्याची रचना.
व्योम—आकाश.
व्योमघटीं—गगनोदरीं.
व्रज—१ समुदाय. २ गोकुळ. ३ गौळवाडा.
व्रात—समूह.

## श.

शकुनी—१ पक्षी. २ दुर्योधनाचा मामा.
शक्तिसुत—कार्तिकस्वामी.
शक्ति—देवी.
शक्र—इंद्र.
शकुंत—पक्षी.
शंख—कपोलप्रांत, आंख.
शंखद्वय—दोन आंख.
शची—इंद्राणी.
शतकोटि—इंद्राचें वज्र.
शतपत्र—कमल.
शंपा—वीज.
शबरी—भिल्लीण.
शबल—मिश्रित.
शम—१ शांतता. २ सल्ला.
शमन—१ दूर करणारा. २ यम.
शमी—योगी.
शय—हात.
शर्म—सुख.
शर—बाण.
शरण्य—रक्षण करण्यास समर्थ.
शरधि—भाता.
शरतांडव—बाण सोडण्याचें चातुर्य.
शरभ—अति बलाढ्य पशुविशेष.
शर्व—महादेव.
शराव—परळ.
शरासन—धनुष्य.
शलभ—टोळ, पतंग.
शल्य—१ बाणाग्र. २ मनांत सलतें तें.
शव—प्रेत.
शश } —ससा.
शशक }
शशांक—चंद्र.
शशिकांत—चंद्रकांतमणि.
शशिमौळी—महादेव.
शस्त्री—शस्त्र, सुरी.
शाक—भाजी.
शाठ्य—वंचकपणा.
शाण—सहाण.
शांतनव—शंतनुराजाचा पुत्र—भीष्म.
शारदा—सरस्वती.
शारद—शरदतूंतला.
शार्दूल—वाघ.
शाल—वृक्षविशेष.
शालीवन—भाताचें शेत.
शावक—बालक.
शाश्वत—चिरस्थायी.
शासन—१ आज्ञा. २ शिक्षा.
शिऊ—शिव.

शिकवण–बोध.
शिखा–ज्वाला.
शिखी–१ मयूर. २ अग्नि.
शितिकंठ–१ शिव. २ मयूर.
शिबिका–पालखी.
शिबिर–सेनेचा तळ.
शिरोमणि–श्रेष्ठ.
शिराणी–१ आवड, कौतुक. २ लाभ.
शिल्पीकार–कारागीर.
शिव–१ कल्याण. २ सांब, महादेव.
शिवत्व–ईश्वरत्व.
शिंव–सीमा, हद्द.
शिवा–१ गौरी, पार्वती. २ कोल्ही.
शिशु–मूल, बाळ.
शिष्ट–१ संभावित. २ मध्यस्थ.
शिळाचुंबी–लोहचुंबक.
शीतभानु–चंद्र.
शीण–श्रम.
शीर्णपर्ण–ज्याचीं पानें गळलीं आहेत असा.
शील–१ स्वभाव. २ सद्वर्तन.
शीला–द्रौपदीस सूर्यानें जी अन्नाची स्थाली दिली होती ती.
शुक–१ रावा. २ शुक्राचार्य.
शुकतात } –व्यास.
शुकपिता }
शुक्ति–शिंप.
शुचि–१ आषाढ. २ शृंगार. ३ शुद्ध, पवित्र. [ ४ पांढरें.
शुनक–कुत्रा.
शुनासीर–इंद्र.
शुभांगी–सुंदरी.
शून्यवादी–नास्तिक.
शूर्प–सूप.
शूर्पणखा–रावणाची बहीण.
शूलपाणी–महादेव.
शृंगार–१ भूषणें, अलंकार. २ शृंगाररस.
शेख–शेप.
शेखी–१कीर्ति. २ बढाई.
शेखीं–शेवटीं.
शेजे–शयनीं.
शेली–मान, गळा.
शैल–पर्वत.
शोण ( णं )–लाल.
शोणित–रक्त.
शोभन–चांगलें.
शौंड–चतुर, शहाणा.
शौरी–कृष्ण.
श्याम } –निळा.
श्यामल }
श्रवण–१ कान. २ ऐकणें.
श्रांत–थकलेला.
श्रीद–कुबेर.
श्रीविद्या–ब्रह्मविद्या, मंत्रविद्या.
श्रित–आश्रित.
श्रुत–वेदशास्त्र.
श्रुति–वेद.
श्रुतिपारग–सर्व वेद म्हटलेला.
श्रेणि–पंक्ति.
श्रोत्रिय–१ वैदिक. २ अग्निहोत्री.
श्लाघणें–चाहणें, आवडणें.
श्लोक–कीर्ति.
श्वपच–चांडाळ.
श्वशुर–सासरा.
श्वश्रू–सासू.
श्वान–कुत्रा.
श्वित्र–कुष्ठ, कोड.
श्वेतवाह } –अर्जुन.
श्वेताश्व }

## ष.

षट्पद–भ्रमर, भुंगा.
षष्टि–साठ.
षण्मुख–कार्तिकस्वामि.

## स.

सक्ति–आसक्ति.
संकल्पणें–सोडणें.
सकृत–एकवार.
संकेत–खूण.
संकेतकुंज–क्रीडास्थान.
सख्य–मित्रत्व.

संख्यावान्-पंडित, विद्वान्.
सगुणाथिली-गुणवती.
संग्राम-युद्ध.
संघाट-समूह.
संचित-दैव, पूर्व कर्म.
सजणे-हे प्रिये, हे सखि.
संजीवनी-मेलेल्यास जिवंत करण्याची विद्या.
सठवणें-पतन पावणें.
सत्कृति-१ उत्तम काव्य. २ सत्कृत्य.
सती-१ पार्वती. २ पतिव्रता.
सत्यप-ब्रह्मदेव.
सत्यपांड-ब्रह्मांड.
सत्यलोक-ब्रह्मलोक
सत्यवती-ब्रह्मदेवाची नगरी.
सत्यवतीहृदयरत्न-व्यास.
सत्यवान्-एक राजा, सावित्रीचा नवरा.
सत्यसंध-सत्यप्रतिज्ञ.
सत्या-सत्यभामा.
सत्यापति-श्रीकृष्ण.
सत्राण-बळानें, वेगानें.
सद्गद-भरून आलेला ( गळा )
सद-सभा.
सदन-गृह.
सदसि ( सी )-उत्तम खड्ग.
सदीड्य-साधूंनीं पूज्य.
सदेवा-नेहमीं.
सदैव-१ दैववान्. २ नेहमीं.
सद्म-घर.
सद्य-तत्काल.
सधर-सहाश्रय.
संधा-प्रतिज्ञा.
संध्या-संध्याकाळ.
सनातन-ज्याला आदि व अंत नाहीं असा.
सन्निध-जवळ.
सन्निधान-१ उत्तम ठेवा. २ जवळ असणें.
सन्निपात-त्रिदोषी ज्वर.
सनोळख-ओळखीचें, परिचित.
सपत्न-शत्रु.
सपोष-पुष्ट.
संबोखणें-सांत्वणें, शांतवन करणें.
सभाचारी-सभेंत जाणारा.
संभार-सामग्री, समुदाय.
सभ्य-सभेंतील लोक.
संभ्रम-१ आदर. २ गडबड. ३ हौस. ४ समारंभ.
समता-बरोबरी.
समन्वित-युक्त.
समयज्ञ-प्रसंग जाणणारा.
समर-युद्ध.
समरस-परिपूर्ण.
समवेत-सहित, युक्त.
समाये-मावे, सांठवे, राहे.
समित्-समिध.
समिद्ध-पेटलेली.
समीर } -वायु.
समीरण }
समृद्धि-ऐश्वर्य.
सयें-१ सखे. २ स्मरणास.
सरकाळें-कडव्याचें ताट.
सरघा-मधमाशी.
सरता-१ कृतकृत्य. २ शेवटास गेला तो.
सरस-उत्साहयुक्त, प्रीतियुक्त.
सरसावणें-१ पुढें सरणें. २ प्राप्त होणें.
सरसिज-कमळ.
सरसिजोद्भव-ब्रह्मदेव.
सरसिजोद्भवकुमारी-ब्रह्मयाची कन्या सरस्वती.
सरसीरुह-कमळ.
सरस्वती-एक नदी.
सराय-विश्रांतिस्थान.
सरिता-नदी.
सरिसा-१ सदृश, तुल्य. २ नीट, दुरुस्त.
सरी-उपमा, बरोबरी, साम्य, सर.
सरोरुह-कमळ.
सर्वदेखणा-विश्वद्रष्टा.
सर्वविद्याविदु-सर्व विद्या जाणणारा.
सर्षप-मोहरी.
सलगी-मैत्री.
सलिल-पाणी, जल.
सलील-सहज.

सवड्डीं—आश्रयास.
सवतें—वेगळें, निराळें.
सविता—सूर्य.
सर्वे—१ बरोबरी. २ संचय.
सर्वे—बरोबर, सहवर्तमान.
सर्वांचि—तात्काळ, लागलाच, तेव्हांच.
सव्यसाची—अर्जुन.
संशप्तक—युद्धांतून परत न येण्याची शपथ वाहून युद्धास जाणारे वीर. मरूं अगर मारूं म्हणून युद्धास जाणारे वीर.
संसरण-जन्ममरणप्रवाह, स्वरूपापासून च्युति.
संसर्ग—संबंध.
संसार—व्यवहार; जन्ममरणप्रवाह.
संसृति—संसार.
सहसा—एकाएकीं.
सहस्रकर—सूर्य.
सहस्राक्ष—इंद्र.
सहोदर—सख्खा भाऊ.
सा—१ सहा. २ सारखा.
साई—झाडी.
साउजी—सात्त्विक, गरीब.
सांकडें—संकट.
सांकडे—दुःख पावे.
साकेत—अयोध्यापुर.
साक्षर—पंडित, विद्वान्.
साक्षरता—विद्वत्ता.
साक्षेपें } अगत्यानें.
साक्षोपें }
सांग—१ मूर्तिमान, अंगांसहित. २ सपूर्ण.
साग—सापराध.
सांगडा—भोपळ्याचें पेटें.
सांगडे—अडचण.
सागर—समुद्र.
सांगाती—१ सोबती. २ बरोबर, संगें.
सांगोपांग—सर्वांशीं.
साच } खरा.
साचा }
साचार—सत्य, खरोखर.
साचोकार—१ खरा. २ खरेपणा.
साजेरा—सुंदर.
साटी—१ संगत. २ सांड.
साठ—१ सवदा. २ सांठा.
सांठणें—संपादणें, गांठीं बांधणें.
सांड—त्याग, उपेक्षा.
सांडणें—टाकणें. २ हरवणें.
सांडवला—मुकला.
सात्त्विकभाव—'अष्टभाव' शब्द पहा.
साद—हाक, आरोळी.
सांदीपनि—कृष्ण व सुदामा ह्यांचा गुरु.
सांद्र—दाट, निबिड, भरलेलें.
साधी—दुःखी.
साधु—१ शाबास. २ सज्जन.
साध्वस—भय.
साध्वी—पतिव्रता.
सान } —लहान.
साना }
सानुलें—केवळ लहान.
सानवानें—थोडेंबहुत.
सापत्न—१ शत्रु. २ सावत्र.
साम—सल्ला, समेट, संधि.
सामानुक्रम—सल्ला करण्याचा प्रकार.
सायक—बाण.
सायकासन—धनुष्य.
सायुज्य } —मुक्तीचा एक प्रकार, ब्रह्मरूप होणें.
सायोज्य }
सारजा—सरस्वती. [ आहे असा म्ह. विष्णु.
सारंगपाणी—शार्ङ्ग नांवाचें धनुष्य ज्याचे हातांत
सार्थ—समूह, तांडा.
सारमेय—कुत्रा.
सारस—१ कमल २ पक्षिविशेष.
सारसाक्षी—कमलाक्षी.
सारिका—साळुंकी, मैना.
सारीपाट—सोंगट्यांचा खेळ.
सारोनी—उरकोन, करून, आटोपून.
सार्वभौम—चक्रवर्ती राजा.
साल—१ कातडें, त्वचा. २ मेहुणा.
सावडणें—गोळा करणें.
सांवर्तिक—प्रळयकाळचा.

सासु–सप्राण, जिवंत.
सिकताहरळ–वाळूचा कण.
सित–पांढरें.
सिता–शर्करा.
सिताश्व–अर्जुन.
सिंधु–१ समुद्र. २ नदी.
सिंधुर–गज.
सीरे–शिरणें.
सुकंठ–सुग्रीव.
सुकृत–पुण्य.
सुकृती–पुण्यवान.
सुगाळ–सुग्रीव.
सुघड–चतुर.
सुचिर–फार वेळ.
सुजाण–ज्ञाता, सुज्ञ.
सुझे–पावे. [स्वच्छ.
सुढाळ–१ बांधेसूद, सुगम. तेजस्वी,
सुणें–१ शून्य, ओकें. २ कुत्रें.
सुतनु–रूपवती.
सुतर–तरायास सुलभ.
सुतरी–उत्तम नौका.
सुतर्कना–तार्किता येईना.
सुदर्शन–विष्णूचें चक्र.
सुदधिसार–तूप.
सुदती–जिचे दांत चांगले आहेत ती सुंदरी.
सुधा–अमृत.
सुधाकर } –चंद्र.
सुधांशु }
सुधी–बुद्धिवान.
सुनासीर–इंद्र.
सुपर्ण–गरुड.
सुपर्णव्यूह–सैन्याची गरुडाकार रचना.
सुभग–१ भाग्यवान्. २ सुंदर.
सुभट–शूर.
सुभटा } –उत्तम पुरुष.
सुभवटा }
सुभ्रू–जिच्या भिवया चांगल्या आहेत म्हणजे सुंदर स्त्री.
सुम–पुष्प.

सुमन–१ पुष्प. २ देव. ३ चांगल्या मनाचा.
सुमनश्चाप–मदन.
सुयोधन–दुर्योधन.
सुरगज–देवांचा हत्ती, ऐरावत.
सुरगायक–गंधर्व.
सुरगुरु–बृहस्पति.
सुरद्रु–कल्पवृक्ष.
सुहृद्भाव–मित्रत्व.
सुरनग–कल्पवृक्ष. [रकून.
सुरनीस–राजपत्रावर शिक्का ठोकणारा का-
सुरसद्म–स्वर्ग, देवांचें घर.
सुरभी–कामधेनु.
सुरभूरुह–कल्पतरु, पारिजात.
सुरयानी–देवयानी.
सुरयुवती–देवांगना.
सुरलोक–स्वर्ग.
सुरवाड–सुखाचा.
सुरसदन–स्वर्गलोक.
सुरसा–देवासारखा.
सुरसिंधु–भागीरथी.
सुरा–मद्य.
सुरेंद्र–देवश्रेष्ठ, मुख्य.
सुलोचन–चांगल्या डोळ्यांचा.
सुवर्णरेखा–सोन्याची रेघ.
सुषमा–उत्तम शोभा.
सुक्ष्मीं–सूक्ष्म स्थानीं.
स्नुषा–सून.
सूत–सारथी.
सूदे–ओढवे.
सूदिलें–घातलें.
सूनीं–शून्य.
सूनु–पुत्र.
सूपरस } –सूरण.
सूपराम }
सूये–प्रवृत्त होइ.
सूर्यदुहिता–यमुनानदी
सूक्षम–सूक्ष्म.
सेज–बिछाना.
सेना–समुदाय.

सेनानी—१ सेनापति. २ कार्तिकस्वामी.
सैंधव—१ जयद्रथ. २ घोडा. ३ मीठ.
सैरा
सैराट
सैरावैरा
स्वैर.
—स्वच्छंदानें, मनास येईल तसें.
सैरिभ—१ रेडा. २ महिषासुर.
सोइरा—आप्त.
सोइरेपण—स्नेहसंबंध.
सोगयाचें—शेवटाचें, पदराचें.
सोपा—१ सुलभ. २ घर.
सोपारें—फार सोपें.
सोपावें—द्यावें.
सोम—चंद्र.
सोयरा—आप्त.
सोयरीक—संबंध.
सोर—रोदन, आकांत.
सोसे—हौसेनें.
सौजन्य—सुजनपणा.
सौदागर—व्यापारी.
सौदामिनी—विद्युल्लता, वीज.
सौध—राजमंदिर, राजवाडा.
सौबळ—शकुनि.
सौभद्र—सुभद्रेचा पुत्र, अभिमन्यु.
सौरस—प्रीति, स्नेह.
स्कंध—खांदा.
स्तबक—पुष्पगुच्छ.
स्तोम—समूह.
स्त्रीधर्मिणी—रजस्वला.
स्थविर—म्हातारा.
स्थिर—निश्चल, स्थावर.
स्थूळ—मोठा.
स्नेह—१ मैत्री. २ तेल.
स्पर्शमणि—परिस.
स्फीति—१ कीर्ति. २ डौल.
स्फूर्ति—१ ज्ञान. २ कंप, स्फुरण.
स्मर—मदन.
स्यंदन—रथ.
स्रक्—माळ.
स्रजिली—निर्मिली.

स्रष्टा—ब्रह्मदेव.
स्वक—आप्त, नातलग.
स्वयमेव—आपणच.
स्वयंज्योति—स्वप्रकाश.
स्वयंवेद्य—स्वानुभवानें जाणायास योग्य.
स्वरत—आत्मरत.
स्वरूप—आत्मरूप.
स्वसा—बहीण.
स्वादु—गोड.
स्वांत—अंतःकरण.
स्वानुभव—आत्मानुभव.
स्वानुभवी—स्वानुभव ज्यास झाला आहे तो.

ह.

हक्क—खाऊन पचलें तें.
हत—१ मृत. २ नष्ट.
हतियेरा—शस्त्रास्त्र.
हनु—हनवटी.
हय—अश्व, घोडा.
हरळ—कण, बारीक खडा.
हरि—१ इंद्र. २ सिंह. ३ अश्व. ४ विष्णु ५ वानर.
हरिख—हर्ष.
हरिखग—गरुड.
हरित—हिरवें.
हरिता—हरण करणारा.
हरिद्रा—हळद.
हरिहरि—खेद, आश्चर्य, यांचा उद्गार.
हरुष—हर्ष.
हलधर—बलराम.
हलहलास्वन—हाहाकार.
हवि—होमद्रव्य.
हव्यवाट—अग्नि.
हव्यास—हौस, छंद.
हंस—१ सूर्य. २ राजहंसपक्षी.
हस्त—१ सुंडाग्र. २ हात.
हस्तिप—महात.
हस्ती—हत्ती.
हळुवार—फार हळू.
हा—खेदसूचक अव्यय.
हाकारून—हाका मारून.

हाटक–सोनें.
हाटीं बाजारांत.
हाणी–तोटा.
हंत–खेदसूचक अव्यय.
हामी–जामीन.
हायन–वर्ष.
हारीं आणणें–वश करणें.
हाला–मद्य.
हालाहल } –विष.
हाळाहळ }
हाव–१ उत्साह. २ इच्छा. ३ आग्रह.
हित–कल्याण.
हिंपुटी–कष्टी, दुःखी.
हिम–थंडी.
हिमसा–थंड, शांत.
हिमांशु–चंद्र.
हिरण्यगर्भ–ब्रह्मा.
हिरोन–हिसकावून.
हिंसा–प्राण घेणें, हत्या.
हीर–१ हिरा. २ श्रेष्ठ.
हुजत–पावती, रसीद.
हुडा–बुरूज.
हुतवह } –अग्नि.
हुताश }
हुमणी–बुक्की.
हूप–औत्सुक्य, धैर्य, हुरूप.
हृत्–हृदय.
हृद्गत–हेतु, उद्देश.
हृदयंगमा–मनांत भरणारी, सुंदर.
हृद्य–मनास रुचणारें.
हृष्ट–हर्षयुक्त.
हेजीब–दूत.
हेती–खड्ग, तरवार.
हेरणें–पाहणें.
हेला } –१ लीला. २ हेळणा. ३ रेडा.
हेळा }
हेलावणें–उचंबळणें.
हेलावे–लाटा.
हेवा–१ मत्सर. २ इच्छा.
हैय्यंगवीन–साजुक लोणी.
होकारितां–बोलावतां.
होता–यज्ञकर्ता.
होमिन–जाळीन.
होया–व्हावयास.
होळी–भस्मरूप.
ऱ्हद–डोह.

## क्ष.

क्षतज–रक्त.
क्षत्ता–दासीपुत्र विदुर.
क्षति–नाश.
क्षत्र–क्षत्रिय
क्षपा–रात्र.
क्षम–शक्तिमान्, समर्थ.
क्षमा } –पृथ्वी.
क्ष्मा }
क्षर–१ पंचमहाभूतें. २ नाशवंत.
क्षामा–कृश.
क्षिति–पृथ्वी.
क्षिप्र–लौकर.
क्षीण–दरिद्री.
क्षीरधी–क्षीरसमुद्र.
क्षीरोदक–पांढरें पातळ.
क्षुत्क्षाम–क्षुधेनें कृश.
क्षुद्र–तुच्छ, अल्प.
क्षुधित–भुकेलेला.
क्षुर–वस्त्रा.
क्षेम–१ आलिंगन. २ कल्याण.
क्षोभ–क्रोध.
क्षोभलें–विषयासक्त झालें.
क्षोभवणें–क्रुद्ध करणें.

## ज्ञ.

ज्ञप्तिकळा–ज्ञानशक्ति.
ज्ञाति–जात.
ज्ञान–जाणणें.
ज्ञानदीप्ति–ज्ञानज्योति.
ज्ञेय–जाणायाचें तें.